


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या महाराष्ट्र साहित्य पत्रिका ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून महाराष्ट्र साहित्य परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. हे अंक सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.
   वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका

अनुक्रमणिका






महाराष्ट्र साहित्य परिषदेचे त्रैमासिक मुखपत्र

# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

## दिवाळी १९८८

अंक २४७ – ऑक्टोबर–डिसेंबर १९८८

( म. रा. साहित्यसंस्कृती मंडळ पुरस्कृत )

## 'माझा वाङमयीन ऋणानुबंध' या विषयावरील विविध लेख

संपादक : शंकर सारडा

संपादक मंडळ : डॉ. गं. ना. जोगळेकर,
डॉ. वीणा देव, डॉ. वसंत सावंत
प्रा. चंद्रकुमार नलगे

या अंकाची किंमत २० रुपये

मुखपृष्ठ : लक्ष्मीकांत तोष्णीवाल



हो दीपावली आणि नूतन वर्ष
आमचे सदस्य, ग्रंथप्रेमी रसिक, साहित्यिक
जाहिरातदार आणि ग्राहक
सर्वांना सुखसमृद्धीची जावो

मुद्रक–प्रकाशक : डॉ. गं. ना. जोगळेकर, कार्यवाह, महाराष्ट्र साहित्य परिषद,
टिळक रस्ता, पुणे ३०

मुद्रणस्थळ : साप्ताहिक मुद्रण, १०२५ सदाशिव, पुणे ३०

अनुक्रमणिका

महाराष्ट्र साहित्य पत्रिका, दिवाळी १९८८

## अनुक्रमणिका

# माझा वाङ्मयीन ऋणानुबंध ' विशेषांक






# संपादकीय

मित्रहो,

दीपावली आणि नववर्षानिमित्त शुभेच्छा. हे नवे वर्ष आपल्या जीवनाला नवा उत्साह, नव्या प्रेरणा देणारे ठरो आणि आपल्या कर्तृत्वाला नवे परिमाण देणारे ठरो ही शुभकामना.

वाङ्मयामुळे माणसे जवळ येतात. दूरही जातात.

जवळ येतात तेव्हा खूप जवळ येतात. एकमेकांच्या भावविश्वाला साद घालतात. नवी क्षितिजे समोर फुलवतात; नव्या आकांक्षा जागवतात. आपल्या हृदयाच्या अंतर्हृदयात दडून राहिलेले खूप काही असते– ते प्रस्फुटित होण्यास मदत करतात. अशी माणसे दूर जातात तेव्हाही चटका लावून जातात. आपल्या भावविश्वात वादळे उठवून जातात; आपल्या अवघ्या अस्तित्वालाच हादरवून टाकतात. त्या जीवघेण्या अनुभवांतूनही आपल्यातील कलावंताचे पोषण होते. आपल्या जीवनाच्या अनुभूतीला नवी उत्कटता, नवी खोली लाभते. अशा या ऋणानुबंधांचे रूप शोधावे यासाठी आम्ही मराठीतील साहित्यिकांना आवाहन केले. त्यांनीही या विषयावर लिहिण्याचे मान्य केले. महाराष्ट्र साहित्य पत्रिकेच्या या दिवाळी अंकात 'माझा वाङ्मयीन ऋणानुबंध' या सूत्राभोवती लिहिले गेलेले २२ लेख समाविष्ट करण्यात आलेले आहेत. नामवंत कलावंतांमधील 'माणसाच्या' रागलोभांना समजून घेण्याचे एक नवे बृहद्दर्शक भिंगच आपल्या हाती आल्यासारखे वाटेल.

बऱ्याच मोकळेपणाने लिहिले गेलेले हे लेख आहेत. क्वचित वाङ्मयीन ऋणानुबंधापेक्षा व्यक्तिगत ऋणानुबंधात ते जास्त गुंतून पडतात. परंतु तरीही अनेक सुहृदांच्या अंतरंगात त्यामुळे आपल्याला डोकावता येईल.



अनुक्रमणिका




अनुक्रमणिका

डॉ. आनंद यादव (श्री. पु. भागवत), माधव गडकरी (मधु मंगेश कर्णिक) प्रा. म. द. हातकणंगलेकर (मित्रवर्य स्वामी), डॉ. सुनील सुभेदार (पं. द्वारका-प्रसाद मिश्रा), विद्याधर पुंडलिक (श्री. पु. भागवत) यांनीही या अंकासाठी लिहा-यचे मान्य केले होते. परंतु ते लेख वेळेवर हाती न आल्याने या अंकात देता आले नाहीत. याबद्दल खंत वाटते.

## ज्ञानपीठ पुरस्कार विजेते कुसुमाग्रज

कविवर्य कुसुमाग्रज यांना लाभलेला भारतीय ज्ञानपीठ पुरस्कार ही प्रत्येक मराठी भाषक व्यक्तीला अभिमान वाटावी अशी घटना आहे. थोर साहित्यिक वि. स. खांडेकर यांच्यानंतर १४ वर्षांनी मराठीला हा पुरस्कार मिळाला आहे. खांडेकरांनी आपल्यानंतर हा पुरस्कार कुसुमाग्रजांना मिळावा असे उद्गार काढले होते; त्यांचे ते द्रष्टेपणाचे उद्गार खरे झाले. कुसुमाग्रजांनी 'गर्जा जयजयकार'च्या रूपाने स्वातंत्र्य संग्रामात झोकून देण्यास मराठी तरुणवर्गाला बळ दिले; आणि भारतीय समाजात घडणाऱ्या नानाविध स्थित्यंतरांची स्पंदनेही त्यांच्या संवेदनशील मनाने सतत टिपली; नोंदवली. चीनचे आक्रमण झाल्यावरोबर 'वर्फाचे तट पेटुनि उठले सदन शिवाचे कोसळले' असा उत्स्फूर्त उद्गार त्यांच्या लेखणीतून वाहेर पडला. आजच्या सामाजिक–राजकीय स्थितीमुळे ते खूप अस्वस्थ आहेत; आणि ही अस्वस्थता त्यांच्या 'मुक्तायन' मधील पुतळ्यांच्या कवितांत उपरोध–उप-हासाचे रूप धारण करून अवतरते. केवळ कवी म्हणून नव्हे तर एक ऋजू, प्रांजल, सात्त्विक सज्जन व्यक्ती म्हणूनही शिरवाडकर हे लाखमोलाचे आहेत. सभासंमेलनात मिरवण्याचा सोस त्यांना कधीच नव्हता; तसेच कवीच्या हस्तिदंती मनोऱ्यातही ते अडकून पडले नाहीत; त्या हस्तिदंती मनोऱ्यात राहूनही, आपले स्वत्व त्यांनी जपले; सामान्यजनांशीही आत्मीयतेने रमले. शिरवाडकरांचे व्यक्तिमत्त्व हे एक विलक्षण रसायन आहे. व्यक्ती आणि कलावंत या दोन्ही दृष्टींनी ते मोठे आहे. पंचाहत्तरीतले कुसुमाग्रज म्हणजे पक्वपरिणत प्रज्ञा आणि प्रतिभा. कुसुमाग्रजांना उदंड आयुष्य लाभो; अशाच उत्तुंग कलाकृती त्यांच्या हातून घडोत हीच प्रत्येक मराठी माणसाची भावना आहे. तिचा पुनरुच्चार करून, महाराष्ट्र साहित्य परि-षदेतर्फे त्यांना खूप खूप शुभेच्छा.

## डॉ. आनंद यादव

डॉ. आनंद यादव यांच्या 'झोंबी' या आत्मचरित्रपर कादंबरीला अकरा हजार रुपयांचा प्रियदर्शनी पुरस्कार मिळाला. (गतवर्षी श्री. ना. पेंडसे यांच्या 'तुंबाडचे खोत'ला हा मान मिळाला होता.) श्रीमती ज्योत्स्ना देवधर यांच्या 'कल्याणी'ला

बिहार सरकारचा तीन हजार रुपयांचा पुरस्कार मिळाला. ' मराठवाडा ' चे संस्थापक अनंतराव भालेराव यांच्या हैद्राबादच्या इतिहासावरील पुस्तकाला म. म. पोतदार पुरस्कार मिळाला. या सर्वांचे मनःपूर्वक अभिनंदन.

## प्रा. सरदार – ८१ व्या वर्षात पदार्पण

महाराष्ट्रातील थोर विचारवंत आणि गांधीवादी–मार्क्सवादी तत्त्वज्ञानाचे समन्वयकार प्रा. गं. बा. सरदार यांनी सप्टेंबरमध्ये ८१ व्या वर्षात पदार्पण केले. परिवर्तनवादी चळवळीत काम करणाऱ्या अनेक तरुण कार्यकर्त्यांना प्रा. सरदारांचे वडीलधारे मार्गदर्शन हे नेहमीच सात्त्विक बळ देण्यास आणि या तरुणांच्या कार्याचा पाया वैचारिकदृष्ट्या भरभक्कम करण्यास उपयुक्त ठरले आहे. प्रा. सरदारांचा वरदहस्त अखंड या कार्यकर्त्यांना प्रेरणा देत राहो हीच प्रार्थना.

विख्यात कवयित्री इंदिरा संत यांनीही नुकतेच ७६ व्या वर्षात पदार्पण केले.

## प्राचार्य शिवाजीराव भोसले

आपल्या अमोघ वक्तृत्वाने अवघ्या महाराष्ट्राला मंत्रमुग्ध करणारे प्राचार्य शिवाजीराव भोसले यांनी ऑगस्टमध्ये मराठवाडा विद्यापीठाच्या कुलगुरूपदाची सूत्रे हाती घेतली. चिंतनशील, व्यासंगी आणि उत्कट भव्य तेचि घ्यावे या वृत्तीचे शिवाजीराव मराठवाडा विद्यापीठात प्रशासनाच्या दृष्टीनेही नवे मानदंड निर्माण करतील अशी आशा वाटते. त्यांना या कामी यश लाभावे हीच प्रार्थना.

## स्वरसम्राज्ञी

स्वरसम्राज्ञी लता मंगेशकर यांच्या गोड गळयाच्या बाबतीत वयाच्या भाषेत बोलणे निरर्थकच होय. सप्टेंबर १९८८ रोजी त्यांनी साठाव्या वर्षात पदार्पण केले. हे कोणाला खरेही वाटणार नाही. मास्टर दीनानाथ यांनी छोट्या लताला म्हटले होते, ' तुझ्या गळयात गांधार चांगला फिरतो आहे. तो सांभाळ. बालगंधर्वांच्या गळयात तो होता म्हणून ते लोकप्रियतेच्या शिखरापर्यंत पोहोचले. ती लोकप्रियता उद्या तुझ्या पायाशी लोळण घेईल.' आपल्या वडिलांचा हा विश्वास किती रास्त होता हे लतादीदी गेली पंचेचाळीस वर्षे अविरतपणे सिद्ध करीत आल्या आहेत. त्यांनी विविध भाषांत गायिलेल्या गीतांची संख्या इतकी प्रचंड आहे की गिनेस बुकमध्येही त्याची नोंद होणे अपरिहार्य ठरले. लतादीदींनी असेच गात राहावे आणि रसिकांनी स्वरांच्या दुनियेत धुंद होत राहावे हीच देवाजवळ आपली मागणी असणार.



अनुक्रमणिका

## माधव गडकरी

लोकसत्ताचे संपादक श्री. माधव गडकरी म्हणजे मराठी वृत्तपत्रसृष्टीतील चैतन्याचा खळाळता झराच ! २५ सप्टेंबर १९८८ रोजी त्यांनी ६१ व्या वर्षात पदार्पण केले. लोकसत्ताच्या संपादकपदी आरूढ झाल्यावर माधव गडकरी यांनी आपल्या निर्भीड लेखणीने व चौफेर वक्तृत्वाने चांगलाच दवदवा निर्माण केला आहे. उपेक्षितांच्या दुःखाना वाचा फोडण्यासाठी, अन्याय वेशीवर टांगण्यासाठी, सत्कार्याचा गौरव करण्यासाठी आपली लेखणी–वाणी ते कामी आणत आहेत. २५ सप्टेंबराला मुंबईत झालेल्या त्यांच्या सत्काराच्या वेळी नानासाहेब गोरे यांनी म्हटले होते. 'सामान्य माणसाला दिलासा देणारी आगरकर–टिळकांच्या निर्भीड आणि जागरूक पत्रकारितेची परंपरा माधव गडकरी जोपासत आहेत.' माधव गडकरी यांना आमच्या शुभेच्छा.

## कॉ. प्रभाकर वैद्य

सुप्रसिद्ध समीक्षक माधव मनोहर यांचे बंधू कॉ. प्रभाकर वैद्य यांनी २० सप्टेंबर १९८८ रोजी ८६ व्या वर्षात पदार्पण केले. वल्लभभाई पटेल, जेपी–एका शोकांतिकेचा शोध, वंदेमातरम्–जनगणमन, आंबेडकर आणि त्यांचा धम्म, महात्मा फुले आणि त्यांची परंपरा, चक्रधर, उर्वशी वगैरे ग्रंथांचे आणि साक्षी, स्वाक्षरी. उधळण या काव्यसंग्रहांचे कर्ते म्हणून ते ज्ञात आहेत. मार्क्सवादी विचारवंत आणि अभ्यासू कार्यकर्ते कॉ. वैद्य यांच्या चिकित्सक शैलीतील साम्यवादी रशियातील नव्या परिवर्तनातील अभ्यासपूर्ण भाष्य वाचायला मिळावे अशी अपेक्षा त्यांना शुभेच्छा देताना मनात घोटाळते आहे.

अ. भा. मराठी नाट्यपरिषदेचे माजी अध्यक्ष आणि नाट्यनिर्माते, दिग्दर्शक व अभिनेते प्रभाकर पणशीकर यांना विष्णुदास भावे पुरस्कार प्रदान करण्यात आला. त्यांचे अभिनंदन.

## 'सुधारका'ची जन्मशताब्दी

'सुधारक'कर्ते गोपाळ गणेश आगरकर यांनी १५ ऑक्टोबर १८८८ रोजी पुणे येथे सुधारक या पत्राचा प्रारंभ केला. या घटनेला यंदा शंभर वर्षे झाली. त्या निमित्ताने कऱ्हाडच्या चौफेर संस्थेने मराठी पत्रकार परिषदेच्या सहकार्याने वर्षभर सुधारक शताब्दी वर्ष साजरे करण्याचे ठरवले. महाराष्ट्र शासनानेही या कल्पनेला सक्रिय सहकार्य देण्याचे मान्य केले. १५ ऑक्टोबर १९८८ रोजी आगरकरांच्या जन्मगावी, टेंभू येथील आगरकर स्मृतिमंदिरात लोकसत्ताचे संपादक माधव गडकरी यांच्या हस्ते निर्भयता ज्योत प्रज्वलित करण्यात आली. अनेक मंत्री त्यावेळी हजर



अनुक्रमणिका

होते. आगरकरांच्या नावे टेंभू येथे एक प्रशालाही काढण्यात येणार आहे. त्यालाही शासनाने ५० हजारांची देणगी त्यावेळी जाहीर केली, कराड येथे आगरकर शताब्दीनिमित्त अर्थमंत्री सुशीलकुमार शिंदे यांच्या अध्यक्षतेखाली मुख्य सोहळा झाला. उद्योगमंत्री रामराव आदिक, माहिती जनसंपर्क राज्यमंत्री अनंतराव देशमुख, क्रीडा–युवक मंत्री श्यामराव अष्टेकर, सहकारमंत्री अभयसिंह राजेभोसले, विधानसभेचे सभापती शंकरराव जगताप, माधव गडकरी वगैरे मान्यवरांची त्यावेळी भाषणे झाली. दुपारच्या सामाजिक सुधारणा व पत्रकारिता या महाराष्ट्र शासनाच्या वतीने घेण्यात आलेल्या परिसंवादात अनेक मंत्र्यांनी व संपादकांनी भाग घेतला. सुमारे शंभर पत्रकार–संपादक यावेळी उपस्थित होते. महाराष्ट्र शासन या कार्यक्रमात उत्साहाने सहभागी झाले याची नोंद अभिमानाने घेणे जरूर आहे. जनतेच्या आशाआकांक्षांशी समरस होणे हे कोणत्याही लोकाभिमुख शासनाचे लक्षण असते मराठी साहित्याच्या अभिवृद्धीसाठीही शासनाने अशीच व्यापक जागरुकता दाखविली तर श्रेयस्कर ठरेल.

## मराठी रियासतीचे पुनर्मुद्रण

रियासतकार गो. स. सरदेसाई यांच्या मराठी रियासतीचे नवी भर घालून अद्ययावत माहितीसह ८ खंडात पुनर्मुद्रण करण्याचा प्रचंड प्रकल्प पॉप्युलर प्रकाशनने हाती घेतला आहे. विख्यात कादंवरीकार कॅ. मनोहर माळगावकर यांनी वडोद्याचे नरेश फत्तेसिगराव गायकवाड, कोल्हापूरचे शाहू महाराज प्रभृतींचे सहकार्य मिळवून दीर्घकाळ दुर्मिळ असलेल्या रियासतीच्या पुनर्मुद्रणाची कल्पना मूर्त स्वरूपात आणली. हे त्यांचे अनेक अभ्यासकांच्या सहकार्याने स. मा. गर्गे संपादन करीत आहेत. वडोद्याचे महाराज फत्तेसिगराव यांचे नुकतेच आकस्मिक निधन झाले, तरी त्यांच्या इच्छेची पूर्तता करण्यासाठी सर्व संबंधित नेटाने कामाला लागले आहेत. हा प्रकल्प ठरलेल्या वेळापत्रकाप्रमाणे निश्चित पूर्ण होईल याची त्यामुळेच खात्री वाटते, प्रत्येक मराठी माणसाच्या घरी ज्ञानेश्वरी, तुकारामाची गाथा, दासवोध, एकनाथी भागवत यांच्याचप्रमाणे रियासतीचे खंडही असले पाहिजेत. तरच आपले इतिहासाचे भान अचूक राहील. प्रकाशक रामदास भटकळ यांनी त्या दृष्टीने भरपूर सवलतीच्या किंमतीत रियासत उपलब्ध करून देण्याचे जाहीर केले आहे. वाचक–ग्राहकांनी या संधीचा लाभ घ्यायला हवा

## कथायात्रा

सुप्रसिद्ध कथाकादंवरीकार व संपादक ह. मो. मराठे यांनी केवळ कथांना वाहिलेले नवे नियतकालिक 'कथायात्रा' सुरू करण्याचे ठरविले आहे, प्रत्येक अंक

हा पुस्तकाच्या आकारातला विशेष अंक असेल आणि एकेका कथाकाराच्या निवडक कथा त्यात संगृहीत केलेल्या असतील. केवळ मराठीच नव्हे तर अन्य भारतीय व जागतिक कथाकारांच्या कथांचा कथायात्रेद्वारे सम्यक् परिचय होईल आणि जागतिक कथावाङ्मयाचे व्यापक दर्शन त्याद्वारे घडू शकेल. दहा अंकांसाठी फक्त शंभर रुपये असा आकार त्यासाठी घेण्यात येणार आहे. या उपक्रमालाही वाचकांना भरघोस प्रतिसाद मिळायला हवा असे वाटते. ह. मो. मराठे यांच्या संपादन कौशल्याची प्रचीती 'लोकप्रभा' व 'घरदार' यांच्या विक्रीत झालेल्या नेत्रदीपक वाढीमुळे आलेलीच आहे तेव्हा कथायात्रेचा हा उपक्रमही ते यशस्वी करून दाखवतील यात शंका नाही. म. सा. पत्रिकेतर्फे त्यांना शुभेच्छा.

## अमरावती साहित्य संमेलन

जानेवारी १९८९ च्या अखेरच्या आठवड्यात येथे ६२ वे अ. भा. मराठी साहित्य संमेलन भरणार आहे.

त्यासाठी अध्यक्षांची नावे सुचविण्याची मुदत १५ नोव्हेंबर १९८८ ही असून, नावे परत घेण्याची मुदत २० तारखेपर्यंत आहे. २०–११–८८ रोजी मतदारांकडे मतपत्रिका रवाना होतील. २० डिसेंबर रोजी निर्णय जाहीर होईल.

साहित्य संमेलनाला अधिकाधिक साहित्यप्रेमी रसिक जनांनी उपस्थित राहावे. अधिवेशनातील कार्यक्रम, निवास–भोजन व्यवस्था शुल्क इत्यादी तपशील नंतर वृत्तपत्रातून जाहीर करण्यात येईल. त्याकडे लक्ष ठेवावे. विदर्भात फार दिवसांनी होणारे हे संमेलन. उत्तम कार्यक्रम, उत्कृष्ट संयोजन आणि वैदर्भीय आतिथ्य–अगत्य यामुळे हे संमेलन निश्चितच संस्मरणीय ठरेल. या ऐतिहासिक सोहळ्याला उपस्थित राहणे हा आपल्या जीवनातील एक सोनेरी प्रसंग असेल. तेव्हा हे अधिवेशन चुकवू नये अशी आग्रहाची विनंती आहे.

१९८८ मधील मराठी पुस्तकांचा वेध घेणारा पत्रिकेचा पुढील अंक १ फेब्रुवारी १९८९ रोजी प्रसिद्ध होईल.

## बदनामी विधेयक

हे संपादकीय पूर्ण करण्याआधी दोन महत्त्वपूर्ण वादग्रस्त बाबींचा निर्देश करणे आवश्यक वाटते.

भारतीय घटनेने दिलेल्या लेखन स्वातंत्र्याचा संकोच करण्याचा शासनाकडून कळत नकळत सतत प्रयत्न होत असतो. बदनामीविषयक विधेयक संसदेत मंजूर झाले खरे; परंतु त्यातील अनेक तरतुदी इतक्या भयानक होत्या की वृत्तपत्रांना कुठल्याही भ्रष्ट शासकीय अधिकाऱ्याबद्दल व भ्रष्टाचाराबद्दल लिहिणेच

अशक्यप्राय ठरले असते. बदनामीच्या व्याख्येची व्याप्ती वाढवून, बदनामी झाली नाही हे सिद्ध करण्याची जबाबदारीही या कायद्यान्वये वृत्तपत्रांवरच टाकण्यात आली होती. भारतातील सर्व वृत्तपत्रांनी एक दिवस संपूर्ण बंद पाळून या विधेयकाला असणारा आपला विरोध एकमुखाने व्यक्त केला. शेवटी पंतप्रधानांना हे विधेयक स्थगित केल्याची घोषणा करावी लागली. भारतीय वृत्तपत्रांनी या लढ्यात जी एकजूट दाखवली ती अभूतपूर्व होती. बदनामी विषयक प्रचलित कायदा आणि हा नवा कायदा यावर अर्थातच विचारमंथन होत राहील. वृत्तपत्रीय स्वातंत्र्याची गळचेपी झाली तर लोकशाही निकोप राहूच शकणार नाही ही खूणगाठ मनाशी बाळगणे आवश्यक आहे. साहित्यिकांनाही विधेयक जाचक ठरले असते. साहित्य संस्थांनीही अशा वेळी जागरुकता दाखवण्याची गरज आहे.

## लेखन स्वातंत्र्यावर आघात

दुसरी चिंताजनक घटना म्हणजे सलमान रश्दी यांच्या 'दि सॅटॉनिक व्हर्सेस' या पुस्तकावर घातलेली बंदी ही होय. सलमान हा मूळ भारतीय. शिक्षणानिमित्त इंग्लंडमध्ये गेला आणि तेथेच स्थायिक झाला. मिडनाइटस चिल्ड्रेन या त्याच्या कादंबरीला बुकर प्राइझ मिळाले आणि त्याचे भाग्य उजळले. आजच्या अग्रगण्य इंग्लिश लेखकात त्याची गणना होते. 'दि सॅटॉनिक व्हर्सेस' हे त्याचे पुस्तकही इंग्लंडमध्ये गाजत आहे. त्यात इस्लाम धर्माविषयी काही मजकूर असा आहे की ज्यामुळे इस्लाम धर्मीयांच्या भावना दुखावल्या जाऊ शकतील. म्हणून हे पुस्तक भारतात येण्याआधीच त्यावर बंदी घालण्यात आली. पाकिस्ताननेही त्यावर बंदी घातली. सलमान रश्दी याला सैतान रश्दी म्हणण्यापर्यंत काही इस्लामधर्मीयांची मजल गेली. अशी कोणत्याही पुस्तकावर वा चित्रपटावर बंदी घालणे, दूरदर्शन मालिका मध्येच स्थगित करणे याबाबत भारत सरकारचे धोरण हे अभिव्यक्तीच्या स्वातंत्र्यावर आघात करणारे आहे. म्हातारी मेल्याचे दुःख नाही, पण काळ सोकावतो. एखाद्या पुस्तकावर बंदी घालणे हा सरकारचा अधिकार असला तरी तो ऊठसूट वापरणे योग्य नाही. सलमान रश्दीचे पुस्तक मुस्लीमांना आक्षेपार्ह वाटले तर मुस्लीम इमामांनी आपल्या अनुयायांना ते न वाचण्याचा आदेश हवा तर द्यावा. सरकारने त्यावर बंदी घालण्याचे कारण नाही असाही एक युक्तिवाद केला जातो. साहित्यिक-कलावंत म्हणून आपण कोणती भूमिका घ्यावी हे स्पष्टच आहे. ज्यायोगे आपले लेखनस्वातंत्र्य वा आविष्कार स्वातंत्र्य संकुचित होईल अशा कुठल्याही कृतीचा आपण निषेधच करायला हवा. आणीबाणीत काय घडले याचा इतिहास ताजा आहे. लेखक-कलावंतांच्या अभिव्यक्तीवर शासकीय अंकुशाचे सतत दडपण असेल तर आपले समाजजीवनच लाचार आणि बंदिस्त होऊन जाईल. लेखक

कलावंतांनी स्वतः काही पथ्ये पाळणे, आचारसंहिता राबवणे आणि शासनाने निर्बंध लादणे यात दोन ध्रुवांचे अंतर आहे. आविष्कार स्वातंत्र्याचा आग्रह धरताना मराठी लेखकांचा आवाज खणखणीतच असायला हवा.

दीपावली व नूतन वर्ष मराठी सारस्वताला आणि मराठी भाषेला नववैभव देणारे ठरो हीच आकांक्षा.

**शंकर सारडा**
संपादक

## महाराष्ट्र साहित्य परिषद

### साहित्यिक साहाय्य निधी

वृद्ध, अपंग आणि निराधार साहित्यिकांना आर्थिक साहाय्य देण्यासाठी महाराष्ट्र साहित्य परिषदेने १९८७ साली साहित्यिक साहाय्य निधी जमा करण्याची योजना हाती घेतली होती. या निधीला सढळपणे देणग्या देऊन साहित्यप्रेमी जनतेने साहित्यिकांबद्दलची आपली कृतज्ञता व्यक्त करावी, असे आवाहन वेळोवेळी करण्यात आले होते. या आवाहनाला साहित्यप्रेमी संस्था आणि व्यक्ती यांनी, तसेच साहित्य परिषदेच्या सभासदांनी उत्तम प्रतिसाद दिल्यामुळे ३० जून १९८८ पर्यंत एक लाख रुपयांचा साहित्यिक साहाय्य निधी जमा झालेला आहे. हा निधी जमविण्यास ज्या साहित्यप्रेमी रसिकांनी हातभार लावला त्यांचे आम्ही अतिशय आभारी आहोत.

जमलेल्या निधीच्या अंतरिम व्याजातून दि. २७ मे १९८८ रोजी झालेल्या साहित्य परिषदेच्या ८२ व्या वर्धापनदिन समारंभात, वयोवृद्ध साहित्यिक डॉ. वा. भा. पाठक यांना रु. ५०००/– आणि अहमदनगरचे तरुण कथालेखक श्री. अशोक थोरे यांना वैद्यकीय मदतीसाठी रु. १०००/– असे मानधन देण्यात येऊन, या निधीच्या प्रत्यक्ष कार्यवाहीस आरंभ करण्यात आला आहे, हे जाहीर करताना आनंद होतो.

दर वर्षी अधिकाधिक साहित्यिकांना जास्तीत जास्त मानधन देता यावे यासाठी किमान पाच लाख रुपयांचा साहित्यिक साहाय्य निधी जमविण्याचा साहित्य परिषदेचा सकल्प आहे. हा संकल्प शक्य तितक्या लवकर पूर्ण करण्यासाठी सर्व साहित्यप्रेमी रसिकांनी जास्तीत जास्त रकमेची देणगी रोख, चेकने किंवा ड्राफ्टने ' महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे ' या नावाने पाठवावी. अशी आग्रहाची विनंती आहे. या निधीसाठी दिलेल्या देणगीला आयकरातून सूट मिळणार असून देणगीची रीतसर पावती लगेच पाठविण्यात येईल. देणगीदारांची नावे महाराष्ट्र साहित्य पत्रिकेच्या अंकातून प्रसिद्ध करण्यात येतील.

| | | |
|---|---|---|
| **म. श्री. दीक्षित**<br>कोषाध्यक्ष | **राजेंद्र बनहट्टी**<br>कार्याध्यक्ष | **ग. प्र. प्रधान**<br>अध्यक्ष |
| **गं. ना. जोगळेकर**<br>कार्यवाह | **ज्योत्स्ना देवधर**<br>कार्यवाह | **चिं. शं. जोशी**<br>कार्यवाह |

अनुक्रमणिका

# श्रद्धांजली

---

## फत्तेसिंगराव गायकवाड

वडोद्याचे संस्थानाधिपती व माजी खासदार फत्तेसिंगराव गायकवाड यांचे दि. १ सप्टेंबर १९८८ रोजी वयाच्या ५८ व्या वर्षी निधन झाले. पॅलेसेस ऑफ इंडिया हा त्यांचा ग्रंथ जगभर गाजला. स्टेटस् ऑफ इंडियन वुमेन, श्राइन्स ऑफ इंडिया (Shrines of India) या संकल्पित ग्रंथांचीही तयारी ते करीत होते. मराठयांच्या इतिहासाबद्दल त्यांना आस्था होती. रियासतकार गो. स. सरदेसाई यांच्या मराठी रियासतीच्या पुनर्प्रकाशनाच्या कामाला चालना मिळावी म्हणून प्राथमिक खर्चासाठी त्यांनी ५० हजार रुपयांची देणगी दिली. हे पुनर्मुद्रण ठरलेल्या वेळापत्रकाप्रमाणे पार पाडणे ही जबाबदारी आपल्यावर आहे. त्यांना आमची श्रद्धांजली.

## पु. शं. पतके

म. सा. परिषदेचे एक भूतपूर्व कोषाध्यक्ष श्री. पु. शं. पतके १२ ऑक्टोबर रोजी पुणे येथे निधन पावले. (वय ७७) पुण्यातील आणि बृहन्महाराष्ट्रातील अनेक सार्वजनिक चळवळींमध्ये गेली पन्नास वर्षे ते निरपेक्षपणे कार्य करीत होते. साहित्य, नाटय, रोटरी क्लब, ज्येष्ठ नागरिक संघ, घरमालक संघ वगैरे त्यांच्या कार्याची क्षेत्रे होती. त्यांच्यासारखा निष्ठावान साहित्यप्रेमी कार्यकर्ता निधन पावल्यामुळे सार्वजनिक क्षेत्राची मोठी हानी झाली यात शंका नाही. परिषदेची त्यांना विनम्र श्रद्धांजली.



अनुक्रमणिका

## माधव वाटवे

सुप्रसिद्ध नट व दिग्दर्शक माधवराव वाटवे यांचे कर्करोगाने वयाच्या ६० व्या वर्षी १० ऑक्टोबर १९८८ रोजी निधन झाले. एक होता बाजीराव, संध्याछाया इ. नाटकातील त्यांच्या भूमिका गाजल्या होत्या. पैलतीर या पत्रकाराच्या जीवनावरील दूरदर्शन मालिकेतील त्यांची ध्येयवादी संपादकाची भूमिकाही लोकप्रिय ठरली होती. कॉलेजमध्ये असताना त्यांचा कवितासंग्रह प्रसिद्ध झाला; परंतु पुढे ते नाटयक्षेत्रात अधिक रमले. अभिनयकलेवर त्यांनी एक पुस्तक लिहून पूर्ण केले आहे. त्याचे यथावकाश प्रकाशन होईलच.

एक तरुण नट शशिकांत निकते यांचे अल्पवयातच निधन झाले. नट म्हणूनच जगायचे; अन्य नोकरीचाकरीत पडून फावल्या वेळात नाटयक्षेत्र अशी तडजोड करायची नाही असा ठाम निर्णय घेऊन निकते यांनी स्वतःला या क्षेत्रात झोकून दिले. ते अनेक नाटकात चमकले. अवघ्या पंचेचाळीसाव्या वर्षी त्यांचे देहावसान व्हावे हे मराठी रंगभूमीचे दुर्दैवच म्हणायला हवे.

गीतकार वसंत निनावे यांचेही ऑगस्ट ८८ मध्ये देहावसान झाले.

सोलापूरचे एक ज्येष्ठ पत्रमहर्षी, 'विश्व समाचार' चे संपादक बाबुराव जक्कल यांचेही नुकतेच निधन झाले.

या सर्वांच्या कुटुंबियांच्या दुःखात आम्ही सहभागी आहो.



अनुक्रमणिका

# श्री. के. क्षी. आणि मी

## गोपीनाथ तळवलकर

---

१९२८ सालची गोष्ट असावी. आमच्या गिरीशांचे घर हे एक साहित्याची चावडीच होती. या ठिकाणी त्यावेळच्या बहुतेक श्रेष्ठ साहित्यिकांच्या ओळखी झाल्या. ४६१ शनिवार हा त्या घराचा नंबर – फार लोकप्रिय होता. एके दिवशी मी तेथे गेलो तेव्हा माडीवरच्या दोन खिडक्यांत दोन माणसे बसली होती. एक आमचे श्री. गजाननराव माडखोलकर, दुसरे गृहस्थ तरुण होते. वर्ण तेजस्वी पण काळा डोक्यावर केशभार विपुल. डोळे कशाचा तरी शोध घेणारे, पण सतेज आणि स्थिर. त्यांच्या अंगात रेशमी कोट होता. धोतर आणि शर्ट, आज जाहिरातीत दाखवितात त्याप्रमाणे स्वच्छ होते. गिरीश ओळख करून देताना म्हणाले, "बरे कारे गोपीनाथ, हे आमचे क्षीरसागर. माधवराव पटवर्धनांचे खास स्नेही. माधवराव आपली नवी कविता पहिल्यांदा ह्यांना दाखवितात." त्या गृहस्थांनी हसून प्रणाम केला. गिरीश पुढे आपल्या विशिष्ट पद्धतीने म्हणाले, "हे विनोदही करतात." 'गाणे म्हणतात किंवा पेटी वाजवितात,' असे जसे सांगावे तसे गिरीशांनी मला त्यांच्या ह्या कलेबद्दल सांगितले.

आणि त्याचा प्रत्यय त्याच बैठकीत मला आला. माडखोलकरांनी आपल्या शोधक दृष्टीने रस्त्याकडे पाहिले आणि म्हटले, "काहो शंकरराव, ही किती सुंदर स्त्री आहे?" लगेच ते पुढे म्हणाले, "पण फार ढब्बी आहे बुवा!" अर्थात तेथे असलेल्या मंडळींत एकच विचार होता की, आत्ता ह्या विद्वानाने ज्या स्त्रीला सुंदर म्हटले तिला त्याने लागलीच लठ्ठ असे कसे म्हटले? ह्यावर क्षीरसागर म्हणाले, "अहो, काही माणसे आपलीच सही करतात आणि त्यानंतर खाली एक रेघ ओढतात. ती कित्येकदा त्या सहीतून जाते. म्हणजे ती सही खोडली जाते. तसे काहीसे माडखोलकरांच्या विधानाचे झाले आहे." आम्ही सर्व मनःपूर्वक हसलो.

विनोद या क्षीरसागरांच्या ज्या विशेषाचा गिरीशांनी उल्लेख केला होता तो आत्ताच पाहावयास मिळाला.

ह्यानंतर क्षीरसागरांचा आणि माझा ऋणानुबंध सदैव वाढतच गेला.

श्री. के. क्षी. हे नाव आता मराठी साहित्यात चिरस्थायी झाले आहे. प्रशंसा किंवा टीका करण्याकरिता समीक्षकांना त्यांचे नाव घ्यावेच लागते. अशा बुद्धिमान, चिकित्सक पण भावनाशील गृहस्थाचा स्नेह पन्नास वर्षे मिळाला ही फार भाग्याची गोष्ट मी समजतो. माझ्या पंचाहत्तराव्या वाढदिवसानिमित्त बोलताना श्री. शिवाजीराव भोसले म्हणाले, "क्षीरसागरांसारख्या महान व्यक्तीचा स्नेह पन्नास वर्षे मिळाला हेही नानांचे एक वैशिष्ट्य मी म्हणतो." अर्थात हा स्नेह टिकविण्या-करिता कुठल्याही तऱ्हेने मी प्रयत्न केले असे नाही. तरीपण ह्या उल्लेखाने मला फार आनंद झाला. आणि त्या रात्रीच मी फोनवर श्रीमती क्षीरसागर यांना हा माझा आनंद कळविला.

मी ज्यावेळची गोष्ट सांगत आहे, त्यावेळी श्री. के. क्षी. हे तुकाराम आश्रमात राहात असत. मी, निरंतर आणि श्री. के. क्षी. ह्यांची रोज बैठक असे. समोर ज्यांचा बंगला होता ते मास्टर कृष्णराव कधीतरी जातायेता आमच्यात सामील होत. अगदी अलीकडे ज्ञानेश्वर अभ्यास मंडळात उत्साहमूर्ती असलेले आप्पासाहेब जोशी एकदा म्हणाले, "नाना, मी त्यावेळी श्रीकेक्षींच्या समोर राहत असे. तुम्ही, निरंतर आणि श्री. के. क्षी. हे रस्त्यावर बोलत उभे राहावयाचे तेव्हा मी आणि त्यावेळच्या मुलांनी एक विनोदी वाक्य तयार केले होते. श्रीकृष्ण गोपीच्या मागे निरंतर असतो." आमच्यात भैय्या उमराणी हेही केव्हा येऊन मिसळत. पण ते लांब राहात असल्यामुळे नेहमी येऊ शकत नसत.

श्री. के. क्षींचे सर्व काही विचित्र आणि विसंवादी असे होते. पण त्यात काही शिस्त होती. भारतीय संस्कृतीवर त्यांचे नितांत प्रेम असे. पण आम्ही त्यांना 'हजरत' म्हणत असू. हे त्यांना फार आवडे. इक्बाल यांना ते 'अल्लाम्मा' असे म्हणत आणि नौत्शेचा हा आधुनिक अवतार आहे अशी त्यांची श्रद्धा होती. त्या-वेळी प्रख्यात असलेले दोन चित्रपट 'लैला मजनू' आणि 'शिरीं फरहाद' यावर बेहद्द खूष होते. एकदा वाटेने टपालवाला भेटला आणि श्री. के. क्षींच्या नावाने एक रजिस्टर बुकपोस्ट आले— असे तो सांगू लागला. त्यांनी सही करून ते बुकपोस्ट घेतले. मी अतिशय कुतूहलाने ते फोडले, 'लैला मजनू' आणि 'शिरीं–फरहाद' ह्यांची देवनागरी लिपीत असलेली ती पुस्तके होती. त्यांच्यावर ह्या दोन चित्र-पटांचा किती परिणाम झाला असेल हे आठवले तरी नवल वाटते. एकदा आम्ही नेहमीप्रमाणे लष्करमध्ये फिरावयाला गेलो. त्यांनी गल्ली-कुचीतून एका सामान्य

हॉटेलात मला नेले. लष्करात एवढी चांगली हॉटेल्स असताना ह्या भिकार हॉटेल-मध्ये आपण का आलो असे मी विचारले. मागून ह्याचे मी उत्तर देईन असे ते म्हणाले. चहा वगैरे झाल्यावर काऊंटरपाशी जेव्हा आम्ही पैसे द्यायला आलो तेव्हा पैसे घेणाऱ्या जाडजूड बाईस मागून एकाने हाक मारिली 'शिरीन' श्री. के. क्षी. हसून म्हणाले, "आता तुला कळले असेलच. ह्या हॉटेलात मी का येतो." पुढे त्यांनी मला असेही सांगितले की यातल्या एका नोकराचे नाव तैमूर आहे. अर्थात हाही एक त्यांच्या आकर्षणाचा विषय असावा. तें शाळेच्या संमेलनात भाग घेत. बहुधा नाचाचे पद त्यांचे असायचे–

यमुनेच्या जळी पाणी की खोल खोल
वाकू नको गडे जाईल तोल तोल ।।
यमुनेच्या जळी कालिया काळा,
पाठीराखा सख्या हरी सावळा;

हे सांगण्याचे कारण पहिल्या दोन ओळी त्यांना 'लैला मजनू' ह्या चित्र-पटावरून सुचल्या होत्या. त्या ओळी अशा :

फसले वहार आई, घटा घन
घोर घोर
कोयलकी कूक प्यारी मच
आई शोर शोर;

इतकी ही दोन चित्रे त्यांच्या मनात घर करून बसली होती. या चित्रावर जो प्रेम करीत नाही, त्याला आपल्यावरही प्रेम करण्याचा अधिकार नाही, असे ते म्हणत.

बिगडी के बनाने की तदबीर-नहीं बनती
तदबीर नहीं बनती
तस्वीर बनाता हूँ तकदीर नही बनती
× × ×
शमा तो जल चुकी अपने परवाने के पास
ऐ वफा ले चल मुझे अपने दीवाने के पास

अशी दोन पद्ययुग्मे त्यांना फार आवडत. एकाचा उपयोग त्यांनी आपल्या आत्म-चरित्राचे नाव ठेवण्यात करून घेतला. दुसऱ्याचा डॉ. केतकर यांच्यावर ललितरम्य असा मृत्युलेख लिहिताना उपयोग करून घेतला. या दोन चित्रपटांत नायक–नायिका असलेली जोडी म्हणजे निसार आणि कज्जन, त्यांच्या दृष्टीने अलौकिक

होती. लैला–मजनूंचा नवा अवतार झाला तेव्हाही तो त्यांनी पाहिला. मी त्यांना त्याबद्दल मत विचारले, तेव्हा ते म्हणाले, "अरे, शेक्सपिअरच्या रोमिओ अॅण्ड ज्युलिएटप्रमाणे, लैला–मजनू हे अप्रतिम प्रेमकाव्य आहे." मला आठवते, माझा मेव्हणा (वसंत फळणीकर) हयाला त्यातली एक गज्जल चांगली म्हणता येई. तो येथे आला की श्री. के. क्षीं. कडे जाऊन ती गज्जल त्यांना म्हणून दाखवायची असा त्याचा क्रम असे. या कार्यक्रमाने श्री के. क्षी. खूप आनंदून जात.

तेरा जलवा जिसने देखा,
वो दीवाना हो गया ।।

ही ती रचना असावी.

श्री. के. क्षी. आणि मी यांच्या वृत्तीत फार अंतर होते. मी अगदी नेमस्त आणि ते पूर्ण क्रांतिकारक. मोठी उपमा घेऊन सांगायचे तर ते 'भगतसिंग' आणि मी 'गोखले' असे होते. त्यांच्या आत्मचरित्रपर ग्रंथात माझे अनेक उल्लेख आहेत पण ते सर्व ज्याला इंग्लिशमध्ये Faint Praise असेच आहेत. मला ते नेहमी म्हणत तू आळशांचा राजा आहेस. ते असेही म्हणत देशात दगदग निवारण मंडळ अशी एखादी संस्था स्थापन झाली तर तुझी अध्यक्ष नात्याने एकमताने नेमणूक केली जाईल. पण काही शाश्वत मूल्यांवर त्यांची जशी श्रद्धा होती तशीच ती माझीही आहेत हे ते मान्य करीत. माझ्या 'आशियाच्या धर्मदीपा'मधील येशू ख्रिस्ताचे चरित्र त्यांना जेव्हा मी वाचून दाखविले तेव्हा ते अगदी भारावून गेले. पुढे या पुस्तकावर लिहिताना त्यांनी असे लिहिले की पुस्तकाला असा लेखक मिळाला की लेखकाला या पुस्तकासारखा विषय मिळाला हे सांगणे कठीण आहे. माझ्या स्मरण-शक्तीबद्दल आणि बुद्धिमत्तेविषयी त्यांना अतिशय आदर होता. त्यांचे म्हणणे इतकेच असे की, कुठल्याही कलाकृतीत मी आपला जीव ओतीत नाही. भिडस्तपणा हा एक दुर्गुण माझ्या अंगी आहे असे त्यांना वाटे. "बर्फाच्या डोंगराप्रमाणे एक भाग प्रकाशात आला आणि सहा भाग जगाला अज्ञातच राहिले, अशी तुझी अवस्था आहे. पण जो भाग लोकांना दिसतो त्यामानाने तुझे यश खूप दिसण्यासारखे आहे" असे ते म्हणत.

मला ते मित्र आणि वाङ्मयीन सहकारी म्हणत. इंग्रजी आणि मराठी साहित्यातील फार मोठ्या व्यक्ती त्यांना आणि मला सारख्याच प्रिय होत्या. पायी फिरण्याचा छंद आणि मधून मधून चहा घेणे यात आमचे फार जुळत असे. त्यांची अतींद्रिय गोष्टींबद्दलची श्रद्धा मात्र यात आली नव्हती. ज्योतिषावर त्यांचा गाढ विश्वास होता. मला या ठिकाणी एक गोष्ट सांगावीशी वाटते. आम्ही पुरंदरे कॉलनीत तळवलकरांच्या विष्णुपद या बंगल्यात राहात होतो त्या ठिकाणी रोज

रात्री श्री. के. क्षी. माझ्याकडे गप्पागोष्टी करण्याकरिता येत. एकदा लागोपाठ आठ दिवस ते आले नाहीत, म्हणून मी तुकाराम आश्रमात गेलो. ते आजारी आहेत की काय असे भय मला वाटले होते. अर्थात त्यांना तंदुरुस्त पाहून मला फार आनंद झाला. श्री. के. क्षी. हसून म्हणाले, "तू का आलास याचे कारण मला माहीत आहे. पण एका साप्ताहिकात असे आले होते की सरपटणाऱ्या प्राण्यापासून तुम्हाला धोका आहे. तुमच्याकडे रस्त्यावर दिवे नाहीत म्हणून हा घातक आठवडा गेल्यावर तुझ्याकडे येण्याचे मी ठरविले." अर्थात एवढ्या बुद्धिमान माणसाची ही भीती पाहून मला फारच गंमत वाटली.

पण या शारीरिक भीतीचा अडथळा त्यांच्या ध्येयात्मक जीवनात कधीही आला नाही. अहंकार आणि आत्मविश्वास यांत एक पुसट रेषा असते. श्री. के. क्षी. यांना आपण सांगतो तेच बरोबर आहे याची बरोबर खात्री असे. आपल्या अहंतेला स्पर्श केलेला त्यांना मुळीच चालत नसे. मला हॉटेलामधील एक प्रसंग आठवतो. मी, निरंतर आणि श्री. के. क्षी. नेहमी बादशाहीत जायचे. एकदा आम्ही बसतो आहोत तोच वेटरने तीन कप चहा आणून ठेवला. तो रागाने परत नेण्यास श्री. के. क्षींनी त्यास फर्माविले. पुढे काही वेळाने त्याच वेटरला त्यांनी तीन कप चहा आणण्यास सांगितले. तेव्हा मी सहज म्हटले, "आताच तुम्ही याला चहा परत नेण्यास सांगितले होते ना?" तेव्हा ते म्हणाले, "पण मला कोणी आपला अदाज घेतो आहे हे खपत नाही. I don't like anyone to predict me. एकदा माझा कार्यक्रम ठरविण्यास लोक आले असता माझा अमुक दिवस रिकामा आहे का असे सहज त्यांना विचारले. तेव्हा ते काही बोलले नाहीत. पुढे या गोष्टीबद्दल मी त्याना विचारले. तेव्हा ते म्हणाले, "मी जणू तुझा पी. ए. आहे. असाच तुझ्या बोलण्याचा रोख होता." मी नम्रपणे म्हटले, "तुमचा मोठेपणा मला ठाऊक आहे. मी तुम्हाला माझा पी. ए. कसा समजेन?" हे वादळ तेथेच शमले. पण ते शमेपर्यंत श्री. के. क्षींनी माझ्याशी अबोला धरला होता. असे अनेक प्रसंग आले. काही वैयक्तिक, काही तात्त्विक, काही सामाजिक, पण अशा प्रत्येक वादळानतर आपण मैत्रीचा डोंगर चढून वर गेलो आहोत अशी भावना होई. यातील सर्व श्रेय मी पुष्कळसे त्यांच्याकडे देतो. कारण अहंकारावर प्रेमाने, अभिरुचीने मात करावी अशी त्यांची मनोवृत्ती होती. त्यांच्या अहंकारामुळे पुष्कळदा कठोर टीका ऐकून घ्यावी लागे. पण ती पुस्तकी नाही, प्रामाणिक आहे अशी खात्री पटे. त्यांचे प्रेम हे इतके प्रभावी असे, की स्वमताचा आग्रह न सोडता ते कायम राहील असे जवळच्या मंडळींना वाटे.

श्री. के. क्षी. हे नेहमीच आजारी असत. माटे मास्तरांप्रमाणे कित्येक लोक मला विचारीत, "काय तुमचे आजारी मित्र काय म्हणतात?" कित्येकदा दोन-चार

विस्किटे आणि दूध हा त्यांचा आहार असे. विठ्ठलराव घाटे त्यांना 'दूध-खुळे' म्हणत. म्हणजे दुधावरच त्यांचा निर्वाह काही दिवस चाले. १९४० साली ते माझ्याकडे आजारी पडूनच आले. त्यानंतर जवळ-जवळ दोन वर्षे ते दुधावरच होते. त्याचे सारे वाङ्मयीन कर्तृत्व त्यानंतर झालेले आहे. अर्थात प्रियजनांची निगा त्यांना जरूर लाभली; पण त्याहीपेक्षा त्यांची इच्छाशक्ती हेच रहस्य म्हटले पाहिजे. आपण सत्य तेच सांगू ही खात्री त्यांना होती आणि प्रत्येक शब्द हे फूल नसून शस्त्र आहे असे ते म्हणत.

श्री. के. क्षींनी अफाट वाचन केले होते. ते त्यांच्या लिखाणावरून दिसून येईल. त्यांच्या अनेक वाङमयीन हिरोंपैकी नीत्शे हा एक होता. पण त्यांच्या सबंध जीवनावर स्वामी विवेकानंद ह्यांची छाप विशेष होती असे म्हटले तर चूक होणार नाही. १९३३ साली पुण्यात प्लेग झाला होता. आमचे पहिले अपत्य गेल्यामुळे घर उदास वाटे. शहरातसुद्धा वातावरण एकंदर सुतकीच असे. थारेपालट म्हणून आम्ही अडीच-तीन महिने कामशेतला राहावयास गेलो. मधूनमधून मी आनंदच्या आणि इतर कामाकरिता येत असे. श्री. के. क्षींनी पुणे सोडले नव्हते. ते तुकाराम आश्रमातच होते.

माझे काम आटोपले की, त्यांच्याकडे जायचे असा माझा नियम असे. एकदा त्यांची खोली उघडी दिसली म्हणून ते जवळ कोठेतरी गेले असावेत असे मला वाटले. मी त्यांची वाट पाहत गॅलरीत उभा राहिलो. ते एक जाड पुस्तक घेऊन बाहेरून येत होते. मला पाहून ते म्हणाले, " What brought you here, perhaps the local train." ते वर आल्यावर मी निरखून पाहिले तो स्वामी. विवेकानंदांचा तो एक भाग होता. विवेकानंद व नीत्शे याप्रमाणे इक्बाल, जलालुद्दीन रुमी, शोपेनहॉर हे त्यांचे आवडते लेखक होते. तेव्हा एकदा सहज मी त्यांना म्हटले, " तुमच्या वाङ्मयीन गोतावळचात अहंकारी लोकांचा गोतावळा फार आहे." यावर त्यांनी उत्तर दिले, " अरे, तुला खरा अहंकार ठाऊक नाही असेच मी म्हणेन. आपल्या सामर्थ्याबद्दल खात्री आणि जनहिताची कळकळ ही जर अहंकाराची लक्षणे असतील तर तुझे गांधी किंवा विवेकानंद हेही त्यातून सुटणार नाहीत." पुढे त्यांनी एकदा चार कवितेच्या ओळी मला दाखविल्या आणि या महंमद इक्बालच्या आहेत असे ते म्हणाले.

The song of the Bulbul may come again or not,  
The message of Hejaj may come again or not,  
The journey of this medicant is at an end  
The philosopher like this may again be born or not.

याचे मूळ शोधून काढण्यात त्यांनी किती फारसी पंडितांची मदत घेतली ती त्यांनाच माहीत. हेच त्यांचे आत्मनिवेदन होते की काय नकळे.



अनुक्रमणिका

प्रख्यात धन्वन्तरी डॉ. ह्. वि. सरदेसाई यांचे त्यांनी काही काळ औषध घेतले.

त्यांना दुधावरून अन्नावर आणण्यात डॉ. पुरोहितांचा भाग बराच मोठा आहे यात शंका नाही. डॉ. पुरोहितांच्याकडे ते नियमाने जेवू लागले. औषधोपचारामध्ये त्यांना होमिओपाथी ही अधिक गुणकारी वाटे. डॉ. साठे (V. V. & Co.) ह्यांच्या औषधावर त्यांची पूर्ण श्रद्धा होती. त्यांच्या पत्नीही तोच वारसा पुढे चालवीत आहेत. एखाद्याच्या कुटुंबाशी त्यांचा स्नेह झाला म्हणजे त्यातील लहानमोठी माणसे त्यांना जवळची वाटू लागत. ते भावे स्कूलमध्ये असताना माझ्या धाकट्या भावाला त्यांनीच एका नाटकात काम दिले. आज तो शरद तळवलकर अभिनेता म्हणून गाजतो आहे. मला ते म्हणत, " अरे, आमच्या मेव्हणीचा मुलगा तू एकदा पाहा. तुला फार नवल वाटेल." आणि हे सारे इतक्या सहजतेने असे की, ते मुद्दाम कौतुकाची भूमिका घेत आहेत असे चुकूनही वाटू नये. माझ्या अनेक पुस्तकांपैकी ' गृहरत्ने ' हे त्यांना अत्यंत आवडत असे. याचे एकच कारण म्हणजे वेगवेगळ्या मुलांची खरी-खुरी शब्दचित्रे त्यात होती हे होय !

श्री. के. क्षींच्या एका पुतणीने त्यांच्या पुण्यतिथीच्या दिवशी बोलताना सांगितले की, " नाना आले म्हणजे आमचे काका अतिशय आनंदात असत." यातील माझ्या प्रशंसेचा भाग सोडून दिला तरी एक मात्र खरे की माझ्या सहवासात त्यांच्यातील खेळकरपणा दिसून येई. " अरे, अमक्याची नक्कल कर ", " ती आठवण सांग " अशी त्यांची फर्माईश असे. त्यांनी आणि मी मिळून काही स्त्री-पुरुषांची नावे ठेविली होती. " पीठापुरम् काय म्हणते ?" " वाडीयन तुला भेटली होती का ?" " शालीन कवीचे कसे चालले आहे ?" " तुमचे कायद–आझम फार विचित्र दिसतात बुवा !" " जोधाबाईची गाठ पडली होती का ?" " करिन यदुमनी काय म्हणतात ?" ह्यात त्यांच्या विनोदाचा स्पर्श होई आणि त्यांचा खेळकरपणा मार्मिकता दिसून येई.

एकदा मात्र त्यांना निराश करण्याचा प्रसंग आला. पण त्यातून आमच्या संभाषणाची इतकी उंची जाईल असे वाटले नव्हते. त्यावेळी मी पत्नीच्या चिरवियोगामुळे जरा उदास होतो. नेहमीचा हास्यविनोदाचा पूर आटून संभाषणात अगदी निरसपणा येत होता. तेव्हा श्री. के. क्षी. मला म्हणाले, " आज तू काही मूडमध्ये नाहीस. आज हसण्यासारखे तू काहीच बोलला नाहीस." तेव्हा मी त्यांना म्हटले, " खरोखर आज माझेही चित्त ठिकाणावर नाही. तुम्ही मला काही फसवू–हसवू शकणार नाही. तांब्यांच्या त्या ओळी मुद्दाम सांगाव्याशा वाटतात–

कमलवनी वायूस निमंत्रुनि,
मजलस भरवुनि मद्य पाजुनी;

कळ्या हसव गुदगुल्या करूनी,
हासविशिल ना मला–उदार चंद्रा !
तुला नमुनि मी मार्ग क्रमि आपुला."

–यावर काही वेळ ते स्तब्ध झाले आणि नंतर सद्‌गदित होऊन म्हणाले, "खरोखर तांब्यांच्याप्रमाणे कवी होणे विरळाच म्हटले पाहिजे. निराशासुद्धा किती काव्यमय असू शकते याचे तांबे हे उत्कृष्ट उदाहरण आहे. माधवराव नेहमी म्हणत ते अशावेळी खरे वाटते ते म्हणावयाचे, 'तांबे आणि ताजमहाल यांपैकी एके ठिकाणी जाण्याचा जर कोणी मला पर्याय दिला तर मी तांबे पत्करीन– म्हणजे तांब्यांच्या-कडेच जाईन." श्री. के. क्षींना तांब्यांबद्दल वाटणारी प्रेमबुद्धी अनेक ठिकाणी प्रकट झाली आहे. 'संभाषणाची कला' या त्यांच्या निबंधात तांबे आणि माधवराव पटवर्धन हे दोघे अतिशय संभाषणचतुर होते असे त्यांनी सांगितले आहे. ते म्हणत, ,''वाटले नाथ हो', 'रुद्रास आवाहन', 'या भविष्याचिया' इत्यादी त्यांच्या राष्ट्रीय कविता देखीलसुद्धा केवळ प्रासंगिक नसून उत्तम काव्यसंपदेमध्ये त्यांची गणना व्हावी अशा आहेत." सौंदर्यवादाचा शेवट अध्यात्मवादात व्हावा हे त्यांचे आवडते सूत्र होते. ह्या सूत्राच्या स्पष्टीकरणासाठी ते नेहमी तांब्यांचे उदाहरण देत. इतका आत्मरत, शब्द आणि सूर यांच्यावर सारखीच हुकमत असणारा असा कवी मराठीत झाला नाही असे त्यांचे मत होते. 'केशवसुत आणि तांबे' ह्या मृत्यूच्या आधी काही दिवस प्रसिद्ध झालेल्या त्यांच्या पुस्तकात त्यांनी तांब्यांचा फार गौरव केला आहे. एकदा तांब्यांच्या एका कवितेवर रवींद्रनाथांच्या गार्डनर-मधील एका कवितेची छाप पडली आहे असे विधान माधवरावांनी केले. तेव्हा खवळून जाऊन श्री. के. क्षींनी ते विधान सप्रमाण खोडून काढले. तांब्यांवर त्यांचे गाढ प्रेम होते.

मास्तर या उपाधीबद्दल त्यांनी कधी तक्रार केली नाही. मी त्यांना नेहमी म्हणावयाचो की, प्रख्यात नाटककार राम गणेश गडकरी ह्यांची आठवण तुम्हाला पाहून होते. तशीच प्रकृती, तशीच तीक्ष्ण बुद्धी आणि तसाच अहंकार. त्यांच्या एका पुण्यतिथीचे मुख्य वक्ते म्हणून प्रा. स. शि. भावे म्हणाले, "प्राध्यापक झाल्यावर आपल्या पदव्या अधिक मोठ्या कराव्यात अशी महत्त्वाकांक्षा असलेली माणसे आपण पाहतो. पण महाराष्ट्रात अशी तीनच माणसे मला आढळली. फक्त बी. ए. या उपाधीवर त्यांनी समाधान मानले. त्यापेक्षा मोठ्या पदव्या मिळविण्याचा हव्यास त्यांनी मानला नाही. ते तीनजण म्हणजे न. र. फाटक, म. म. दत्तो वामन पोतदार आणि प्रा. क्षीरसागर हे होत." अर्थात अशी वृत्ती असण्यात एक तऱ्हेचा आत्मविश्वास लागतो. श्री. के. क्षी. प्राध्यापक झाल्यावर कोणी विद्वान पंडित म्हणाले, या कॉलेजात साधे लेक्चरर असणारेसुद्धा आपणास प्राध्यापक



अनुक्रमणिका






म्हणवून घेतात. तेव्हा श्रीकेक्षी म्हणाले, ‘ Why ? Some professors are no professors.’ यात त्यांनी आपल्या इंग्लिशची समज तर दाखविलीच पण पुष्कळ प्राध्यापकांच्या ज्ञानातला पोकळपणाही दाखवून दिला. इंग्रजीवर त्यांचे फार प्रभुत्व होते हे ‘ सुफी पर्ण ’वरून दिसून येते. पण हे अस्त्र त्यांनी काढले नाही.

श्री. के. क्षी. हे प्राध्यापक झाल्यानंतरही आम्ही निकटवर्ती लोक त्यांना मास्तर असेच म्हणत असू. माटे मास्तर, गडकरी मास्तर, ही माणसे लहान होती काय ? त्यांच्या मास्तर या उपाधीमध्ये कोणालाही कमीपणा वाटत नसे मग श्रीकेक्षींना तो वाटण्याचे कारणच नाही. किंबहुना ज्या नावाने आपण प्रसिद्ध असतो तेच नाव माणसाला अधिक आवडते. जनरल स्मट्स हे पुढे फील्ड मार्शल झाले. पण ते नेहमी म्हणावयाचे, ‘ मला जनरल स्मट्स म्हणवून घेणेच आवडते.’

माधवराव आणि श्रीकेक्षी ह्यांचे परस्परांशी संबंध फारच प्रेमाचे होते. माधवराव वास्तविक माझे गुरू आणि ज्येष्ठ मित्र. त्यांच्या अगाध विद्वत्तेबद्दल आणि असामान्य प्रतिभेबद्दल मला विलक्षण आदर होता. पण मला किंवा माझ्या सोंगड्यांना माधवरावांची श्रेष्ठता कळली ती क्षीरसागरांमुळे हे नाकारता येत नाही. कित्येक विद्वत्रत्ने श्री. के. क्षींमुळेच आम्हाला उमगली. गुरुवर्य विनोद, आहिताग्नी राजवाडे, डॉ. केतकर ह्यांचा मोठेपणा श्री. के. क्षींनीच पटवून दिला. माधवरावांची एक गोष्ट मला अजूनही आठवते. एकदा रात्री साडेनऊचे सुमारास माधवराव मजकडे आले. उमर खय्यामच्या रुबाया ह्या त्यांच्या पुस्तकाची एक कोरी प्रत त्यांच्या हातात होती. ते मला म्हणाले, “ चल, आजच हे माझे पुस्तक माझे हाती आले आहे. हे मी क्षीरसागरांना अर्पण केले आहे. आजच ते त्यांना दिले पाहिजे.” आम्ही तुकारामआश्रमाची वाट धरली. श्रीकेक्षी खूपच आजारी होते. तशा स्थितीतही एका मोठ्या कवीने अर्पण केलेल्या पुस्तकाचा त्यांनी आनंदाने स्वीकार केला. पुढे माधवराव गेले तेव्हा कित्येक दिवस माधवरावांच्या आठवणींनी ते विव्हळ होत. समदुःखी म्हणून मला ते आपले दुःख बोलून दाखवीत.

श्री. के. क्षींना कोठलाही विषय अगम्य नव्हता. या बाबतीत महाकवी कालिदासाची एक उक्ती मला आठवते. त्याने एके ठिकाणी म्हटले आहे– बुद्धिमंतांना कोणताही विषय आकलन करता येत नाही असे नाही. (न खलु धीमताम् कश्चित् अविषयो नाम) श्री. के. क्षींना हे बरोबर लागू पडे. त्यांनी आपल्या उदंड निबंधांतून अनेक विषय हाताळले. त्यांना मी एकदा म्हटले, “ तुम्ही कासवापासून शंकराचार्यांपर्यन्त कोठल्याही विषयावर लिहू शकाल.” यावर ते हसून म्हणाले, “ ह्या दृष्टान्त खास तुझा असा वाटत नाही. हे विधान इंग्रजीवरून तू घेतले असावेस.” यावरून श्रीकेक्षींची बुद्धी किती सूक्ष्म आणि चिकित्सक होती हे कळून येईल. मी त्यांचा

आक्षेप तत्काळ कबूल केला आणि म्हटले, "तुम्ही बरोबर ओळखलेत. From a turtle to the Arch Bishop of Canterbury याचे हे स्वैर रूपांतर आहे."

त्यांच्या या सर्वगामी बुद्धिमत्तेबद्दल एक प्रसंग आठवतो. मी आगगाडीने मुंबईला चाललो होतो. साधारण पळसदरीच्या स्टेशनजवळ एका प्राध्यापकाचे माझ्याकडे लक्ष गेले. सदर प्राध्यापक इतके ठेंगणे होते की ते उभे असताना मला लांबून आपल्या आसनावर बसल्यासारखेच वाटले. त्यांचा पोशाख काय विचारावा? एखाद्या पोत्यात अडगळ टाकावी त्याप्रमाणे इंग्रजी पद्धतीच्या कपड्यात त्यांचा देह कोंबला आहे असे वाटे. मला पाहताच त्या सज्जन गृहस्थाला आनंद झाला. ते मला एकदम म्हणाले, "काय हो, हा 'स्टॅफोर्ड क्रिप्स' काही योजना घेऊन भारतात आला आहे, ह्यावर तुमचे क्षीरसागर काय म्हणतात?" मी थोडा गोंधळून गेलो. क्रिप्सचे राजकारण आणि श्री. के. क्षी. ह्यांचा संबंध आला कोठे?

ते अध्यापक पुढे म्हणाले, "मी हा प्रश्न विचारला याचे कारण तुमचे क्षीरसागर नेहमी स्वतंत्र विचार करतात. त्यांना क्रिप्सबद्दल काय वाटते हे जाणून घ्यायला मी उत्सुक आहे." मी काय उत्तर दिले हे आता मला आठवत नाही. पण स्वतंत्र उत्तराची अपेक्षा असावी असेही मला वाटले नाही. कारण लगेच कर्जत आले. आणि मला या ठिकाणी व्याख्यान आहे असे म्हणून ते खाली उतरले. त्यांना आपले व्याख्यान आहे याची जाहिरात करावयाची होती की क्षीरसागरांचे मत अजमावयाचे होते याचा मी विचार करीत राहिलो. पण एवढे मात्र खरे की प्रोफेसरमजकुरांच्या या पृच्छेवरून लोक प्रत्येक महत्त्वाच्या गोष्टीवर क्षीरसागर काय म्हणतात हे जाणण्यास उत्सुक होते असे दिसून येई.

एकदा श्री. के. क्षी. माझ्याकडे आले असता मी त्यांचेच एक पुस्तक वाचत बसलो होतो. अर्थात यासंबंधी झालेला आनंद संपविण्याइतके ते ढोंगी नव्हते. ते मला म्हणाले, "अरे, मी तुला माझा नवा लेख वाचून दाखवीत असताना तुझे लक्ष वारंवार खेचून आणावे लागते. आणि आज तू माझे पुस्तक मनापासून वाचतो आहेस हे काय?" यावर मी म्हटले, "मास्तर, तुम्ही आमचे कवी भूषण आहात." लहान मुलाच्या उत्सुकतेने त्यांनी विचारले, "ते कसे काय?" मग त्यांना मी एक किस्सा सुनावला. आमचे कवी दुर्गाप्रसाद आत्माराम तिवारी हे एकदा बाहेर झोपाळ्यावर एक पुस्तक घेऊन तोंडाने काही पुटपुटत होते, 'हा कुठला काव्य-ग्रंथ काढला?' असे मी त्यांना विचारले. तेव्हा त्यांनी म्हटले, 'अहो, संग्राम-गीते लिहिता लिहिता शब्दांचा आवेश कित्येकदा थिटा पडतो. तेव्हा मी हे भूषण कवित्व वाचायला घेतो अशी स्फूर्ती या वाचनाने येते म्हणतात :–

इंद्र जिमी जम्भपर वाडअसु अंभपर
शंभु रति नटवर शेर शिवराज है ।।
तेरा करवाल भयो दख्खन को ढाल भयो
हिंदुको दिवाल भयो
काल तुरकान को

या दृष्टीने मी तुम्हाला भूषण म्हणतो. तुम्हाला ठाऊकच आहे की माझे लेखन अतिशय मवाळ आहे. पण जेव्हा जोरकस शब्द पाहिजे असतात तेव्हा तुमच्या आक्रमक वाङ्मयाचे वाचन मी करतो." हे प्रशंसेचे शब्द ऐकून श्री. के. क्षी. यांना संतोष वाटला. पण त्यांच्या मनात काय आहे हे त्यांच्या उद्गारावरून कळून आले. ते म्हणाले, " खरंच रे, शिवाजीमहाराज एवढे मोठे, त्यांचा पोवाडा गाणारा भूषण हाही किती तेजदार कवी आहे. असे मला नेहमी ऐकवीत जा."

वाङ्मयाचा असा रसास्वाद त्यांनी घेतल्याची अनेक उदाहरणे मजजवळ आहेत. एकदा काहीतरी संदर्भाने मी फोनवरून त्यांना ज्ञानेश्वरांची एक ओवी म्हणून दाखविली.

गुंतलो होतो अर्जुनगुणे ।
आता मुक्त झालो तुझे नि पणे ।
आता सांगणे बोलणे ।
काही नाही ।।

यावर फोनवर स्तब्धता दिसली. मला वाटले की त्यांनी फोन ठेवला किंवा बिघडला. पुढे मला फोन वरचे शब्द ऐकू आले, " काय मराठी ! काय सुंदर शब्दांत ज्ञानेश्वरांनी अर्जुनाचे चित्र रेखाटले आहे !"

श्री. के. क्षी. यांची भाषाशैली रेखीव आणि चित्ताकर्षक होती. त्यांच्या समीक्षा-लेखातही ललित वाङ्मयाचा सुगंध असे. त्यांच्या आवडत्या 'नीत्शे' याने म्हटल्या-प्रमाणे 'माझी शैली म्हणजे एक नृत्य आहे – My style is a dance,' असे त्यांना म्हणता आले असते. आचार्य अत्रे हे तर त्यांच्या शैलीवर बेहद्द खूप होते. एकदा ते म्हणाले, "तुमचे क्षीरसागर काय अप्रतिम भाषा लिहितात ? 'अपोक्त वयातील मोहकल्लोळ' हे वाचून मी तर अगदी मोहित होऊन गेलो." अत्र्यांसारख्या भाषा-प्रभूने कौतुक करावे ह्याहून प्रशंसा ती कोणती ! मला वाटते, कोठल्यातरी एका कादंबरीला श्री. के. क्षींनी प्रस्तावना लिहिली होती तीमधील हा उल्लेख असावा. मी पुष्कळदा त्यांना म्हणे, " तुमचा लेख वाचायचा असला तर रसिकतेबरोबरच खूप व्यासंग असला पाहिजे. तुमच्या दोन वाक्यांत जी कोरी जागा असते त्यातही तुम्ही काहीतरी सांगता. ते कळले तरच पुढील वाक्य नीट ध्यानात येते. श्रीकेक्षींचा सहवास म्हणजे एक बौद्धिक असे. एकच प्याल्याच्या प्रस्तावनेत त्यांनी एक नवीनच

मुद्दा मांडला होता. हे नाटक दारूबंदीवर नसून एका स्वाभिमानी सज्जन मनुष्याची शोकांतिका आहे, असे तीत म्हटले होते. त्यांच्या अनेक स्फोटक लिखाणाप्रमाणे याही प्रस्तावनेवर रणे माजली. त्यावेळी शोकांतिका म्हणजे ट्रॅजेडी याविषयी त्यांनी अफाट वाचन केले होते. अगदी जुन्या युरोपीय वाङ्मयातील FROGS या नाटकाचाही त्यांनी माझ्याजवळ उल्लेख केला. बादशाहीत मी, निरंतर आणि श्री. के. क्षी. फॅमिलीरूममध्ये बसायचे तेव्हा आमचा जो सुखसंवाद होई त्यावरून आपण वाङ्मयाचे धडे घेतले असे सांगणारे अनेक साहित्यिक मला भेटले. श्री. ज. जोशी हे त्यांपैकीच होत.

श्रीकेक्षी ह्यांची सर्वच मते किंवा शेरे मला संपूर्णपणे मान्य असत असे नाही. पण बुद्धीला चालना देण्याचे विलक्षण सामर्थ्य त्यांच्या वाणीत आणि लेखणीत होते, हे खास ! पंडित जवाहरलाल नेहरू हे त्याकाळी आम्हा तरुणांचे दैवत होते. पण क्षीरसागर त्यांना हीरो मानीत नसत. ते म्हणायचे, "तुझा जवाहरलाल म्हणजे चांगल्या प्रवृत्तीचा, योग्य तऱ्हेने शिक्षण मिळालेला, माणूस आहे (A good intentioned man and properly educated)" पण त्यांच्या एवढ्या शब्दांनीच निदान ते नेहरूविरोधी नाहीत असे पाहून बरे वाटे. एकदा एका मोठ्या समाजवादी पुढाऱ्याला भेटून ते आले तेव्हा मी त्यांना या पुढाऱ्यासंबंधी त्यांचे ग्रह काय झाले असे विचारले. त्यावर ते काहीशा तुच्छतादर्शक आवाजात म्हणाले, "या गृहस्थामध्ये तुझ्या नेहरूंचे सारे दोष आहेत पण त्यांचे अंगी असलेला एकही गुण नाही." माझ्या नेहरू-प्रेमाची टिगल करण्यात त्यांना समाधान मिळे. मलाही माझ्यावर टीका करताना का होईना ते नेहरू हे नाव अनेकदा घेतात यातच धन्यता वाटे.

श्रीकेक्षींची राजकीय मते एखाद्या पक्षाशी बांधलेली नसत. त्यांना राष्ट्रीय स्वयंसेवक संघाबद्दल आस्था असे, आणि आमचे मित्र कै. बॅरिस्टर विठ्ठलराव करंदीकर यांनी भोजनाचे निमित्त करून आमची आणि गोळवलकर गुरुजींची भेट घडवून आणली. तेव्हा दोन तास सरसंघचालकांशी श्री. के. क्षी. अतिशय सौजन्याने बोलले. तरी त्यांना संघाची एकाधिकारशाही पसंत होती असे वाटत नाही. एकदा आम्ही चांदण्यात सहल करीत असताना संघाचे सैनिक संचलन करीत चालले होते. तेव्हा श्री. के. क्षी. विनोदाने म्हणाले, "जरा बाजूला हो नाहीतर या पलटणीचा पुढारी वध-ध्वम् असा हुकूम सोडून सैनिकांच्या काठ्या आपल्या डोक्यात मारील." असे जरी असले तरी शिस्त, साधेपणा, निर्व्यसनीपणा इत्यादी संघ-सैनिकांच्या गुणांबद्दल त्यांना आदर होता.

श्री. के. क्षींची एक गोष्ट मला नेहमी चकित करणारी वाटते की, ज्या विभूतींचा कित्येकदा ते उपहास करीत त्यांचा, काही विशिष्ट प्रसंगाने लिहावयाचे झाल्यास

कोणी करणार नाही इतका गौरव ते करीत. आता रवीन्द्रनाथांचेच उदाहरण घेऊ. लोकमान्य टिळक सहज कोठे म्हणाले असतील, " ते एक श्रीमंत कवी आहेत झालं." वास्तविक रवीन्द्रनाथांबद्दलचा लोकमान्यांचा आदर अनेकदा दिसून आला आहे. पण टिळकांच्या एका वचनाचा आधार घेऊन त्यांनी रवींद्रनाथांवर टीकेची झोड उठविली. पण पुणे विद्यापीठातर्फे रवीन्द्रनाथांवर बोलताना त्यांनी तीन व्याख्यांनात रवींद्रनाथांचे विशालत्व इतके उघड करून दाखविले की, कोठल्याही रवींद्रभक्ताने त्यापुढे मस्तक नमवावे. म्हणून मी त्यांना म्हणत असे की, आमची श्रद्धास्थाने किती मोठी आहेत हे आम्हालाही कळत नसेल इतके तुम्हाला कळते. पण तुम्ही कधीकधी त्यांच्याबद्दल इतके उथळपणे बोलता की तुमचा अतिशय राग येतो. टागोरांप्रमाणे कृष्णमूर्तींबद्दलमुद्धा बोलण्याचे त्यांचे हेच धोरण होते. अर्थात या परस्परविरोधी विधानांची संगती माझ्यासारख्या जवळच्या मित्राला कळत असली तरी लोकांची दिशाभूल होई. सुवर्णतुला वाचल्यावर एका मोठ्या माणसाने मला विचारले, " तुमचे क्षीरसागर कृष्णमूर्तींना प्रतिकूल आहेत का अनुकूल ?" या लोकांच्या संभ्रमातच श्री. के. क्षींचे व्यक्तित्व सामावलेले दिसते.

श्रीकेक्षी सकाळी माझ्याकडे यायचे. दारावर त्यांनी काठी आपटली की प्रथम फिरण्यासाठी उत्सुक होऊन बसलेला आमचा मोत्या उड्या मारू लागायचा. मग मी उठून मोत्यासह त्यांच्याबरोबर फिरायला जायचा. आता ज्या जागेवर नेहरू स्टेडियम आहे तो भाग त्यावेळी अगदी रिकामा होता. हिराबाग हे त्या पटांगणाचे इतिहासप्रसिद्ध नाव. पुढे स्वारगेटावरील एका इराणी हॉटेलमध्ये आम्ही जाऊन बसायचे. मोत्या अगोदरच तेथे पोहोचलेला असायचा. मोत्या स्वभावाने शांत होता म्हणून भैय्या उमराणी त्याला 'कल्चर्ड मोत्या' असे गमतीने म्हणायचा. नंतर काव्य-शास्त्र-विनोद झाल्यावर आम्ही रमतगमत परत यायचो.

जुन्या श्रेष्ठ विद्वानांची कदर श्री. के. क्षी. करीत आणि त्याचमुळे त्यांच्यातील मोठेपण 'श्री. के. क्षीं.'मुळे आम्हाला कळले हे सांगितलेच आहे. असेच एकदा ते मला आहिताग्नी राजवाडेकडे घेऊन गेले. बोलता बोलता टॉलस्टॉय हा विषय निघाला. तेव्हा राजवाडे म्हणाले, " अहो, टॉलस्टॉयबद्दल काय सांगता ? तो या युगातला व्यास आहे." राजवाड्यांसारख्या सनातनी ब्राह्मणाकडून एका क्रांतिकारक पाश्चात्त्य लेखकाबद्दल असे उद्गार ऐकावयास मिळतील असे वाटले नाही. पण राजवाडे जेवढे वेदविद्येत पारंगत तेवढेच पाश्चात्त्य वाङ्मयात आणि राजकारणात निपुण होते. अगदी अलीकडची गोष्ट म्हणजे आम्ही काही मंडळी माझे प्रियतम मित्र एस. एम. जोशी यांचेकडे गेलो होतो. तेव्हा काही आठवणी सांगताना एस. एम. म्हणाले, " राजवाडे एवढे प्रॅक्टिक आणि आधुनिक असतील असे मला वाटले नव्हते. महात्मा गांधींनी जेव्हा 'चले जाव' (Quit India) ही घोषणा केली तेव्हा

राजवाडे म्हणाले की, 'हे स्लोगन जगात फक्त लेनिनच देऊ शकला असता.', राजवाड्यांचा आधुनिकपणा श्री. के. क्षींनी किती अगोदरच हेरला होता हे यावरून लक्षात येईल.

ते स्वत: एकाकी राहात असले तरी त्यांच्यात कुटुंबवत्सलतेची एक आगळी भावना होती. आमच्या घरी ते अगदी खेळीमेळीने मुलांशी वागत. आमचा बाळ आणि त्याची पाठोपाठची बहीण वासंती यांच्यावर त्यांचा विशेष लोभ होता. बाळ (माधव) लहानपणी खूप गमत्या असायचा म्हणून ते त्याला 'ओमप्रकाश' याच नावाने संबोधीत. त्याच्या लहानग्या बहिणीला ते 'मीनाकुमारी' म्हणत. आमच्याकडून घरी जाण्यासाठी उठले म्हणजे अगोदर आपल्या छडीची पाहाणी ते करीत. बहुधा तुझ्या ओमप्रकाशने छडी पळविलेली दिसते, असे ते म्हणत. आणि ते बहुधा खरे असे. त्यांच्या एकंदर गंभीर वाटणाऱ्या व्यक्तिमत्त्वात खोडकरपणा पुष्कळ असे. माझी पत्नी बडोद्यास गेली म्हणजे मी त्यांना सांगे की, "आता मी एकटा आहे. तुम्ही नित्याप्रमाणे रात्री गप्पा मारायला या." पण ते चारसहा दिवस काही आले नाहीत. तेव्हा विचारले असता त्यांनी हसत हसत उत्तर दिले, 'मी अलीकडे आलो नाही याचे कारण तुझ्या पत्नीपासून तुला दूर नेण्यात आणि तिची नाराजी पाहण्यात जी मौज आहे ती सध्या नाही." कित्येकदा त्यांचे शेरे विचारात पाडण्यासारखे असत. पण त्याचा उलगडा मात्र कधी होत नसे. "तू खर्चिक आहेस. पण उदार नाहीस. उलट मी उदार आहे, पण खर्चिक नाही." असल्या त्यांच्या शेऱ्याचे रहस्य अजूनही मला कळलेले नाही.

माझ्या सुदैवाबद्दल श्री. के. क्षींना जवळजवळ अंधश्रद्धाच होती. आता मी सुदैवी आहे की नाही हा भाग वेगळा! माझे 'आनंदा'त येणे, आकाशवाणीवर माझी नेमणूक होणें इ. गोष्टी ते माझ्या सुदैवात गणत. मलाही ते मान्य होते पण एखादी रिक्षा त्यांच्या घरासमोर मिळाली की ते म्हणत, "तुझे सुदैव मी म्हणतो ते हेच." मला मौज वाटे. माझी पत्नी निवर्तल्यानंतर मात्र ते म्हणाले. "तुझे हाल कुत्रे खाणार नाही." पण जेव्हा माझा पुत्रवत मानलेला माधव फळणीकर व त्याची पत्नी माझा चांगला सांभाळ करते असे त्यांना कळले तेव्हा ते म्हणाले, "बघ, मी म्हणत नव्हतो तू सुदैवी आहेस तेच खरे आहे."

श्री. के. क्षी. हे रुढार्थाने नाणावलेले वक्ते होते असे मी म्हणणार नाही. व्यक्ती नाट्य, अतिशयोक्ती इत्यादी जे गुण वक्त्यात लागतात त्यांचा त्यांचे ठिकाणी जवळजवळ अभावच होता. पण त्यांचे भाषण अस्खलित असे. अडखळण्याचे किंवा बोललेल्या वाक्याची रचना बदलण्याचे प्रसंग त्याच्या भाषणात मी पाहिले नाहीत. भाषण मुद्देसूद असे. विनोद असला तरी तो अर्वाच्य नसे. या आणि अशा गुणां-










मुळेच श्री. के. क्षींचे भाषण ऐकावेसे वाटे. मिरजेच्या साहित्यसंमेलनात एवढे वादळ आणि स्वागताध्यक्षांचे प्रदीर्घ प्रवचन होऊनही त्यांचे अध्यक्षीय भाषण लोकांनी ऐकून घेतले त्याचे रहस्य हेच होय.

माझ्या भाषणावर ते तितकेसे खूष नसत, "तू आपल्या भाषणात आर्जवी भूमिका फार घेतोस" असे ते म्हणत. मी आपल्या स्मरणशक्तीचा फार उपयोग बोलण्यात करीत नाही अशी त्यांची तक्रार असे. माझे मित्र कर्नल सोमण यांच्या 'सत्य साई निलयम' मध्ये दर गुरुवारी 'ज्ञानेश्वरी'वर प्रकट चिंतन करीत असे. त्यासाठी श्री. के. क्षींना मी आग्रह करून एकदोनदा नेले होते. अर्थात ज्ञानेश्वरी-वरील माझी भक्ती आणि प्रकट चिंतन त्यांना आवडले यात शंका नाही. पण त्यांनी त्यावर भाष्य केले ते बोधप्रद होते. "यापेक्षा तू अवतरणे आपल्या भाषणात जास्त द्यायला हवीस. तुझ्या बोलण्यात भक्ती आहे पण आत्मविश्वास नाही. लोकांना आपण काही ज्ञान, आनंद देत आहो असा अहंकार नाही. अहंकार शब्द तुला कटू वाटत असेल तर खात्री म्हण. पण काहीतरी कमी पडते असे मला वाटते. विद्यार्थिदशा संपली आहे असे तुझ्या बोलण्यावरून वाटत नाही." अर्थात या शेऱ्यामध्ये तथ्य आहे खरे. पण त्यांनी नंतरही हे मत कायम ठेवले असते की नाही हे सांगता येत नाही. आणि कुठल्याही कलेतली किंवा दीक्षा ग्रंथातली चाहत्याची विद्यार्थिदशा केव्हाही संपत नाही असे मला वाटते.

श्री. के. क्षींनी आपले मत कदाचित बदलले असते हे मी सूचित केले ते निरा-धार नाही. असे त्यांचे मतपरिवर्तन झाल्याची पुष्कळ उदाहरणे मजजवळ आहेत. काही या ठिकाणी देतो. मौसिकी–ए–आफताब फैयाज खां याची एक सुंदर चीज त्यांना मी सांगितली आणि म्हटले, "कारे आई पियासंग रंगरलिया जेठानिया ननदिया मनाये, यावेळी फैयाज खाँचा आवाज इतका हळुवार असतो की नणंद–भावजयांनी जमवलेल्या गोपीचा सुंदर मुखडा आपल्या डोळ्यांपुढे हे हुबेहूब उभा राहतो," यावर ते तुच्छतेने म्हणाले, "काय सांगतोस? अरे त्या फैयाजचा आवाज केवढा जाडाभरडा तो काय स्त्रियांचे नाजूक भाव वठविणार?" यावर मी काही बोललो नाही. पुढे मला वाटते मास्टर कृष्णरावांच्या प्रेरणेने पुण्यास एक संगीत सभा बोलवण्यात आली. त्याला फैयाज खाँ आले होते. मी आणि श्री. के. क्षी. त्या सभेला गेलो होतो. योगायोगाने फैयाज खाँनी हीच चीज म्हणली, श्री. के. क्षी. तल्लीन झाले आणि म्हणाले, "तुझं म्हणणं बरोबर आहे आपल्या आवाक्यापेक्षा वेगळं करणं म्हणजे आपल्या सामर्थ्याला ओलांडून जाणं (Transcend) हेच श्रेष्ठ कलावंतांचे कसब. तेच या माणसाने मोठ्या प्रमाणात साध्य केले आहे." पुढे बडोदे येथील वाङ्मय परिषदेच्या अध्यक्षीय भाषणात त्यांनी फैयाज खाँचा गौरवपूर्ण उल्लेखही केला आहे. लॉरेन्स ऑलिव्हरबद्दल असेच प्रथम साशंक होते पण आम्ही श्री. के. क्षींचे

आवडते चित्र पाहिले तेव्हा या प्रौढ नटाची त्यांनी फैयाजप्रमाणेच प्रशंसा केली या जगविख्यात नाटकात ऑलिव्हरचे काम पाहून श्री. के. क्षी. भान विसरल्याचे मला आठवते. तसेच आमच्या पिढीला अत्यंत लाडका असलेला सैगल त्यांना मुळीच आवडत नसे. पण तानसेनमध्ये शेवटी दीपक रागाने तप्त झालेला सैगल रामी जेव्हा ठिकाणावर आणते आणि दोघे मिळून घोड्यावरून गाणे म्हणत जातात तेव्हा श्री. के. क्षींच्या डोळ्यांत अश्रू तरळलेले मी पाहिले आहेत. प्रेम, ज्ञान, वडीलकी, प्रामाणिकपणा याविषयीची त्यांची श्रद्धा अपार होती.

माणसाचे जीवन अनेक संस्कारांनी घडलेले असते. त्यात अनुवंश, शिक्षण, सामाजिक परिस्थिती, प्रेम, यशापयश इत्यादी अनेक गोष्टी प्रेरक होतात. एकदा श्रीकेक्षी मला म्हणाले, " तुला एक पुस्तक मी देणार नव्हतो. पण ते देतो. मला ते वाचून सांग." (द्यायची नाहीत असे ठरवून अशी अनेक पुस्तके त्यांनी मला दिली ! खरोखरच ती मौल्यवान होती) असे म्हणून एक पुस्तक त्यांनी मला दिले. चेस्टर्टन या प्रख्यात लेखकाने जॉर्ज बर्नार्ड शॉ यांच्यावर लिहिलेले ते पुस्तक होते. भीमसेन, जसराज यांच्यासारख्या विख्यात गायकांची जुगलबंदीच आपण पाहत आहोत असे ते पुस्तक वाचताना भास होत होता. त्यात प्युरिटन, आयरिशमन, नाटककार इत्यादी प्रकरणे पाडून शॉची समीक्षा केली होती. मी विनोदाने श्रीकेक्षींना म्हटले, " तुमचं चरित्र लिहिलं तर असंच काही लिहावं लागेल. 'देशस्थ' 'पुणेकर' अशी प्रकरणे त्यात येतील." त्यावर त्यांनी हे मान्य करून म्हटले, " तू म्हणतोस ते बरोबर आहे. काही अंगभूत गुणांनी, काही संस्कारांनी तर काही व्यवसायाने माणसाचे जीवन घडत जाते. पुष्कळदा परस्परविसंगत असेही गुण आढळून येतात. पण या विसंगतीतच काही एक संगती आहे हे जाणणाराच पटवून देऊ शकतो. माझ्यातील 'देशस्थ' कदाचित भावडा आणि श्रद्धाळू असेल पण माझ्यातला टीकाकार कठोरही होईल. पण भावडेपणातही कठोरपणा आहे आणि कठोरपणातही भावडेपणा आहे हे जाणले पाहिजे." या विषयावर आमचे खूप बोलणे झाले. व्याधीला वेगळे काढून औषध देणे ही अयोग्य पद्धत आहे. व्याधिग्रस्ताला पाहणे हेच खरे शास्त्र आहे. कदाचित त्यामुळेही त्यांनी होमिओपाथी आपल्या जीवनात प्रमाण मानली असेल. एखादा मनुष्य लबाड आहे असे सांगितले की ते म्हणत, " अरे, मी त्याला सच्चा समजत होतो. तो नेहमी माझी स्तुती करतो." वाङ्मयात किंवा समाजजीवनात चोरट्या पावलांनी येणाऱ्या संकटाची चाहूल ज्याला अगोदर लागते अशा मान्यवर टीकाकाराला हा भावडेपणा शोभेसा वाटत नाही. पण श्री. के. क्षी. यांना पत्करायचे म्हणजे ते या विसंगतीसह पत्करायचे याशिवाय अन्य मार्ग नाही.

श्रीकेक्षींच्या पत्नीबद्दल चार ओळी लिहिणे हे आनंदाचे कर्तव्य ठरते. " न्याय-

मूर्तीना आता तुमच्या कोर्टात कायमची जागा द्या" हा आग्रह त्यांना कित्येक दिवस मी करीत असे. (श्री. के. क्षीं. च्या सहचारिणीचे माहेरचे आडनाव 'रानडे' असे होते म्हणून त्यांच्या अपरोक्ष मी गमतीने न्यायमूर्ती असा त्यांचा उल्लेख करीत असे.) या माऊलीने श्री.के.क्षीं.ची सेवा मनोभावे केली. त्यांचे आयुष्य वाढविले. मुलाप्रमाणे त्यांची काळजी घेतली. आमच्या घरी श्री.के.क्षीं.ना सोडून त्या औषधे वगैरे आणायला जायच्या हे मला चांगले आठवते. कालिदासाच्या उक्तींत थोडा फरक करून मी म्हणेन की 'जननी सचिवः सखी प्रियः' अशी त्यांची भूमिका होती. मला मोठा अचंबा वाटतो की विद्या आणि कर्तृत्व यांचे पाठबळ असतानाही त्यांनी श्री. के. क्षीं. च्या जीवनौघात आपले जीवन मिसळून टाकले. श्री. के. क्षीं. च्या उत्कर्षात धन्यता मानली. सासरच्या माणसांबद्दल आपुलकी तसेच त्यांनाही या कुलवधूचा अभिमान हे दुर्मिळ दृश्य पाहून मन आनंदित होते.

'मिळता महोदधीसी<br>गंगा वोघ सांडी जैसी<br>किंवा कामिनी कांतापाशी<br>स्थिर होय.'

ही ज्ञानेश्वर महाराजांची ओवी वाचताना जे आदर्श डोळ्यांपुढे येतात, त्यात शकुंतलाबाईंचे स्थान वर आहे.

श्री. के. क्षी. प्रथम अगदी अलिप्ततावादी होते. सभा, संघटना, संमेलने यांविषयी त्यांना मुळीच रस नसे. मला आणि निरंतरला ते तिरस्काराने म्हणत, "काय या निरर्थक गोष्टीत आपले क्षण वाया घालविता?" पण पुढे संघटनात्मक कार्यात ते समरस झाले. महाराष्ट्र साहित्य परिषदेचे पदाधिकारी, अनेक महत्त्वाच्या परिषदांचे अध्यक्ष, साहित्य संमेलनाचे अध्यक्ष इत्यादी अनेक पदे त्यांनी भूषविली. ही त्यांची भूमिका खालती आली असेही मानणारे कित्येक आहेत. पण श्री. के. क्षी. यांना तसे वाटत नसावे. गुरुगृहाचा काल संपल्यानंतर तीर्थयात्रा करावी आणि मग गृहस्थाश्रम पत्करावा असाच क्रमविकास त्यांना वाटत होता. जनसंपर्कानेच आपणाला काही करता येते असेही त्यांना अखेर पटले असेल. असो. असा हा आमचा मित्र. प्रेमळ, करारी, उग्र, प्रतिभाशाली, कलंदर, रसिक अनेक विशेषणें देऊनही त्यांचे पूर्ण वर्णन होत नाही. शेवटी शब्द अपुरेच पडतात. श्री. के. क्षी. आणि मी यांना सारख्याच प्रिय असणाऱ्या माधव जूलियन यांच्या ओळी आठवतात—

गेले दीस किती सुखात असता संगे जिवाचा सखा<br>गोष्टी बोलत ती पहाट कितीदा होऊन गेली बरे

अनुक्रमणिका

दे अद्यापि अमूर्त सोबत मुकी तो पूर्वमैत्री स्मरे
आहे भाव तसाच जिवाचा अमुचा कृष्णार्जुनासारखा

ते झपाटलेले दिवस आता येणार नाहीत हा विचार उदासवाणा खराच. पण ते आयुष्यात एकदा तरी आले हे आनंददायक नाही काय ?

३३/२ गोपीनाथ नगर, ३६ अ/४ कोथरूड,
गांधीभवन शेजारी, पुणे २९.

# तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी

द्वा. भ. कर्णिक

---

तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी यांच्याशी असलेला माझा ऋणानुबंध वाङ्मयीन, राजकीय, सांस्कृतिक तसाच कौटुंबिक आहे. कौटुंबिकदृष्ट्या इतका जिव्हाळ्याचा की १९३० साली त्यांची आणि माझी ओळख झाल्यानंतर कर्णिकांच्या घरातील प्रत्येक शुभकार्याला शास्त्रीजींचा आशीर्वाद गृहीतच धरला जात असे. हा आशीर्वाद आवर्जून प्रत्यक्ष हजर राहून शास्त्रीजी देत आले. आमच्या वडिलांचे पुण्यातील निवासस्थान 'आनंदीगेह' हे नंतर शास्त्रीजींच्या पदधूलीने सदैव पावन होत राहिले. आमचे वडील भगवंतराव कर्णिक हे धार्मिक वृत्तीचे जाज्वल्य गांधीवादी होते. शास्त्रीजींना गांधीजींच्या परिवारात जो मान असे त्याच्या जाणिवेने आमच्या वडिलांनी शास्त्रीजींचा सहवास हा पुण्यभेटीसमानच मानला होता. पुढे आमचे दुसरे बंधू डॉ. अनंतराव कर्णिक यांनी हा ऋणानुबंध नुसताच जतन केला नाही, तर त्यात अधिकच जिव्हाळा आणला.

शास्त्रीजींचे नाव मी स्वत: प्रथम ऐकले ते १९३० साली, जेव्हा गांधीजींनी मिठाचा सत्याग्रह सुरू केला तेव्हा. सत्याग्रहाचे आंदोलन सुरू होताच शास्त्रीजींनी वाईच्या प्राज्ञपाठशाळेकडे पाठ फिरविली आणि ते सत्याग्रही आंदोलन प्रज्वलित करण्यासाठी गावोगाव भाषणे देत फिरू लागले. त्यांच्या या भाषणांनी सबंध सातारा जिल्हा खडबडून जागा झाला. आणि सामान्य लोकांमध्ये वीरश्रीचे वारे संचारू लागले. शास्त्रीजींची त्यावेळची भाषणे इतकी तेजस्वी तशीच जनमनावर इतकी छाप टाकणारी होत असत की एकदा वृत्तपत्रातून असे गौरवपर उद्गार निघाले की, " शास्त्रीजींच्या प्रभावी वक्तृत्वामुळे एक इसम इतका बेभान झाला की त्याला टाळचा देण्यासाठी दोन हातही जुळविणे अशक्य झाले."

ही शास्त्रीजींच्या भाषणातील धार होती. तिला साजेसे पांडित्य आणि लालित्य हा तर त्या भाषणांचा गुणविशेषच होता. सारे महाभारत आणि रामायण



अनुक्रमणिका

शास्त्रीजी एकेका भाषणातून विशद करीत असत आणि त्यातूनच गांधीजींच्या सत्याग्रहासाठी नैतिक अधिष्ठान शास्त्रीजी उभे करीत असत.

हे कीर्तिमान व्यक्तित्व आकस्मिकपणे आणि प्रथमच मला भेटले ते नाशिक जिल्ह्यातील कळवण येथील लॉकअपमध्ये. माझ्याबरोबरच शास्त्रीजींनाही सभाबंदीचा हुकूम मोडल्याबद्दल अटक करण्यात आली होती. मला नाशिकच्या आदिवासी विभागातून पकडून आणण्यात आले होते. रात्री निवांतपणे मी झोपलो असताना मध्यरात्रीच्या सुमारास पोलिसांनी शास्त्रीजींनाही त्याच लॉकअपमध्ये आणले. खडबडून मी जागा झालो. आणि आपला सहप्रवासी कोण आहे हे कळल्यानंतर एक प्रकारच्या आश्चर्याच्या तशाच उदात्ततेच्या भावनेने माझे अंतःकरण भरून आले. उण्यापुऱ्या अठ्ठावन्न वर्षांपूर्वी घडून आलेली ही भेट ही माझ्या जीवनातील एका सुवर्णक्षणासारखी मी जपून ठेवली आहे, जतन केली आहे. त्यानंतर धुळ्याच्या तुरुंगात शास्त्रीजी आणि मी भेटत होतो. आणि त्या भेटीतील उत्सुकता अधिकच वाढत असे ती यामुळे की आम्ही एम्. एन्. रॉय यांचे तत्त्वज्ञान व त्यांचा क्रांतीचा कार्यक्रम याविषयी परस्परांत विचारविनिमय करीत असू. शास्त्रीजी आमच्या बराकीतील सत्याग्रही लोकांमध्ये अधिकच लोकप्रिय होण्याचे आणखी एक कारण असे होते की, 'ब' वर्गाचे कैदी म्हणून शास्त्रीजींना कांदे, बटाटे, भाजी व इतर फळे यांचा जो खास आहार मिळत असे त्याचा काहीसा वाटा ते माझ्यासाठी आवर्जून मधूनमधून पाठवून देत असत आणि आमच्या लहानशा कोठीत तो प्रसादासारखा वाटला जात असे.

त्यानंतरच्या काळात रॉय यांच्या विचारसरणीचे माझ्याप्रमाणेच शास्त्रीजींनाही कुतूहल तसेच कौतुक वाटू लागले. रॉयवादाशी पहिली ओळख करून देण्याचे श्रेय शास्त्रीजी त्यामुळेच मला देत असतात. रॉयवादी म्हणून आम्हा कणिक बंधूंना अभिमान वाटत आला आहे तो हा की भारतातील एक खंदा पंडित आमच्यामुळे रॉयवादाकडे वळला. शास्त्रीजींचे वैशिष्ट्य असे आहे की बुद्धिवादाच्या निकषावर एखादा दृष्टिकोण वा विचारसरणी त्यांना पटली की ते आपल्या विचारपद्धतीत बदल घडवून आणण्याला कचरत नाहीत ते स्वतः गांधीजींच्या सहवासात राहिले होते. गांधीजींचे सान्निध्य त्यांना अशा प्रकारे लाभले होते की, धर्मशास्त्राच्या बाबतीत गांधीजी हे त्यांना सल्लागार म्हणून मानू लागले होते. अस्पृश्यतानिवारणाचा गांधीजींनी जो ध्यास घेतला होता त्यात धर्मवचनांचा आधार घेऊन अस्पृश्यतानिवारण हे धर्मविरोधी नाही असे पटवून देण्याच्या कामी शास्त्रीजींचीच त्यांनी मदत घेतली होती. याच प्रकारचा शास्त्राधार काढून देण्यात शास्त्रीजी मग्न असतानाच देवदास गांधी व राजगोपालाचारी यांची कन्या लक्ष्मी यांच्यामधील प्रेमसंबंध दृढ झाला आणि त्यांच्या विवाहाचे पौरोहित्य करण्याचे कार्य गांधीजींनी

शास्त्रीजींकडे सोपविले. हा एक अपूर्व सन्मान होता. त्याचप्रमाणे गांधीजींनी शास्त्रीजींवर टाकलेल्या विश्वासाचे ते एक प्रसादचिन्हही होते. शास्त्रीजींच्या प्रतिष्ठेने त्यावेळी कळस गाठला असेच म्हणता येईल.

पण विद्वज्जनांमध्ये आणि चिकित्सक आणि अभ्यासू राजकीय कार्यकर्त्यांमध्ये शास्त्रीजींना खरीखुरी प्रतिष्ठा मिळवून दिली ती एम्. एन्. रॉय यांनी. तसे पाहिले तर वाईच्या तर्कतीर्थ शास्त्रीबुवांना शास्त्रीजी केले ते रॉय यांनी. तेव्हापासून शास्त्रीजी हे त्यांचे अभिधान रूढ झाले. शास्त्रीजींनी 'हिंदुधर्माची समीक्षा' हे आपले विद्वत्तापूर्ण पुस्तक प्रसिद्ध केले. त्यानंतर थोडयाच दिवसांत मुंबईच्या मारवाडी विद्यालयाच्या दिवाणखान्यात रॉय यांचा पन्नासावा वाढदिवस साजरा करण्यात आला. त्या प्रसंगी बोलताना रॉय यांनी शास्त्रीजींचा आकस्मिकपणे उल्लेख करून म्हटले, "आमच्यामध्ये शास्त्रीजी यांच्यासारखा एक महापंडित आहे याचा मला अभिमान वाटतो. त्यांच्या हिंदुधर्मसमीक्षेचा विचार करता त्यांच्या चरणी लीन होऊन त्यांना प्रणाम करावासा मला वाटतो."

त्या सुमारास माझ्या संपादकत्वाखाली आमचे रॉयवाद्यांचे 'संग्राम' हे दैनिक निघत होते. शास्त्रीजींचा आणि माझा वाङ्मयीन ऋणानुबंध त्यातूनच अंकुरित झाला असे मला म्हणता येईल. 'संग्राम' दैनिकाचा व्याप हा माझ्या जीवनातील कसोटीचाच काळ होता. पण त्या काळात शास्त्रीजींचा जो सहवास मला लाभला, त्यांच्याबरोबर काव्यशास्त्रविनोदात रममाण होण्याची मला जी संधी मिळाली आणि विद्वत्तेबरोबरच त्यांच्या रसिकतेचे जे दर्शन मला घडले त्याचा विचार करता हा काळ माझ्या जीवनातील आनंदाने उत्फुल्ल होण्याचाच कालखंड होता असे मला म्हणता येईल.

शास्त्रीजी आमच्या कचेरीत गप्पा मारण्यासाठी येत. पण आल्या आल्या गप्पांच्या ओघात आम्ही एखाद्या विषयावर त्यांचे मत अजमाविण्याचा प्रयत्न करीत असू. लगेच शास्त्रीजी लेख लिहिण्यासाठीच सज्ज होत असत. आमचे सह-संपादक श्री. मा. पं. शिखरे हे शास्त्रीजींचे Dictation आपल्या सुरेख अक्षरात लिहून काढीत असत. मग शास्त्रीजींच्या कल्पकतेचे वारू तुफान वेगाने दौडू लागे. कधी अग्रलेख, कधी स्फुटे, कधी ललित लेख तर कधी नामांकित पाश्चिमात्य चित्रकारांची कलात्मक समीक्षा असे विविध विषय शास्त्रीजी हाताळीत असत. मायकेल अँजेलो, गोया, राफेल, पॉल सेझाने, रेनॉयर वगैरे विख्यात कलावंतांचे चित्रकलेतील प्रावीण्य, त्यांची शैली, त्यांच्या विषयांमधील आशय आणि त्यांच्या अविस्मरणीय कलाकृती याविषयी शास्त्रीजींनी जे लेख संग्राममध्ये लिहिले ते रविवारच्या अंकाचे भूषणच मानले जात असे. ललित साहित्याचा कसच त्यांमध्ये प्रगट होत असे. कारण शास्त्रीजींच्या विदग्ध लेखणीचे सारे कसब त्यात सामावलेले

असे. दुर्दैवाने संग्रामच्या अस्तित्वावरच घाला पडल्यामुळे हे चिरस्मरणीय ठरणारे साहित्यही आज पडद्याआड झाले आहे.

माझ्या दृष्टीने शास्त्रीजी हे एक जगावेगळेच व्यक्तित्व आहे. त्यांचे ज्ञान-भांडार डेहराडूनच्या रॉय यांच्या निवासस्थानी वा व्ही.बी. कर्णिक यांच्या साहित्य-सहवासमधील फ्लॅटमध्ये वा जेथे जेथे शास्त्रीजी त्या त्या क्षणी असतील तेथे असामान्य तशाच सामान्य लोकांसमोर निर्व्याजपणे खुले केले जाते. कृष्णेच्या काठा-वरील वाईच्या त्यांच्या निवासस्थानी जे दिवस मी काढले आहेत त्यांच्या आठवणी पुसू म्हटले तरी पुसता येणार नाहीत. कारण अंतःकरणात त्या घर करून राहिलेल्या आहेत. त्या घरात आणि आजूबाजूच्या परिसरात शास्त्रीजींचा स्वैरसंचार चालू असतो. ते स्वतः इतके आतिथ्यशील आहेत की, घरी पाहुणे आले किंवा मित्रमंडळींना भोजनासाठी बोलाविलेले असले, तर शास्त्रीजी भल्या पहाटे स्वतः सारे भोजन-साहित्य जमा करण्यासाठी मंडईत जातात. त्याबाबतीत त्यांचा अहंकार असा की, भाजी वा फळे यांची अचूक निवड करून योग्य भावाने त्यांचा सौदा करण्यात त्यांचा हात धरणारा दुसरा कोणीही नाही. विश्वकोशाच्या निमित्ताने त्यांच्याकडे विद्वान अतिथी नेहमीच मुक्कामाला असतात आणि त्यांची विचारपूस व देखभाल स्वतः शास्त्रीजी पित्याच्या जिव्हाळ्याने करीत आलेले आहेत. या कामी आपल्या पत्नी सत्यवतीबाई या नुसतेच सहकार्य करीत नव्हत्या तर ह्यात असताना त्यांनीच प्रामुख्याने हा भार सांभाळला असेही शास्त्रीजी विनयाने जाहीर करतात. सत्यवतीबाईंचे आकस्मिकपणे निधन झाल्यानंतर शास्त्रीजींना त्याचा इतका धक्का बसला की, पुढील चार दिवस विश्वकोशातील आपल्या अभ्यासिकेत स्वतःला कोंडून घेऊन अश्रुपूरित नेत्रांनी ते सत्यवतीबाईंच्या आठवणी लिहीत बसले असे त्यांनीच एकदा माझ्याशी बोलताना सांगितले. जिव्हाळ्याच्या सहकाऱ्यांबद्दल शास्त्रीजींच्या मनात इतकी उत्कट भावना असते की, व्ही. बी. कर्णिक यांच्या निधनानंतर त्यांना क्षणभर चैतन्यहीन झाल्यासारखे वाटले. त्याच्या मुळाशी कर्णिकांबद्दलचा जिव्हाळा आणि त्यांच्या निधनामुळे निर्माण झालेल्या पोकळीबद्दलचे अतीव दुःखच होतें.

पण या साऱ्या संसाराच्या व्यापातापांत मग्न असतानाही शास्त्रीजींचे लेखन तसेच मनन, चिंतन आणि व्यासंग या साऱ्या गोष्टी अनिर्बंधपणें चाललेल्या असतात. त्यांचे घर हे मुक्तद्वार राहिलेले आहे. पण लोकांच्या भेटीगाठी घेत असताना त्यांच्या मुखातून जी माहिती प्रगट होत असते आणि संस्कृत वचनांची जी जोड ते तिला देत असतात त्यातून त्यांचे ज्ञानभांडार तर खुले होतेच, पण त्यांच्या लेखनाचे विषय ठरत असतात; त्याचप्रमाणे इतरांच्या लेखनालाही स्फूर्ती मिळत असते. शास्त्रीजी विश्वकोशाचे संपादन करतात, धर्मकोशाचे संपादनही



अनुक्रमणिका

त्याचवेळी चालू असते. साहित्य संस्कृती मंडळाचे अध्यक्ष म्हणून त्यांनी वीस वर्षे कार्य केले. त्या कार्याचा रगाडा मी पाहिलेला आहे. स्वत: शास्त्रीजी निश्चितपणे प्रकाशनासाठी हव्या असलेल्या पुस्तकांची निवड करतात आणि ती निवड अचूक ठरते ती यासाठी की, त्यांनी तें पुस्तक वाचलेले असते आणि त्याचे मूल्यमापनही त्यांनी आपल्या चाणाक्षपणाने केलेले असते. त्यांच्या कारकीर्दीत सहाशेच्या वर ग्रंथ लिहिले गेले किंवा अनुवादित केले गेले याचे श्रेय त्यांच्या दूरदर्शी प्रतिभेलाच द्यावे लागेल. शास्त्रीजींची मती साहित्य, कला, विज्ञान, तत्त्वज्ञान तसेच तंत्रज्ञान या सर्व शाखांत सारख्याच अधिकाराने चालते, ही विद्वज्जनांमध्येही वैशिष्टयपूर्ण ठरणाऱ्या विद्वत्तेची खूण मानावी लागेल.

पण त्याचवेळी शास्त्रीजी जी गुणग्राहकता प्रगट करतात त्यातून मराठी साहित्यात मोलाची भर पडलेली दिसून आल्याशिवाय राहणार नाही. रॉय यांचे ' लेटर्स फ्रॉम जेल ' हे उत्कृष्ट पुस्तक शास्त्रीजींनीच अनुवादासाठी निवडले आणि ते अनुवादाचे काम त्यांनी माझ्याकडे सोपविले. पुढे एलन रॉय यांचे चरित्र मी लिहिले आहे असे त्यांच्या कानी आले. लगेच वाईहून गाडी पाठवून त्यांनी मला बोलावून घेतले. अशा वेळी शास्त्रीजी आपली सारी कामे विसरून जातात आणि तल्लीन होऊन जे साहित्य पुढे येईल ते ऐकत असतात. एलन रॉय यांचे चरित्र पुढे त्यांच्याच शिफारशीवरून मधुकाका कुलकर्णी यांच्या श्रीविद्या प्रकाशनातर्फे प्रसिद्ध करण्यात आले.

शास्त्रीजींनी साहित्य संस्कृती मंडळातर्फे मराठी भाषेची जी सेवा केली आहे ती खरोखरच अनमोल आहे. व्ही. वी. कर्णिक यांनी जॉन स्टुअर्ट मिल यांच्या ' ऑन लिबर्टी ' या पुस्तकाचा त्यांच्याच विनंतीवरून जो अनुवाद केला आहे त्याचा पुरस्कार करताना शास्त्रीजींनी आपले विचार खुलेपणाने व्यक्त केले आहेत. या पुरस्कारात ते म्हणतात, " मराठी भाषेला व साहित्याला ज्ञानविज्ञानाच्या क्षेत्रात पश्चिमी भाषांचा दर्जा प्राप्त व्हावा, इंग्रजी, फ्रेंच, जर्मन, रशियन इत्यादी पश्चिमी भाषांना जसे विद्यापीठीय स्तरावर स्वयंपूर्ण महत्त्व प्राप्त झाले आहे, तसे मराठी भाषेला व साहित्याला प्राप्त व्हावे, इंग्रजी भाषेला व साहित्याला आज भारतीय विद्यापीठांमध्ये जसे मुख्य स्थान आहे तसे स्थान महाराष्ट्रातील विद्यापीठात मराठी भाषेला व साहित्याला प्राप्त व्हावे या उद्देशाने साहित्य संस्कृती मंडळाने वाङ्मय-निर्मितीचा विविध कार्यक्रम हाती घेतला आहे."

या वाङ्मयनिर्मितीत भाषांतराला शास्त्रीजींनी प्रमुख स्थान दिले. या भाषांतर योजनेत शास्त्रीजींनी पाश्चात्य व भारतीय भाषातील सुमारे २०० पुस्तके निवडली. त्यात होमर, व्हर्जिल, एस्किलस, ॲरिस्टोफिनीस, युरिपिडिस, प्लेटो, ॲरिस्टॉटल तसेच न्यूटन, डार्विन, रूसो, कांट, हेगेल, बर्ट्रांड रसेल या थोर थोर



अनुक्रमणिका

लेखकांचा समावेश आहे. शास्त्रीजींच्या गाढ्या विद्वत्तेची व व्यासंगाची यातूनही कल्पना येऊ शकते. व्ही. वी. कर्णिक यांच्याकडे रूसोलिखित सामाजिक कराराच्या अनुवादाचे जे काम शास्त्रीजींनी सोपविले ते तर त्यांच्या गुणग्राहकतेचे उत्कृष्ट उदाहरण मानता येईल. त्या अनुवादावरील निवेदनात शास्त्रीजी म्हणतात, " श्री. वसंत भगवंत कर्णिक यांनी पश्चिमी तात्त्विक विचारांचे योग्य आकलन व अवगाहन करून मराठी भाषेच्या प्रकृतीशी मेळ वसेल अशा पद्धतीने हा अनुवाद केला आहे."

शास्त्रीजींच्या जीवनाकडे पाहिले तर त्यांचे सारे अनुभवविश्व एखाद्या पॅनोरमाप्रमाणे सप्तरंगी छटांत आपल्या डोळ्यांसमोर तरळत राहते. एक शास्त्रीजी उघड्या अंगाने शाल सावरीत झपाझपा पावले टाकीत असलेले दिसतात. देवदासच्या लग्नात त्यांचा तोल जात असताना राजगोपालाचारी यांनी त्यांना मोठ्या अगत्याने " Take care Shastriji " असे म्हटलेले मी ऐकले आहे. अस्पृश्यतेच्या वावतीत अनुकूल धर्मनिर्णय देताना पंडित राजराजेश्वरशास्त्री आणि देवनाथाचार्य यांच्याशी शाब्दिक झटापट घेताना मी त्यांना पाहिले आहे. महात्मा गांधींच्या भेटीसाठी येरवडा तुरुंगात जाताना सभोवार जमलेल्या लोकांच्या मुद्रेवर कौतुकाचा भाव जो प्रगट होत असे तेच शास्त्रीजींचे खरे वैभव होते. त्या वैभवाकडे पाठ फिरवून ते रॉय यांच्या १३ मोहिनी रोडवरील निवासस्थानी आले तेव्हा मानवेंद्र-नाथ रॉय यांनी नितांत आदराने त्यांना 'शास्त्रीजी' ही जी हाक मारली त्यातूनच शास्त्रीजींच्या वैचारिक परिवर्तनाचे एक नवे पर्व सुरू झाले. तेव्हापासून आमच्या दृष्टीने गुरुशिष्याचे एक अद्वैत अस्तित्वात आले. रॉय यांचे तत्त्वज्ञान, त्यांची वैचारिक वैठक, त्यांचा राजकीय कार्यक्रम आणि विशेषतः मानवतावादी सामाजिक प्रबोधनासाठी त्यांनी केलेले आवाहन यावद्दल शास्त्रीजींनी पुढील काळात अव्यभिचारी निष्ठा दाखविली. रॉय आणि रॉयवाद यांच्यापासून ते कधीही विलग झाले नाहीत. शास्त्रीजींचा आणि माझा दुवा तसाच कर्णिक कुटुंवियांचा दुवा अभंग राहिला तो जितका वैयक्तिक आत्मीयतेमुळे होय तितकाच तात्त्विक समरसतेमुळे आणि जीवनविषयक समान दृष्टिकोणामुळे होय. शास्त्रीजींशी जडलेल्या स्नेहसंवंधामुळे माझे सारे जीवन उजळून निघाले आणि त्यांच्या सहवासातील प्रत्येक क्षण हा मला सुवर्णक्षणासारखाच वाटत आला आहे.

A ६८, आदर्शनगर, वरळी, मुंबई १८

# वि. ग. कानिटकर

## श्री. ज. जोशी

---

मी गेली तीस–चाळीस वर्षे अव्याहत बरे-वाईट लेखन करीत आहे. लेखन-वाचनाशिवाय मी खरोखरच दुसऱ्या कशातच रस घेतला नाही. उदरभरणासाठी मी कारकुनी आणि मास्तरकी जन्मभर केली पण त्यात कधी रमलो नाही, त्या क्षुल्लक नोकऱ्यांचा ठसा जरी माझ्यावर बसला तरी माझ्या मनाने मी लेखकच राहिलो. इतर कुणी मला दर्जेदार लेखकांच्या पंगतीत बसवले नाही तरी मला त्याची खंत वाटत नाही. कारण मी ' लेखक ' आहे याची मला खात्री आहे. घरी-दारी, मित्रमंडळींत किंवा नातेवाईकांत मी लेखक म्हणूनच मिरवलो. दुसऱ्या कोणत्याही पदवीचा मला कधी लोभ वाटला नाही.

लेखकाला नेहमी इतर लेखकमित्रांची किंवा उत्तम वाचन असलेल्यांची मैत्री असावी असे वाटते. त्या मित्रांत आणि साहित्यभक्तांत तो जितका रमू शकतो तितका तो स्वतःच्या मुलाबाळांत किंवा पत्नीमध्येही रमू शकत नाही. अशा साहित्यिक मित्रांच्या मैत्रीचे स्वरूप खरोखरच अवर्णनीय आहे. प्रियकर-प्रेयसी-सारखे ते आहे असे म्हणावे लागेल. तास तास गप्पा मारल्या किंवा काव्यशास्त्र विनोदात वेळ खर्च झाला तरी काहीही वाटत नाही. ती एक धुंदीच असते. तिचे संपूर्ण वर्णन करणेच शक्य नाही. अर्थात जीवनाच्या प्रवासात आपण जसजसे बदलत जातो, आवडीनिवडी पालटतात, मन प्रगल्भ होते, तसतसे साहित्यिक ऋणानुबंधही बदलत जातात. एका टप्प्यापर्यंतच्या आवडीच्या व्यक्ती टप्पा बदलताच, सहज बाजूला पडतात... मग दुसऱ्या व्यक्तींशी मनाच्या तारा जुळतात आणि मैत्रीचा हंगामा सुरू होतो. त्या व्यक्तींशीही कायम जवळीक राहाते असे नाही. आकाश जसे सहज रंग पालटते त्याप्रमाणें मनही सहज मैत्री तोडते आणि जोडते.

माझ्या पंचेचाळीस वर्षांच्या साहित्यिक प्रवासात माझे अनेक लेखकमित्र आणि त्यांची वर्तुळे होती. मनाने सांधा बदलल्यावर पहिली वर्तुळे सुटली आणि नवी सुरू झाली.



अनुक्रमणिका

मी अठरा-वीस वर्षांचा असताना माझे पहिले साहित्यिक वर्तुळ जमले. र. गं. विद्वांस, वाडेकर, भिडे, कटककर वगैरे मंडळी त्यात होती. आम्ही तेव्हा 'उदयोन्मुख' लेखक होतो. जोम भयंकर होता. वर्षाकाठी दोन-तीनच गोष्टी छापून येत परंतु आम्ही मध्यरात्रीपर्यंतही परस्परांच्या साहित्याबद्दल बोलत असू. त्यात बराचसा मत्सर आणि खारट–तुरटपणाही असे, पण आस्थाही असे. ते माझे मित्रमंडळ केव्हा आणि कसे बरखास्त झाले हे मलाच कळले नाही.

त्यानंतरच्या साहित्यिक वर्तुळाबद्दल फारसे सांगत नाही, पण तरीही थोडा नामनिर्देश करणे जरूर आहे. प्रथम दि. के. बेडेकर, कॉ. भाऊ फाटक, कॉ. मिरजकर वगैरेंशी मी साहित्यिक गप्पा करी. त्यांच्यामुळे नवी दृष्टी मिळाली... पुढे मौजपरिवारातले मित्र झाले. त्यानंतर मॅजेस्टिक ! ... अगदी अलीकडचे वर्तुळ म्हणजे विद्याधर पुंडलिक, वि. शं. पारगावकर, अनिल रानडे, ग. वा. बेहेरे, माधव कानिटकर, पदकी पतीपत्नी, स. शि. भावे, बाळ गाडगीळ वगैरेंचे होते. त्यांच्या बरोबरच्या गप्पांत किती तास खर्ची पडले असतील याची मोजदाद करणे कठीण आहे... अर्थात या वर्तुळांपासून स्वतःच्या साहित्यिक प्रगतीच्या दृष्टीने फारसा लाभ होतो असे मला वाटत नाही. परंतु साहित्याचे वातावरण अवती भोवती गडद ठेवण्यात या वर्तुळाचा उपयोग असतो. मी जर एखाद्या खेड्यात असतो आणि हे वर्तुळ माझ्या भोवती नसते तर मी खास गुदमरून गेलो असतो. ते वर्तुळही आता मोडकळले आहे. न भेटण्यास आम्ही निमित्ते अनेक सांगतो, पण भेटत नाही हे मात्र खरे !

अलीकडे माझा साहित्यिक ऋणानुबंध श्री. वि. ग. कानिटकर यांच्याशी वाढला आहे. त्यांच्याशी गप्पा माराव्या, पुस्तकांची देवघेव करावी, कथावस्तूंबद्दल चर्चा करावी असे मला नेहमी वाटते (त्यांनाही बहुधा वाटत असावे.) आठ-पंधरा दिवसांत भेट झाली नाही तर फोन करून मी भेट ठरवतो. तास दोन तास गप्पा मारल्यानंतर मनाचा निचरा होतो आणि मोकळं मोकळं वाटायला लागतं. तरुणपणात साहित्यिक वर्तुळाची आवश्यकता वाटत असे. तास तास गप्पा माराव्या आणि परस्परांच्या सहवासात रमावे अशी इच्छा होई. हल्ली वर्तुळाचा त्रास होतो. एकच एक साहित्यिक मित्राशी शांतपणे गप्पा मारण्यातच मला आनंद वाटायला लागला आहे. श्री. वि. ग. कानिटकर हे माझे तसे साहित्यिक ऋणानुबंधी आहेत.

वि. ग. कानिटकर बरीच वर्षे नोकरीनिमित्त वैतरणा वगैरे असाहित्यिक वातावरणात राहिले आहेत. त्यांच्या मनातला साहित्यिक कंडू जबरदस्त होता आणि आसपासचे वातावरण मुळीही संवादी नव्हते. पंधरा-वीस लोकांच्या कॉलनीत त्यांना दिवस काढावे लागले. त्यामुळे त्यांची साहित्यिक उपासमार झाली असती पण तशी त्यांनी होऊ दिली नाही. वाचनाची आवड त्यांनी सदैव तेवत

ठेवली आणि त्या असाहित्यिक वातावरण गुदमरून जाण्यापासून ते बचावले. असे असाहित्यिक वातावरणात ज्या लेखकांच्या वाटचास येते, त्यांची स्थिती अनुकंपनीयच म्हणावी लागेल. कानिटकरांची लेखनाची आवड तिथे टिकून राहिली हे आश्चर्य !

परंतु केवळ नशिवाने ते एकसष्ट-बासष्टमध्ये बदली होऊन पुण्यास आले आणि त्यांना त्यांच्या आवडीचे वातावरण मिळाले. पुण्यास येणाऱ्या नवीन साहित्यिकांविषयीची वार्ता लगेचच लेखकवर्तुळात पसरते. परंतु कानिटकरांची नोंद तेव्हा घेतली गेली नाही. पुंडलिकांशीच फक्त त्यांची थोडी ओळख होती परंतु बाकीच्यांना ते फारसे माहीत झाले नाहीत. श्री. दि. बा. मोकाशी किंवा विद्याधर पुंडलीक यांच्या बोलण्यात त्यांचा उल्लेख असे पण तोही तितकाच !

माझी आणि त्यांची ओळख केवळ योगायोगाने झाली. माझे वाचन तेव्हा जबरदस्त असे. आणि बहुतेक नव्या व अनोळखी लेखकांची पुस्तके वाचून मी त्यांना पुस्तकाबद्दल पत्रही पाठवत असे. हा माझा अव्यापारेषु व्यापार अजूनही चालूच असतो.

एकदा सहज माझ्या हातात 'शहरचे दिवे' ही कादंबरी पडली. एक-दोन पाने वाचताच मी प्रभावित झालो आणि कथानकाबरोबर वाहत गेलो. त्या कादंबरीचा नायक 'मुंबई शहर' आहे. तिथल्या यांत्रिक व किंचित कठोर जीवनामध्ये माणसात होणारे परिवर्तन दाखवले आहे. कादंबरी वाचल्यावर मी लेखकाचे नाव पाहिले. ते होते वि. ग. कानिटकर ... आणि तिथे पत्ताही दिला होता.

मी नेहमीच्या सवयीप्रमाणे पत्रच लिहिणार होतो, पण वाटले की या सदाशिव पेठेतील पत्त्यावर समक्षच जावे आणि लेखकाशी ओळख करून घ्यावी. पत्र पाठवण्याप्रमाणेच लेखकांच्या घरी जाणे व ओळखी करून घेणे हाही माझा एक छंद आहे.

मी दोन-तीन दिवसांनी त्यांचा पत्ता शोधत गेलो. ते घरी नव्हते. तेव्हा मी त्यांना कादंबरी उत्कृष्ट असल्याची चिठ्ठी लिहिली व खाली सही केली....दोन-तीन दिवसांनी पुन्हा गेलो. गंजिफ्रॉक व पायजमा या घरच्या वेषात ते होते. खोलीत स्वच्छता प्रकर्षाने जाणवली. मला पाहताच ते म्हणाले, "खरे म्हणजे मी तुमच्याकडे यायला हवे होते. पण वाटले की चिठ्ठी लिहून तुम्ही माझी थट्टा करीत आहात. तुमची कीर्ती तशी आहे... पण आता मात्र ती कादंबरी तुम्हाला खरोखरच आवडल्याचे दिसते." आम्ही दोघेही खळखळून हसलो. आणि त्या क्षणापासून आमचा साहित्यिक ऋणानुबंध सुरू झाला.

माझ्या पूर्वीच्या वर्तुळातही त्यांचा शिरकाव झाला आणि दिवस मजेत जायला लागले. पुंडलीक, ग. वा. बेहेरे, पारगावकर, मी स्वतः व वि. ग. कानिटकर हे तेव्हा जास्त जवळ होतो. गप्पागोष्टी करतानाही ते थोडे अलगच वाटत. टिंगलटवाळी किंवा लावालाव्या करण्याची सवय त्यांच्यात कमी आहे. इतरांत ती जास्त प्रमाणात होती. कदाचित असेही असेल की तेव्हा ते या सर्वांपासून बरेचसे मुक्त होते. पुण्याचे पाणी प्यायल्यानंतर त्यांच्यात बरीचशी प्रगती झाली असे म्हटल्यास राग यायला नको. त्यावेळी खाण्यापिण्याच्या (खरे तर पिण्याच्या) जोरदार मैफली होत. त्यातही त्यांचा विशेष सहभाग नसे.... ते एकटे एकटेच असत...हल्लीही ते तसेच असतात.

एकटे राहण्याचा किंवा चिंतनात मग्न असण्याचा त्यांचा स्वभावच असावा. त्यामुळे गप्पाष्टकात वेळ घालवणे त्यांना मंजूर नसावे. त्यांच्या सवयी पाहिल्या तर त्या कष्टाळू लेखकाच्या आहेत. त्यांचे इंग्रजी वाचन जबरदस्त आहे. केव्हाही त्यांच्याकडे गेले तरी टेबलावर दोन-तीन नवी इंग्रजी पुस्तके पडलेली दिसतात. आपण ती उचलून चाळायला लागलो म्हणजे त्यांचा चेहरा उजळतो. ते पुस्तकाच्या विश्लेषणात्मक असे काहीतरी बोलत राहतात. 'तुम्ही हे वाचायलाच हव' असेही बजावतात. मला असे दोन-तीन ख्यातनाम मराठी लेखक माहीत आहेत की जे स्वतः वाचत असलेल्या इंग्रजी पुस्तकाचा मागमूसही दुसऱ्याला लागू देत नाहीत. ती पुस्तके नेहमी ते आतल्या कपाटात ठेवतात. त्यांचा कधीही उल्लेखदेखील करत नाहीत. त्यापेक्षा वि. ग. अगदीच निराळे आहेत. वाचनाबद्दल त्यांचा खुला दरबार असतो.

मी स्वतः पन्नाशी उलटेपर्यंत फारसे इंग्रजी ललित साहित्य वाचलेले नव्हते. कॉलेजमध्ये असताना पाठ्यपुस्तके म्हणून डिकन्स किंवा हार्डीची पुस्तके असत. शेक्सपिअरची नाटके असत. परीक्षेसाठी ती मी जुजबी पद्धतीने वाचली. त्यावरच पुढच्या आयुष्यात गुजराण केली.

माझे इंग्रजी वाचन तोकडे आहे हे कानिटकरांच्या लक्षात आले. ते कळवळयाने म्हणाले, "तुम्ही लेखक म्हणवता आणि तुमचे इंग्रजी वाचन मुळीच नाही...?"

मी मान ताठ करून म्हटले, "इंग्रजी वाङ्मयातून चोऱ्या कराव्यात असे मला वाटत नाही. मी माझे स्वतःचे लिहितो..."

कानिटकरांनी मग माझे बौद्धिकच घेतले. इंग्रजी वाचल्याने लेखकाच्या प्रतिभेला कसा चौरसपणा येतो हे समजावलं ... मी इंग्रजी वाचलेच पाहिजे असा आग्रह धरला ... नंतर त्यांनी मला ब्रिटिश कौन्सिलचे व आणखी एक-दोन लाय-

ग्रन्यांचे मेंबर केले व अमुक वाचा ... तमुक वाचा ... असे मार्गदर्शन केले. पहिल्या काही पुस्तकांत मी अडखळलो ... शब्दकोशाच्या मदतीने अर्थ शोधावे लागले ... पण मग मी मोकाट सुटलो ... दीड-दोन दिवसांत पाच-सातशे पाने फस्त करायला लागलो. माझी वाङ्मयाची समज वाढली आणि प्रतिभेत पुष्टता आली .. हे सगळे त्यांच्यामुळेच घडले. नाहीतर मी केवळ मराठी मासिकातील कथाच वाचत राहिलो असतो... मला नवी क्षितिजे दिसलीच नसती. त्यांच्या व माझ्या भेटीत नव्या इंग्रजी पुस्तकांची चर्चा व त्यांतील कथानकांचे विश्लेपण हा एक आनंदाचा भाग असतो. माझ्या पिढीतील पुणेकरांचे इंग्रजी वाचन अगदीच कमी असे. त्यामानाने मुंबईचे लेखक खूप इंग्रजी वाचन आणि जास्त चांगले लिहीत. कानिटकरांच्या सांगण्याप्रमाणे इंग्रजी वाचनाची त्यांची सवय सदानंद रेगे यांच्यापासून सुरू झाली. ते नेहमी फूटपाथवरील पुस्तके धुंडाळत, चांगले वाटणारे पुस्तक खरेदी करीत. इंग्रजी वाचनाचे लोण रेग्यांकडून कानिटकरांकडे गेले व तिथून ते आमच्यासारख्यांकडे आले. आमचा हा मोठाच फायदा म्हणावा लागेल.

कानिटकरांइतका शिस्तबद्ध आणि कष्टाळू वाचक लेखकांमध्ये मी तरी अजून पाहिलेला नाही .. एखाद्या अवघड विषयाचा अभ्यास करावा त्याप्रमाणे त्यांचे वाचन चालू असते.... अंथरुणावर पडल्यापडल्या... झोप येण्यापूर्वी... आळसटलेल्या अवस्थेत केलेले वाचन त्यांना मंजूर नाही. प्रत्येक पुस्तकाच्या व्यवस्थित नोट्स त्यांच्याजवळ असतात. त्यांच्या अशा कित्येक वह्या भरलेल्या दिसतील. त्यांनी लिंकन, चर्चिल व हिटलरबद्दल पुस्तके लिहिली. ती अत्यंत गाजली याचे कारण त्यांच्या नोट्स!... 'नाझी भस्मासुराचा उदयास्त' या हिटलरवर लिहिलेल्या पुस्तकामुळे साप्ताहिक माणूसला तर जीवदान मिळालेच पण वि. गं. ना मराठी लेखकाच्या मानाने खूप द्रव्यलाभ होऊन त्यांचे नाव लेखक म्हणून स्थिर झाले. त्यांना हिटलरबद्दल सुप्त प्रेम असावे. त्यासंबंधी मी त्यांना विचारले तेव्हा ते म्हणाले, "हिटलरबद्दल खुद्द सुभाषबाबूंनाही प्रेम होते. मग माझ्यासारख्याचे काय!..." 'हिटलरने केलेली दुष्कृत्ये' ही लेखमाला लिहिली तेव्हा विशेप प्रकाशात आलेली नव्हती त्यामुळे त्याच्याबद्दल अप्रीती असण्याचे कारण नव्हते. त्यांची हिटलर आणि चर्चिल यांच्याबद्दलची पुस्तके विशेप गाजली. नाझी भस्मासुराला अजूनही प्रतिसाद आहे. केव्हाही त्यांच्याकडे गेले तरी त्यांच्या टेबलावर तशी पत्रे दिसतात. त्यांपैकी काही तर जुन्या आय. सी. एस. अधिकाऱ्यांची किंवा न्यायाधीशांची पत्रे मी पाहिली आहेत.

असली चरित्रात्मक पुस्तके लिहिणे कठीणच असावे. चर्चिल किंवा हिटलर यांच्यावर उपलब्ध असलेली सर्व पुस्तके वाचायची, नोट्स काढायच्या. नोट्सवर

त्या त्या संदर्भ पुस्तकाचे नाव व पृष्ठ क्रमांक लिहायचा. मिळालेल्या माहितीची जुळणी करायची.... चरित्रविषयावद्दल एक सूत्र ठरवायचे आणि मग प्रत्यक्ष लेखनाला सुरुवात करायची... हे फारच त्रासदायक काम आहे. चरित्रविषया-वरील सर्व पुस्तके वाचायला आणि टिपणे करायलाच चार-पाच वर्षांचा अवधी जाणार आणि नंतर ते प्रकाशकाकडे सुपूर्द होणार ! ... कानिटकरांच्या स्वभावात जर इतका कष्टाळूपणा नसता तर त्यांच्या हातून ही पुस्तके लिहून झाली नसती. असली चरित्रात्मक पुस्तके निर्माण करण्यात श्री. दि. वि. गोखले, किंवा वि. स. वाळिंबे यांच्याप्रमाणेच वि. ग. आहेत. अशा कष्टाळूपणाला गप्पांचे अड्डे जमवणें किंवा हास्यविनोदात वेळ घालवणें शक्य होत नाही.

कानिटकर हे कथालेखक आणि कादंबरीकारही आहेत. कथालेखकाला संदर्भ मिळवण्यासाठी फारसे श्रम करावे लागत नाहीत. एखादी व्यक्तिरेखा मनात भिनली की तो उत्स्फूर्तपणे लिहीत जातो. त्याला नोट्स काढण्याची आवश्यकता भासत नाही परंतु वि. गं. चा तशा लेखनाचा खाक्याही निराळाच आहे. त्यांच्या कथांच्या वेळी मी त्यांच्या जास्त जवळ होतो. त्यांचे 'वर्कशॉप' मी त्या वेळी जवळून पाहिले आहे. अव्वल इंग्रजीतील व्यक्तींवद्दल आणि वातावरणाबद्दल मलाही फार औत्सुक्य आहे. त्यामुळे निरनिराळ्या व्यक्तिरेखांवद्दल ते माझ्याशी बोलत. मलाही खूप माहिती असल्यामुळे आमचे वोलणे तास तास होई... कंटाळा असा कधी येतच नसे... 'वेळ वाया जातो' ही त्यांची नेहमीची कुरकूर अशा गप्पांच्या वेळी होत नसे.

कानिटकरांना जुनी पुस्तके जमवण्याचा फार नाद आहे. एकदा मी त्यांच्या-कडे गेलो असताना ते फार भरून आले. म्हणाले, "आज सर्कसवाल्या छत्र्यांचं चरित्र इंग्रजीत मिळालं .. तुम्ही वाचा." त्यानंतर सर्कसवाल्या छत्र्यांच्यावद्दलच आणि त्यांच्या काळाबद्दल बोलत राहिलो. त्यातूनच कदाचित 'पूर्वज'मधील छत्र्यां-वरील गोष्ट निघाली असावी. 'पूर्वज' पुस्तकाची कल्पनाच अप्रतिम आहे. जुन्या काळातील एक एक व्यक्ती घेऊन त्यांनी कथा लिहिल्या आहेत. हरी नारायण आपटे व काशीताई कानिटकर यांचे पती रावसाहेव कानिटकर यांच्यामध्ये काही दिवस वैमनस्य आले होते. हरिभाऊंची काशीताईंना लिहिलेली पत्रे प्रसिद्ध आहेत. ती वाचल्यावर त्या दोघांमध्ये प्लेटॉनिक लव्ह असावे असा निष्कर्ष मी काढला होता. कानिटकरांचेही तसेच मत पडले... 'पूर्वज'मधील त्यासंबंधीची कथा खूपच बोलकी आहे... मी 'आनंदी गोपाळ' लिहीत असताना तत्कालीन आग-बोटीच्या प्रवासाचे वर्णन कसे करावे हा माझ्यापुढे प्रश्न होता. शंभर वर्षांपूर्वी आनंदीवाई वोटीने अमेरिकेला गेली हे रंगवायचे होते. मी त्यांना त्यावद्दल बोलताच त्यांनी लगेच जुन्या बाजारात घेतलेले 'इंग्लंडच्या प्रवासाचे वर्णन' माझ्या हातात

दिले. ते एका स्त्रीने लिहिलेले होते. वोटीवर सोवळ्या-ओवळ्याची कशी पंचाईत झाली हे त्यात होते... ते पुस्तक म्हणजे मला खजिनाच लाभला.

कथालेखक म्हणून वि. गं. ना यश मिळाल्याचे वाटत नाही. त्यांच्या पहिल्या काही कथांवर गाडगीळांची छाप दिसते. परंतु गाडगीळांचा आणि वि. गं. चा आत्मा भिन्न आहे. त्यामुळे कथावस्तूची ओढाताण होते. परंतु 'पूर्वज'मुळे त्यांनी त्या प्रांतातही आपले नाव स्थिर केले. श्री. के. डी. दीक्षित किंवा माधव मनोहर यांच्यासारख्या वुजुर्गांनीही पूर्वपरिचय नसतानाही 'पूर्वज'चे कौतुक पत्रे पाठवून केले आहे.

वि. गं. च्या माझ्या मैत्रीमध्ये समान धागा कोणता ?... त्यांच्यासारखा मी कष्टाळू व अभ्यासू नाही. गप्पांचे अड्डे जमवण्यात किंवा खाण्यापिण्याचा उपभोग घेण्यात मला रस आहे. परंतु माझे व त्यांचे प्रौढावस्थेपर्यंतचे जीवन एका साच्याचे आहे. त्यांच्याशी जुन्या आयुष्यावद्दल वोलताना मला नेहमीच पुनःप्रत्ययाचा आनंद मिळतो.

हुशार असूनही त्यांना सर्व जन्म ए. जी. च्या ऑफिसमध्ये कारकुनी करावी लागली. त्यांच्या वडिलांची आर्थिक परिस्थिती चांगली नव्हती. त्यामुळे लहानपणी त्यांचे खूप हाल व वंचना झाली. त्या वेळच्या दारिद्र्याचे वर्णन ऐकत असताना मला माझेच जीवन आठवते व मैत्रीचे पाश जास्त घट्ट होतात. कनिष्ठ मध्यम-वर्गीयांचे दारिद्र्य वर दिसत नाही. ते कोमट (Lukewarm) असते. परंतु त्याचा दाह मात्र विलक्षण असतो. कारकुनीतही मनाचा कोंडमारा सारखा होत असतो. तो सोसून स्वतःचे लेखकपण टिकवणे फार अवघड जाते. कळकट आयुष्य आणि पांढरपेशे दारिद्र्य हा आमच्या दोघांमधील समान धागा आहे.

अलीकडे काही वर्ष त्यांचे हे पांढरपेशेपण संपलेले आहे. पत्नीने नोकरी करून साथ दिली व दोन्ही मुले हुशार निघाली हे तर झालेच; परंतु धाकटा भाऊ अमेरिकेत स्थायिक झाल्यामुळे त्यांना नवी क्षितिजे दिसली व झळाळी प्राप्त झाली. ए. जी. च्या ऑफिसमध्ये कारकुनी करणाऱ्या या लेखकाला सर्व भारत, अमेरिका, इंग्लंड, युरोप, आफ्रिका इत्यादी देशांचा प्रवास करता आला ही भाग्याचीच गोष्ट म्हटली पाहिजे.

परंतु हे सगळे असले तरी त्यांच्या स्वभावामधील मध्यमवर्गीय कारकून पूर्णपणे गेला नाही– तसा जाणारही नाही. कपड्यांची तऱ्हा वदललेली नाही. थोडादेखील गर्व अजून शिवला नाही. शिवाय हिशेवीपणा आणि व्यवस्थित-पणा हे आमच्या वर्गाला ललामभूत असलेले गुण त्यांच्या स्वभावात प्रकर्षाने आहेत.

कोणत्याही देवाण-घेवाणीची नोंद त्यांच्याजवळ असते. कुणी अवाजवी फायदा घेण्याचा प्रयत्न केला तर ते त्याला त्याची जागा परखडपणाने दाखवून देतात. मग तिथे भीडभाड नसते.

वि. गं. च्या स्वभावात एक प्रकारचा घरेलूपणाही आहे. प्रसंगात सापडलेल्या मित्राला मदत करण्याचा त्यांना नेहमी ध्यास असतो. ते ज्या ज्या घरी जातात, त्या त्या घरातील सर्वांचे ते होतात. नुसतेच बाहेरच्या दिवाणखान्यातले राहात नाहीत. मी त्यांच्या घरी गेलो की, माझ्या आवडीचे खाद्यपदार्थ पुढे येतात. माझी आणि त्यांची फक्त साहित्यिक ओळख आहे. पण ते माझ्या घरी आले की ते माझ्या बायकोशी व सुनेशी तर बोलतातच पण नातवंडांसाठीही बिस्किटे, चॉकलेटस् किंवा पापडाच्या लाटया हमखास आणतात. असा घरेलूपणा माझ्याबाबतीत फारच थोडया लेखकमित्रांनी दाखवलेला आहे. मी वि. गं. कडे गेलो म्हणजे मी तसा घरगुतीपणा निर्माण करण्याचा प्रयत्न करतो... पण शेवटी तो एक उपचारच ठरतो.

अलीकडे मी शहरापासून खूप लांब राहातो. भेटीगाठी नेहमी होणे- शक्य नसते. माझ्या आयुष्यातील बरेचसे साहित्यिक ऋणानुबंध आता संपत चालले आहेत. तसे कानिटकरांच्या बाबतीतही होईल किंवा काय अशी सारखी भीती वाटत असते.

मग मी एखाद्या सकाळी बसचा त्रासदायक प्रवास करून त्यांच्या घरी जातो... त्यांना आनंद झाल्यासारखे वाटते. मग आम्ही दीड-दोन तास एखाद्या जुन्या पुस्तकावर किंवा अनुभवावर बोलत राहतो. त्यांच्या गाठी खूप थरारक व विचित्र अनुभव असतात. ते ऐकताना आम्ही आम्हाला विसरतो.

असा हा साहित्यिक ऋणानुबंध... तो टिकावा !



अनुक्रमणिका

# माटे-सहस्रबुद्धे

## ग. वा. बेहेरे

अगदी नाही म्हटले तरी गेली पन्नास वर्षे मी साहित्यजगतात वावरतो आहे. खरे म्हणजे शालेय जीवनापासूनच साहित्यलेखनाला आणि साहित्यिक जीवनाला आरंभ झाला, असे म्हणायला हरकत नाही. अर्थात याचे कारण सुप्रसिद्ध विचारवंत पु. ग. सहस्रबुद्धे हे आमचे वर्गशिक्षक होते व ते आपला मूळ विषय इंग्रजी जितक्या निष्ठेने शिकवत असत, तितक्याच निष्ठेने अनेक वाङ्मयीन अनुभव आम्हाला ग्रहण करायला लावीत. 'डिझायर' या इंग्रजी चित्रपटापासून ते कॉनन डॉयल यांच्या शेरलॉक होम्सपर्यंत त्यांनी आम्हाला साहित्यप्रवास घडवला. लोकहितवादींपासून ते सावरकरांपर्यंत महाराष्ट्राच्या सांस्कृतिक व साहित्यिक धनाची त्यांनी आम्हाला ओळख करून दिली. रामदासांखेरीज इतर संतांच्यावर त्याचा राग होता. त्यांना ते संताळे म्हणत. त्यामुळे त्यांच्याकडून संतांनी आपल्या देशासाठी काय केले नाही, हे आम्हाला कळले. पुढे बापूसाहेब माटयांच्याकडून संतांनी, शिवाजीने पुढे जे स्वधर्माचे राज्य निर्माण केले, त्याची पार्श्वभूमी तयार केली, ही दुसरी बाजूही आम्हाला समजली. प्रेमाचा घाऊक व्यापार करणारे ना. सी. फडक्यांचे नायक किंवा खांडेकरांचे स्वप्नाळू नायक, या दोघांचीही त्यांनी यथेच्छ चेष्टा केली. ज्यांचा राष्ट्र घडवण्यासाठी कोणताही हात-भार लागलेला नव्हता, अशा सर्व साहित्यिक प्रवृत्तींची त्यांनी यथेच्छ निंदा केली. त्यामुळे रामदासस्वामी, विष्णुशास्त्री चिपळूणकर, राजवाडे, लो. टिळक, सावरकर या साऱ्यांच्या सामूहिक कार्याचा लहानपणीच माझ्यावर पगडा बसला. आणि तो त्यानंतर कधीही हलला नाही.

वाङ्मयीन ऋणानुबंध या शब्दाला जर काही खराखुरा अर्थ असेल तर तो माझ्या बाबतीत, पु. ग. सहस्रबुद्धे व बापूसाहेब माटे यांच्याशीच आला. विज्ञान-प्राणीत समाज, हिंदुत्व आणि राष्ट्रनिष्ठा या विषयांत त्या गुरुशिष्यांची मते एक

अनुक्रमणिका

होती, पण इतर कितीतरी गोष्टींत त्यांची मतभिन्नता होती. संतवाङ्मयाचे उदाहरण वर दिलेच आहे. मराठी ललित वाङ्मयावद्दलही ते लोकाभिमुख नाही अशी सहस्रबुद्धयांची तक्रार होती याउलट वापूसाहेब माटे यांची सामाजिक परिस्थितीतून साहित्य निर्माण होते अशी धारणा होती. संतांनी प्रत्यक्ष मुसलमानी आक्रमणाला विरोध केला नसेल व असेलच तर तो क्षीण असेल, पण आचरण्याला सोपा असा भक्तिसंप्रदाय जर महाराष्ट्रात निर्माण झाला नसता तर ज्याचे रक्षण करावे असा हिंदुधर्म या ठिकाणी उरलाच नसता अशी वापूसाहेव माटयांची मीमांसा होती. नव्या इंग्रजी संस्कृतीने माणसाचे मन पराधीन केले आहे म्हणून इथले साहित्यही पराधीन आहे, असे ते मानत असल्यामुळे ते तत्कालीन मराठी साहित्यिकांविरुद्ध संतापत नसत. सहानुभूती हा वापूसाहेव माटयांच्या जीवनशक्तीचा प्राण होता आणि प्रखर बुद्धिवाद हा सहस्रबुद्धयांच्या विचारांचा पाया होता. कात्रीच्या या दोन्ही पात्यांत माझ्यासारखे विद्यार्थी भरडले गेले. आजही माझ्या सर्व लेखनात दोन व्यक्तिमत्त्वे दिसतात. ती दोन व्यक्तिमत्त्वे म्हणजे खऱ्या अर्थाने सहस्रबुद्धे व माटे यांच्याच सावल्या होत. राजकीय लेखनात एक कठोर तार्किक साखळी आणण्याचा मी प्रयत्न करतो. त्यावेळेस सहस्रबुद्धे माझ्यावर स्वार झालेले असतात. पण याउलट माझे जे ललित लेखन आहे, विशेषतः–' कटाक्ष ' या सदरातील– तेथे आक्रमकतेपेक्षा समजूतदारपणाचा वापर करण्याचा मी प्रयत्न करतो. एखाद्याचा पराभव करायचा असेल तर त्याला सरळसरळ घायाळ करून पराभूत करता येते किंवा त्याला शब्दलाघवात गुंतवून नेत कुठेतरी लांब नेऊन अधांतरी सोडून देता येते. हा विषय सुचवणाऱ्यांच्या मनात, माझ्या साहित्यसंसारातील कोणातरी निकटवर्तीयावद्दल विस्ताराने व हळुवारपणाने मी लिहावे, अशी अपेक्षा असावी.

गेली पंचवीस वर्षे मी सातत्याने इतके लिहीत आलो की, त्यात माझ्या साहित्यिक ऋणानुबंधीयांसंबंधी मी अनेकदा लिहिले जरी वाचक वदलत असले तरी लेखक तोच असतो व त्यालाही पुनरुक्तीचा कंटाळा येऊ लागतो. माधव मनोहर, पु. भा. भावे, ना. सी. फडके, ग. दि. माडगूळकर, आचार्य अत्रे, अनिल वर्वे, बा. भ. पाटील, नरहर कुरुंदकर या व अशा अनेक व्यक्तींच्यावर मी खूप लिहिले आहे. साहित्याचे जग फार गुंतागुंतीचे असते. आपल्यावर नेमके कुणाचे किती परिणाम झाले आहेत, याची मोजदाद करणारे यंत्र आपल्याजवळ नसते. सत्तर ते ऐंशी या कालखंडात मी साहित्यिक चळवळीत खूप बुडालो होतो. कऱ्हाडच्या साहित्य संमेलनापासून ते जळगावच्या साहित्य संमेलनापर्यंत जे जे वादग्रस्त ठराव संमेलनात मांडले गेले ते माझेच होते व त्या प्रत्येक ठरावाच्या मागे काही इतिहास होता. याच निमित्ताने दुर्गाबाई भागवत, राम शेवाळकर, गजमल माळी, शंकरराव खरात, भीमराव कुलकर्णी, नरहर कुरुंदकर यांच्याशी माझे घनिष्ठ सबंध निर्माण झाले.



अनुक्रमणिका

कुसुमाग्रज, दुर्गा भागवत ही माझ्या आदराची स्थाने आहेत. त्यांचा लोभ मला संपादन करता आला पण मैत्रीला आवश्यक असणारी समानता आमच्यात निर्माण होणे शक्यच नव्हते. मराठीतले बहुतेक सर्व आघाडीचे नाटककार, लेखक, विचारवंत या सर्वांशी माझे घनिष्ठ संबंध आले. दोन-चार अपवाद आहेत की, ज्यांचे माझे आत्मीयतेचे संबंध निर्माण होऊ शकले नाहीत पण बाकी माझ्या साहित्यिक चळवळीमुळे माझ्या संबंधात सारेजण आले. माझ्या अगदी जवळ आले त्यात कालानुक्रमे सांगायचे तर भा. द. खेर, वि. स. वाळिंबे, विजय तेंडुलकर, व. पु. काळे, शं. ना. नवरे, वसंत कानेटकर यांचा समावेश करता येईल. आयुष्यातील दहा वर्षे तरी भा. द. खेर व मी जवळपास रोज भेटत होतो. आता येणे-जाणे राहिले नाही. तीच गोष्ट शं. ना. नवरे यांची. एक काळ असा होता की डोंबिवली ते व्ही. टी. हा प्रवास खंडित करून शन्ना हा दादरला उतरायचा. त्याच्याशीही पुढे कोणतेच कारण न घडता संबंध कमी झाले. ऋणानुबंध का निर्माण होतात, ते का वाढीला लागतात व ते का फिके होतात याला कार्यकारणभाव नाही. कुणाशीही माझे भांडण झाले नाही किंवा देण्याघेण्यावरून दुरावाही निर्माण झाला नाही. असे असूनही दोघांचीही भेटीची उत्सुकता मावळली की असे होत असावे. येणे-जाणे कमी झाले की, त्या दोघांच्या संबंधातून मैत्री नावाची जी चीज निर्माण होते ते प्रसंग कमी होत जातात.

आता जेव्हा मी मागे वळून पाहतो तेव्हा लक्षात येते की, आपले मन कितीही मोठे असले तरी त्यात मावणाऱ्यांची संख्या फार अमर्याद असू शकत नाही. माझ्या व्यवसायामुळे व साहित्यिक चळवळीमुळे खूप माणसांशी माझे दृढ परिचय झाले. पण त्या सर्वांसाठी द्यायला माझ्याकडे वेळ नव्हता. त्यामुळे मैत्रीची वाढ खुंटली. त्यांचेही तसेच झाले असले पाहिजे. अनेकांची वये झाली व उत्साह मावळला. माझ्या वृत्तपत्र-व्यवसायामुळे अजूनही माझा आधुनिक साहित्याशी संबंध टिकून आहे, तसा तो इतरांचा उरला नाही. त्यामुळे भरभरून किंवा भारून बोलण्यासारखे आता विषयच नाहीत. त्यांतली काही माणसे आता मला भेटू नयेत असे वाटते. कारण वयाच्या मानाने ती अधिकच म्हातारी झालेली आहेत. साहित्यिकाचे कुतूहल संपले की त्याचे आयुष्य संपते. स्वप्नाळू वय संपलेले असते, महत्त्वाकांक्षेच्या मर्यादा कळलेल्या असतात, त्यामुळे ज्या एका निरर्थक उद्योगात वर्षानुवर्षे गेली ते साहित्य तद्दन तकलादू वाटते. आणि साहित्यिकताच निरर्थक वाटू लागली तर साहित्यिक ऋणानुबंध टिकणार कसे ?

एके काळी याच माणसांच्याजवळ जी. ए. ची नवी कथा, आरती प्रभू किंवा ग्रेस यांचा नवा कवितासंग्रह, गाडगीळांचे एखादे वादग्रस्त विधान या साऱ्या गोष्टींनी एखाद्या मयसभेचे वातावरण निर्माण होत होते. त्यावेळेस जी. ए. च्या

कथेचा अर्थ जीवनातील सर्वांत महत्वाची गोष्ट वाटे. आता लक्षात आले आहे की जी. ए. च्या गोष्टीचा व जीवनाचा काही संबंधच नाही. रंगभूमीवर वावरताना नट एक वेगळे अवसान घेऊन रूपभ्रम निर्माण करून आपल्याला एक काल्पनिक सत्य वास्तवात उतरवून दाखवतो. पण पडदा पडला की, ते तकलादू सत्य निघून जाते. मळका लेंगा घालून, दारू पिऊन अर्वाच्य बडबड करणारा तो मघाचा युधिष्ठिर, लो. टिळक किंवा आण्णासाहेब कर्वे हा वास्तवात कसा असतो ते कळते. क्रांतिकारक लेखक किती भेकड असतात हे अनुभवायला मिळते. ज्याच्या असामान्य प्रतिभेवर लुब्ध होऊन मी ज्याच्यापुढे नम्र होतो असा एखादा प्रतिभासंपन्न लेखक तुमच्या तुतारीपुढे आमच्या सनईचा काय पाड लागणार, असे क्षुद्र मत्सरी विधान करतो तेव्हा गदगदून येते. आणि वाटते, प्रतिभेची दिव्य वस्त्रे नेसून हे यक्ष आमच्या आयुष्यात आलेच का, त्यांनी आम्हाला भुरळ घातलीच का? आणि त्या भारलेल्या आयुष्यात आम्हाला राहू द्यायचे सोडून आपली क्षुद्रता त्यांनी दाखवलीच का? संपत्तीच्या वाटणीच्या वेळेस भावाभावांतले नाते संपते. प्रेमात वाटेकरी निर्माण होईल या भीतीने पतिव्रतेची लक्तरे होतात तेथे साहित्यिक शालूंचे फडके झाल्याबद्दल दुःख करण्यात अर्थ नाही.

अस्सल उमदेपणा आहे म्हणून कुसुमाग्रज कधी मलीन झाले नाहीत. स्वातंत्र्याच्या उच्चारासाठी मृत्यूही हसतमुखाने स्वीकारण्याची उग्रता आहे म्हणून दुर्गा भागवत कधी मनातून उतरल्या नाहीत पण कितीतरी मोठी समजली जाणारी माणसे फार लहान झालेली पाहिली. माझे ऋणानुबंध अनेक वेळा असे तटातट तुटलेले आहेत, त्यामुळे अनेकदा मी नाउमेदही झालो आहे. परमेश्वराने लिहिण्याची विद्या दिली, फार नाही पण अल्प स्वरूपात प्रतिभा दिली, शब्दही वाकून दास झाले त्या अशा दैवी संपत्तीचे उधळमाघळ करणाऱ्या साहित्यिकांना आपले ऋणानुबंधी कसे मानायचे? गेल्या पिढीतही खणखणीत आवाज करणारी नाणी जशी होती, तशीच बद्द असणारी नाणीही होती. वाजवून पाहिल्याखेरीज खरे नाणे कळत नाही कारण दिसायला सगळीच नाणी सारखी असतात. पण प्रसंग येतो, तेव्हाच बृहन्नडासुद्धा अर्जुन होतो आणि उत्तर राजकुमार असूनही सारथी होतो.

तसे पाहायला गेले तर मी काही फार मोठा लेखक नाही. पहिल्या चार–दोन पंक्ती उठल्यावर मला कदाचित जागा मिळेल. पत्रकारांच्या पंक्तीत मुळातच भाषिक वृत्तपत्र, तेही साप्ताहिक व तेही मतपत्र असल्यामुळे मला कसेबसे पहिल्या पंक्तीत शेवटी शेवटी स्थान मिळेल. पण पत्रकारिता ही कोणी साहित्य मानत नाही. कारण वृत्तपत्र लिखाण अल्पजीवी असते, तात्कालिक असते व त्याहीपेक्षा

ते निसरडे असते. पण ज्याने तात्कालिकापेक्षा शाश्वत सत्यांचा पाठपुरावा केला, ज्याचे लेखन बराच काळ उलटून गेला तरी काहीजणांना आवर्जून स्मरण करून देते व ज्याने पत्रकारिता हे एक रात्रंदिन चाललेल्या युद्धातील अस्त्र मानले त्यालाही साहित्यिक म्हणून मान्यता नाही. साहित्यिक म्हणून मान्यता मिळण्याचे जे निकष निर्माण झाले आहेत त्या दर्जाचे त्याचे ललित लिखाण नाही. इथेही मला माझ्या दुहेरी व्यक्तिमत्त्वाचीच आठवण येते. सहस्रबुद्धे व माटे यांनी माझे व्यक्तिमत्त्व दुभंगवून टाकले तसेच पत्रकारितेनेही माझे व्यक्तिमत्त्व दुभंगवून टाकले आहे. हा माझ्या आयुष्याचा साचा माझ्या बालपणीच ओतला गेला व त्यातून माझी सुटका नाही.

साहित्यात मला अनेक चांगले मित्र भेटले, त्यांनी मन भरभरून माझ्यावर प्रेम केले. तसे मला साहित्यात शत्रूही आहेत. पण मी मित्रांशी मित्रासारखा व शत्रूंशी शत्रूसारखा वागलो नाही. ग. दि. माडगूळकर, पु. भा. भावे, जयंतराव देवकुळे हे माझे जीवश्च–कठश्च मित्र होते. पण त्यांच्यावर टीका करताना पु. ग. सहस्रबुद्ध्यांनी माझ्यावर कब्जा केला व इष्टमित्र असले तरी युद्धभूमीवर त्यांना कसलीही दयामाया दाखवायची नाही, हा धडा मी गिरवला. एकदा खुद्द पु. ग. सहस्रबुद्धेही त्यात सापडले. इंदिरा गांधींचा पुरस्कार करणाऱ्या एका पत्रकावर त्यांची स्वाक्षरी पाहून ' हे आमचे गुरूच नव्हत ' असा मी एक अतिशय परखड लेख लिहिला. पुढे जेव्हा समक्ष गाठभेट झाली तेव्हा हळवे झालेले सहस्रबुद्धे म्हणाले, " तुला खरंच वाटतं की, माझ्या तत्त्वाशी मी बेइमानी केली ?" तेव्हा मी म्हणालो, " मी सहस्रबुद्ध्यांचा शिष्य आहे. खरोखरच मनाला पटल्याशिवाय मी काही लिहीत नाही." त्यावेळेला त्यांची हरवलेली दृष्टी परत स्पष्ट व्हायला वेळ लागला. धोतराच्या सोग्याने चष्म्याच्या काचा पुसत त्यांनी सुस्कारा सोडला. हे व असे अनेक प्रसंग माझ्यावर आले.

भाव्यांच्यावर असाच एक ' सच्चा हिंदू–एकांतिक मुसलमान ' असा लेख मी लिहिला. भावे पाच-पंचवीस जणांच्या समक्ष म्हणाले, " मैत्रीचे मोल तुला समजले नाही बेहेरे." वास्तविक मी त्यावेळेला गप्प बसायला हवं होते. पण भावेकुळाचा वारसा सांगणाऱ्या बेहेरेला गप्प बसून चालणार नव्हते. मी त्यांना म्हणालो, " मैत्रीपेक्षा अधिक उच्चतर मूल्ये जगात आहेत. ती पाळताना मैत्रीचा उपमर्द एखादे वेळेस होईल. त्याला इलाज नाही." भाव्यांच्या हिरव्याशार घेरकी डोळ्यांत मिस्किल हास्य आले. त्यांनी खिशातून दहा रुपयांची नोट काढली व म्हणाले, " तू कुराणबंदीसंबंधी काही याचिका दाखल करणार आहेस त्याला हे माझे अल्पसे साहाय्य."

मित्रांच्या बाबतीत हे असे घडले व शत्रूंच्या बाबतीत शत्रुत्व कायम ठेवणे मला जमले नाही. या ठिकाणी दुसऱ्याला समजून घ्यावे, या बापूसाहेबांच्या सिद्धांताने माझ्यावर मात केली. त्यामुळे ज्यांच्याशी माझे खूप मोठे भांडण झाले त्या बहुतेकांशी माझी पुढे खूप गट्टी जमली. माझ्या मनावर बापूसाहेब माटे व सहस्रबुद्धे हे अजूनही स्वार झालेले आहेत. कठोर तर्ककर्कश अशी भूमिका मला अनेकदा घ्यावी लागते तेव्हा सहस्रबुद्ध्यांशी असलेले अबोल नाते मला जाणवत असते. त्याचप्रमाणें वैराचे कारण संपते, रागाचा उपशम होतो तेव्हा ते विष बरोबर बाळगण्यात आता धोका आहे, असे जाणवायला लागते, शब्दांची धार कमी होते, आवेश मावळायला लागतो व आपोआपच मला कधीही न शोभणारी उदारता माझ्या ठायी निर्माण होते, तेव्हा त्या उदार, श्रीमंत, श्रीपाद महादेव माटे यांची सावली मला सामावून घेत असते.

आज कितीतरी लेखकांशी माझे मैत्रीचे संबंध आहेत. काहींशी प्रेमाचेही संबंध आहेत. पण ऋणानुबंध या शब्दात ऋणाचा अनुबंध हा अर्थ अभिप्रेत असावा. त्या अर्थाने माझे ऋणानुबंधी दोनच. एक पु. ग. सहस्रबुद्धे व दुसरे श्री. म. माटे. या दोघांच्या डोळ्यांतूनच मी जग पाहिले. दोघेही इहवादी होते. त्यामुळे जीवन ही एक आनंदयात्रा आहे, हे नकळत मी त्यांच्याकडून शिकलो. पण आपल्याला मिळालेला आनंद इतरांतही वाटून टाकला पाहिजे, हा उत्तरार्ध अधिक महत्त्वाचा आहे.

संपादक सोबत –
चित्रकुटी, टिळक रोड, पुणे ३०.



अनुक्रमणिका

# मित्रवर्य उमाकान्त ठोमरे

**जयवंत दळवी**

खूप वर्षांपूर्वीची गोष्ट आहे. त्यावेळी माझी लेखनातली उमेदवारी चालू होती. त्या काळात एखाद्या मासिकाचा संपादक आपल्याकडे यावा या गोष्टीचा खूप आनंद वाटे. तशातही मासिकांच्या दिवाळी अंकांची तयारी सुरू झाली आणि संपादक आपल्याकडे आला म्हणजे मग बघायलाच नको! मी स्वत: मासिकांच्या कचेरीत जाऊन संपादकाबरोबर गप्पा छाटीत बसणाऱ्यांपैकी नाही. त्यात काही कर्मीपणा आहे असे मला कधी वाटले नाही. उलट मी मुंबईच्या 'प्रभात' दैनिकात नोकरीला होतो, तेव्हा तिथेच 'मौज–सत्यकथे' चीं कचेरी होती. श्री. पु. भागवत आणि ग. रा. कामत संपादक होते. त्यांच्याकडे तासन्‌तास गप्पा छाटत बसलेले लेखक (गंगाधर गाडगीळ, पु. शि. रेगे, व्यंकटेश माडगूळकर वगैरे) मी पाहात होतो आणि त्या घोळक्यात आपलाही समावेश व्हावा असे मला वाटत होते. पण एकेकाचा एकएक स्वभाव असतो. मला ते कधी जमले मात्र नाही. त्यामुळे त्या काळात एखादा संपादक मला शोधत माझ्याकडे आला तर खूप आनंद वाटे. एकदा असेच उमाकान्त ठोमरे आले. त्यापूर्वी त्यांना मी फक्त दुरून पाहिले होते, त्यांच्या काही किरकोळ कथा वाचल्या होत्या. मी 'लोकमान्य' दैनिकात वार्ताहर म्हणून नोकरीला होतो (१९४९–५०). तेथे प्रमुख वार्ताहर होते वसंत पोरेडी. त्यांना साहित्याबद्दल अपार प्रेम आणि लेखक होण्याचे माठ आकर्षण! त्यांचे इंग्रजी साहित्याचे वाचन चांगले होते. त्यांनी अप्टन सिंक्लेअरची 'जंगल' ही कादंबरी तेव्हा भाषान्तरित केली होती, आणि उमाकांत ठोमरे यांनी एक छोटी प्रकाशन-संस्था काढून ती कादंबरी प्रकाशित केली होती. मराठी 'जंगल' कादंबरीचा त्या-काळी बऱ्यापैकी बोलबाला झाला होता. त्या निमित्ताने अक्षरशः हवेत चालल्या-सारखे ठोमरे 'लोकमान्य'च्या कचेरीत वसंत पोरेडींना भेटायला येत. त्यावेळी त्यांच्याशी माझी ओळख झाली नव्हती. मी तर कोणीच नव्हतो. आणि ठोमरे यांचे तीन–चार कथासंग्रह प्रसिद्ध झाले होते. ('इन्किलाब झिंदाबाद', 'सुखदुःख'

'यशोधरे, दार उघड', 'रंगरूप' वगैरे.) त्या काळात मी त्यांचे फारसे काही वाचले नव्हते. तरी माझ्या दृष्टीतून ते मोठे लेखक होते. शिवाय त्यांचे दणकट बांध्याचे, रुंद चेहऱ्याचे आणि चांगले उंचे-पुरे व्यक्तिमत्त्व ! अंगावर उत्तमातले उत्तम कपडे. कोणी अनोळखी माणसाने पाहिले असते तर हा माणूस एखाद्या मोठ्या कंपनीचा मॅनेजिंग डायरेक्टर असावा आणि आताच तो आपल्या कार-मधून उतरला असावा असे वाटले असते. त्याकाळी माझ्या अंगावर राष्ट्रसेवा दलाचा पोपाख ! त्यामुळे ठोमरेंचा पोपाख आणि एकूण रूबाबच मला भुरळ पाडीत असे. त्यांच्या तोंडातला पाइप हा तर कधीच काढता येत नाही असाही भास होई ! (माधव मनोहरांचा चिरूट आणि ठोमरेंचा पाइप !) ठोमरेंची 'धरित्री' ही प्रकाशन संस्था होती, आणि त्या संस्थेतर्फे पुढे-मागे आपलेही एखादे पुस्तक निघू शकेल असेही आतून वाटे ! पण त्या काळात त्यांची ओळख मात्र झाली नाही !

आणि एकदा उमाकान्त नीमराज ठोमरे माझ्या ऑफिसात आले. दिवाळी अंकांच्या तयारीचा काळ होता. मी पूर्वी ज्या खानावळीत जेवायला जात असे त्या 'अनंताश्रमा'चा एक छोटा छापखाना होता. ते मालक खाणावळ आणि छापखाना दोन्ही चालवीत. त्यांनाही थोडीफार साहित्याची आवड. त्यांनी त्या आवडीमुळे आणि छापखान्यालाही हुकमी काम मिळावे म्हणून 'वीणा' नावाचे डायजेस्ट मासिक सुरू केले होते. काही महिन्यांनंतर मासिक चालवण्याऐवजी खाणावळच चालविणे अधिक किफायतशीर असे त्यांना वाटले. ठोमरे आणि श्रीकृष्ण घोटगे या दोघांनी ते मासिक चालवायला घेतले. त्यावेळी (आणि पुढेही) ठोमरे विटा-चुना विकणाऱ्या एका कंपनीत अल्पशा पगारावर नोकरी करीत. श्रीकृष्ण घोटगे शिक-वण्या करीत. दोघांनीही आपली पोटाची मुख्य कामे तशीच सुरू ठेवून 'वीणा' चालवायला घेतले. (काही लेखक मंडळी 'आता ठोमरे आणि घोटगे 'वीणा' या नावाची खानावळच सुरू करतील' असे म्हणायची !) ठोमरे यांनी 'वीणा' मासिकाला दर्जा प्राप्त करून दिला. 'सत्यकथा', 'अभिरूची' आणि 'वीणा' असे साहित्यिकांत उल्लेख होऊ लागले.

अशा काळात ठोमरे माझ्याकडे 'वीणा'च्या दिवाळी अंकासाठी कथा मागा-यला आले. मला खूप आनंद झाला होता. त्यानंतर त्यांच्या अनेक अंकांतून आणि सर्वच दिवाळी अंकांतून मी काही ना काही लिहीत आलो. त्यावेळी जेव्हा ठोमरे प्रथम आले तेव्हा त्यांचा ड्रेस पाहाण्यासारखा होता. मी अमेरिकन कचेरीत नोकरीला होतो, तरीही तसा पोपाख मी कधी केला नव्हता. ठोमरे संपूर्ण लोकरी सुटात. तोंडात पाइप. एका हातात ब्रीफकेस. दुसऱ्या हातात तंबाखूचा पाऊच ! त्यांच्या चष्म्याची फ्रेमही त्यावेळी वेगळी असे. त्यांची सगळी हालचालही प्रेक्षणीय

असे. बसल्याबरोबर गॉगल काढून बाजूला ठेवणार... नेहमीचा चष्मा लावणार. कट्...कट्...कट्...कट् असा आवाज करीत ब्रीफकेस उघडणार. तोंडातला पाईप काढून झाडून आत ठेवणार... बॅगेतला दुसरा पाईप काढणार... वेगवेगळी बारकी आयुधे काढून तो साफ करणार. हे चालू असताना अनेकदा विनोद करणार... माझ्या 'चक्र' कादंबरीतला लुका हा नायकिणीकडे जाण्याचा विचार 'आज पाइप खाली करना पडेगा!' अशा शब्दात व्यक्त करतो. ठोमरेंनी आपल्या तोंडातला पाइप काढला आणि तो साफ करताना गंभीरपणे म्हटले– 'आज पाइप खाली करना पडेगा! त्या विनोदाने मी त्यावेळी खूपच हसलो होतो.

ठोमरेंनी हा आपला विनोदी स्वभाव आजतागायत जोपासून ठेवला आहे. मागे जनता पक्षाची वाट लागल्यानंतर ठोमऱ्यांना मधू लिमये भेटले. दोघेही दोस्त! त्या भेटीबद्दल ठोमऱ्यांनी मला कार्ड लिहिले... 'परवा मधू लिमये भेटले. म्हणालो– या राजकारणाने तुमचे डोके कसे फिरून जात नाही? तसे ते म्हणाले– काय करणार? जन्माचे मागे लागलेय ते! तसे मी म्हटले– मग विरंगुळा म्हणून अधूनमधून नाटके पाहावीत!... आहे का एखादे नवीन चांगले नाटक? अशी लिमयांनी पृच्छा करताच मी म्हणालो– येता? संघात 'मंतरलेली चैत्रवेल' हे छान नाटक लागलेय! तसे ते उसळून म्हणाले– कुठं संघात? अहो, संघाशी संबंध ठेवायचा असता तर मी जनता पक्षातून बाहेर कशाला पडलो असतो?'

प्रत्यक्षात ठोमरेंना मधू लिमये भेटले एवढे खरे! 'संघा'चा विनोद ठोमरे यांचा! पण असा विनोद करणे आणि पत्राद्वारे मित्रांना कळविणे हा त्यांचा एक आवडता छंद! ठोमरेंची पत्रे खरोखरच वाचण्यासारखी असतात.

प्रारंभीच्या काळात कधी तरी ठोमरे यांनी आपले व्हिजिटिंग कार्ड मला दिले होते. जाहिरातीसाठी कोठे गेले तर ठोमरे ते कार्ड वापरीत. त्यात त्यांच्या पत्त्यात 'देवस्थळी बंगला' असा उल्लेख होता. त्यामुळे बरेच दिवस ठोमरे बंगल्यात राहतात असा माझा समज होता. पत्ता बोरिवलीचा, आणि नॅशनल पार्कजवळ! त्यामुळे ते बंगल्यात राहातही असतील असे मला वाटले. आणि एक प्रकारचा हेवाही वाटला. प्रथम मी त्यांच्या घरी गेलो तेव्हा एकदम माझा विरस झाला. देवस्थळी बिल्डिंगमध्ये त्यांच्या फक्त दोन खोल्या होत्या. प्रत्यक्षात दीडच! एक मध्यम आकाराची खोली आणि अर्ध्या खोलीत स्वयंपाकघर. पण गंमत अशी की आपण एका आटोपशीर छोटया खोलीत बसलोय याची जाणीव क्षणभरच होते. हळूहळू आपली जाणीव विस्तृत होत जाते आणि मग आपण मोठ्या दिवाणखान्यात बसलो आहोत... आणि बाहेर पडताना तर बंगल्यातून बाहेर पडतो आहोत असे वाटू लागते. त्यानंतर मी अनेकदा ठोमरेंच्या घरी गेलो. प्रत्येक वेळी मला हा अनुभव आला! याचे कारण ठोमरे त्या दीड खोलीतही मोठे समृद्ध

जीवन जगत असतात. त्या दोन खोल्यांत काय नाही ? बंगल्यात नसेल ते त्यांच्याकडे असते. उत्तमोत्तम गाजलेली इंग्रजी–हिंदी–मराठी पुस्तके. देशी–परदेशी संगीताच्या ध्वनिफिती. एखाद्या चित्रकारालाही हेवा वाटावा अशी चित्रे. देशोदेशीहून आणलेले पाइप. वेगवेगळ्या गंधांचे तंबाखू. सिगरेटी !... आणि या सर्वांवर ठोमरेंची रसपूर्ण कॉमेंट्री ! कुठल्या मित्राने कुठल्या देशातून येताना काय काय आणून दिले याची वर्णने !

ठोमरे यांनी ' वीणा ' मासिक काही वर्षे चालवले. त्यात त्यांनी हौसच अधिक केली. दिवाळी अंकाच्या वेळी प्रयत्नपूर्वक थोड्या जाहिराती मिळवल्या आणि त्यात मिळालेल्या पैशातून खर्चाची बिळे बुजवली, पण म्हणून कोणा लेखकाचे काही त्यांनी मोफत छापले नाही. त्यांचा मोबदला इतरांच्या तुलनेने माफक असायचा. अनेकदा तो उशिरा दिला जायचा. पण त्यांचे लेखकांशी संबंधच असे होते की कुणाला आपल्याला मोबदला मिळावा, लवकर मिळावा असे कधीच वाटले नाही. फक्त त्यांचा मोबदला हा आम्ही विनोदाचा विषय केला होता. पण आमच्यापेक्षा त्या मोबदल्यावर ठोमरेच अधिक विनोद करायचे. फूल ना फुलाची पाकळी पाकिटात घालून ते हळूच गंभीरपणे पाकीट पुढे करायचे आणि म्हणायचे– ' हे ब्लॅकचे आत्ता घेऊन ठेवा... व्हाइटचा चेक नंतर येईल !' आणि मग हसून आपणच म्हणत, ' आम्ही ' वीणा ' चा काळा पैसा देतो म्हणूनच भारतात काळा पैसा एवढ्या मोठ्या प्रमाणावर बोकाळला आहे !

दुर्दैवाने ' वीणा 'सारखे साहित्यिक दर्जा असलेले मासिक पैशाच्या तंगीमुळे चालू शकले नाही. पुढे ठोमरे ' नवनीत ' या डायजेस्ट मासिकाचे संपादक झाले. त्याही मासिकावर त्यांनी आपला ठसा उमटविला. परंतु चालकांनी ' नवनीत 'च्या सर्वच भाषांतील आवृत्त्या बंद केल्या. त्यानंतर ठोमरे यांनी ' कवडसे ' या दिवाळी अंकाचे दोन–तीन वर्षे संपादन केले. त्याच्या प्रत्येक अंकाचे संपादन त्यांनी इतके वैशिष्ट्यपूर्ण केले की दोन वर्षे त्या अंकाला स्पर्धेत पारितोषिके मिळाली. मुंबई मराठी साहित्य संघाच्या ' साहित्य ' या षण्मासिकाचेही त्यांनी गौरवी संपादन केले. दुर्दैवाची गोष्ट अशी की विशिष्ट वाङ्मयीन दर्जा असलेली मासिके आपल्याकडे पैशाभावी चालू शकत नाहीत आणि त्यांच्या खर्चाचा भार उचलणारी प्रतिष्ठाने येथे अस्तित्वात नाहीत !

ठोमरे यांनी साहित्यिक होण्याच्या ईर्षेने प्रारंभीच्या काळात ललित लेखन केले असले, तरी त्यांची ती ईर्ष्या पुढे टिकली नाही. कदाचित साहित्य–संपादनात लक्ष गुंतल्यामुळे त्यांना लेखनाला पुरेसा वेळ मिळाला नसावा. त्याहीपेक्षा, मला वाटते, त्यांना आपल्यातल्या एका वेगळ्या सामर्थ्याचे दर्शन झाले असावे. आपल्याला उत्तम साहित्याची जाण आहे हे त्यांच्या लक्षात आले असावे. ती जाण

संपादनात व साहित्यिकांना दाद देण्यात उपकारक ठरते. परमेश्वराने एखाद्याला जसे साहित्यसर्जनाचे गुप्त इंद्रिय दिलेले असते, तसे काहीजणांना साहित्यातले उत्तम काय ते समजण्याचे इंद्रिय दिलेले असते. ठोमरे यांच्यापाशी ही सिद्धी आहे. इंग्रजी ग्रंथ असोत, मराठी ग्रंथ असोत किंवा एखाद्या नवीन लेखकाचे हस्तलिखित असो, ते उत्तम असतील तर ठोमरे वाचता वाचता बेहोष होतात. त्यांची ती बेहोषी दीर्घकाळ टिकते. इतकेच नव्हे, तर बऱ्याच वर्षांनीसुद्धा केवळ आठवणींच्या जोरावर ते पुनश्च त्या बेहोषीत अवतरू शकतात. मी १९६२–६३ च्या सुमारास 'सारे प्रवासी घडीचे' हे पुस्तक लिहीत होतो. त्यात खऱ्या आणि काल्पनिक अशा लहानपणीच्या आठवणी होत्या. त्यातला काही भाग चित्रकार दलाल यांच्या 'दीपावली' मासिकात क्रमशः प्रसिद्ध होत होता. तो भाग वाचून ठोमरे एकदम वेगळ्या वातावरणात गेले. त्यासंबंधी बोलण्यासाठी ते मुद्दाम एकदा माझ्या ऑफिसमध्ये आले. अतिशय बेहोषीत होते. येताना त्यांनी आपल्या घरच्या ग्रंथसंग्रहालयातून बेव्हर्ली निकल्सची दोन पुस्तके आणली होती. ती त्यांनी मला भेट दिली. त्यातल्या एका पुस्तकाचे नाव 'ट्वेण्टी–फाय'! ते पुस्तक म्हणजे निकल्सने आत्मचरित्र आहे. प्रस्तावनेची पहिलीच ओळ आहे– 'Twenty–five seems to me the latest age at which anybody should write an autobiography!' त्यानंतर जवळ जवळ दीड–दोन तास ठोमरे माझ्याशी त्या पुस्तकावर सद्‍गदित होऊन बोलत होते. आणि बोलणे असे की ते ऐकून कुणालाही वाटावे की १९२५–२६ च्या काळात उमाकांत ठोमरे आणि बेव्हर्ली निकल्स हे लंडनमध्ये एकाच खोलीत राहात होते!... एखाद्या ग्रंथावरचे ठोमरे यांचे निरूपण उत्कट असते. ऐकता ऐकता ऐकणाराही झपाटल्यासारखा होतो.

त्यांचा हा गुण त्यांना वाङ्‍मयीन संपादनात उपकारक ठरला. ते 'वीणा' मासिकाचे संपादक होते तेव्हाचा त्यांचा काळ सर्वाधिक आनंदाचा होता. जसा त्यांचा तसाच आमच्यासारख्या त्यांच्या मित्रांचाही! त्या काळात ठोमरे धुंदीत जगत होते. त्या काळात एकदम ठोंबरेंचा फोन यायचा. गळा दाटून आल्यासारखा आवाज. मग लगेच लक्षात यायचे की 'वीणा'कडे कुणाचे तरी चांगले साहित्य आलेले आहे. मग ठोमरेंचे गहिवर सुरू– 'दळवी, काय सांगू तुम्हाला? मी पूर्वजन्मीचं फार मोठं पुण्य गाठीला बांधलं आहे. म्हणून या जन्मी हे सुख माझ्या पदरात पडतं आहे!' कारण? थोड्याच वेळापूर्वी कुसुमाग्रजांचा एखादा उत्कृष्ट लेख आलेला असतो. मग फोनवरच त्या लेखातील काही भागाचे वाचन आणि रसग्रहण! शिवाय सारे सांगण्याचा थाट असा की तात्यासाहेबांच्या घराबाहेर मोठमोठे संपादक त्या लेखासाठी दबा धरून बसले असताना तात्यासाहेबांनी वीणावरील प्रेमापोटी गुप्त मार्गाने सांडणीस्वार पाठवून तो लेख 'वीणा'कडे पाठविला. तात्यासाहेबांनी आपल्या 'विरामचिन्हे' या ललित लेखांच्या पुस्तकात प्रस्तावने-

मध्ये ठोमरेंचा विशेष उल्लेख केला आहे. त्या लेखांना चालना देण्याचे काम ठोमरे यांनी केले म्हणून !

'वीणा'चा दिवाळी अंक म्हणजे ठोमरेंचा मोठा हंगामच ! त्या हंगामात ते एकदम एखाद्या दिवशी माझ्या ऑफिसात यायचे. गडबडीचा आविर्भाव असायचा. जणू हेलिकॉप्टर बाजूला उभे केले आहे आणि एक अत्यंत महत्त्वाची गोष्ट सांगायला आलो आहे– 'काल पीएल्चा फोन आला होता...अरे उमाकांत उद्या काय करतो आहेस ? ये, संध्याकाळी ये ! तुझ्यासाठी दिवाळीला म्हणून चार चकल्या तळून ठेवल्या आहेत. घेऊन जा !' तेवढ्याने त्यांचा चेहरा फुललेला असायचा. पु. ल. देशपांडे यांनी 'वीणा'साठी मुद्दाम लेखन केले आणि ते नेण्यासाठी आपल्याला बोलावले या सुखात ते कितीतरी काळ असायचे ! या असल्या गोष्टींना आता खूप वर्षे झाली. पण जरा विषय निघाला की ठोमरे सगळ्या आठवणी काल–परवा घडल्याप्रमाणे आजही सांगतात. पुलंनी ज्या थोड्या विनोदी कविता लिहिल्या आहेत, त्या फक्त 'वीणा'मध्येच प्रसिद्ध झाल्या आहेत ! याचा ठोमरे यांना पराकोटीचा अभिमान ! 'पु. ल. : एक साठवण' हे पुस्तक तयार करताना त्यात पुलंच्या काही कविता घ्याव्यात असे ठरले. 'वीणा'चे जुने बांधलेले अंक पाहाण्यासाठी मी त्यांच्या घरी गेलो. तेवढ्याने ठोमरे इतके भारावून गेले की बघता बघता पंचवीस वर्षांपूर्वीचा पुलंशी संबंधित काळ त्यांनी माझ्या-समोर उभा केला... माझ्या डोळ्यांदेखत ते पुलंच्या घरी गेले. त्यांनी त्या कविता घेतल्या. पुलंशी थट्टाविनोद केला. इतकेच नव्हे, तर मोबदल्यावरून सुनीताबाई-शीही त्यांनी विनोदी गप्पा केल्या !

पुलंच्या साठीच्या निमित्ताने मी 'लोकसत्ता'मध्ये एक लेख लिहिला होता त्यात माझ्या हातून गफलतीने उमाकांत ठोमरेंच्या संदर्भात एक चुकीचे वाक्य लिहिले गेले. मला वाटते, मला असे लिहायचे होते की ठोमरे हे पुलंच्या बाबतीत इतके उत्साहाने, उमाळ्याने बोलत असतात की एखाद्या नवख्या इसमाला वाटेल, ठोमरेंनीच पुलंना साहित्यक्षेत्रात पुढे आणले. यात ठोमरेंची पुलंबद्दलची आत्मी-यताच मला अभिप्रेत होती. पण लेखात मी चुकीची शब्दयोजना केली. ती त्यावेळी माझ्याही नीटशी लक्षात आली नाही. 'पुलंचे नाव निघताच जवळ जवळ मीच त्यांना पुढे आणले असे न म्हणताही म्हणणारे आणि गहिवरणारे ठोमरे...' असे मी लिहिले. ते वाचून ठोमरे अतिशय अस्वस्थ झाले. त्यांनी मला एक पत्र लिहून आपले दुःख व्यक्त केले. या गोष्टीला आता तसे महत्त्व नाही. त्यावेळीही नव्हते काहीसा चुकीचा अर्थ व्यक्त करणारी विधाने नजरचुकीने लिहिली जातात. पण त्या पत्रात ठोमरे यांनी लेखक–संपादक यांच्याबद्दल जे लिहिले होते ते कळावे म्हणून त्या पत्रातला थोडा भाग येथे द्यावासा वाटतो.

' (तुमच्या विधानाचा) अर्थ ते पुनः पुन्हा वाचूनही मला अद्याप नीटसा ध्यानी येत नाही. काही एका वाजवी उमाळयाने लिहिलेल्या माझ्या त्या ('ललित' मध्ये प्रसिद्ध झालेल्या) टिपणवजा खाजगी पत्रात मी दूरान्वयानेही पी. एल्‌ला आपण पुढे आणले असे सूचित केलेले नाही. परंतु तसा त्यातून काही अर्थ निघत असेल तर तो माझा कर्मभोगच म्हटला पाहिजे. या संदर्भात माझी भूमिका इतकीच— पीएलचे मोठेपण त्याच्या पहिल्यावहिल्या लेखनातच मला जाणवावे हे माझे भागधेय. पुढे माझ्यासारख्या साधनहीन साहित्यप्रेमी मित्राच्या पाठीशी ' ठोमरे आपलाच आहे आणि त्याचे ' वीणा ' आपलेच आहे ' या निखळ भावनेने त्याच्या-सारख्या थोराने मोबदल्याचा हिशोब न मांडता सातत्याने उभे राहावे हेही माझे भाग्यच ! मी संपादक आहे याहूनही मी एक छोटा का होईना लेखक आहे याचा मला अधिक अभिमान आहे. लेखक हा संपादकाहून थोर असतो हीच माझी गेल्या दोन–अडीच तपांतली धारणा आहे. संपादकीय जाण असलेला माणूस चांगल्या लेखकाच्या शोधात असतो आणि चांगला लेखक चांगल्या नियतकालिकाच्या शोधात असतो. त्यांची कुंडली यथाकाल जमून जाते. ते एकमेकांना आनंद देतात. यात कोणी कोणावर कसलेही उपकार करीत नाही. मी तसे कधीही मानले नाही.

' मधु मंगेश कर्णिक यांच्या ' तोरण 'च्या प्रकाशन समारंभात बोलताना मी अशा अर्थाचे विधान केल्याचे स्मरते की जेव्हा एखादा लेखक मोठा होतो तेव्हा तो स्वतः तर मोठा होतोच, परंतु ज्या नियतकालिकासाठी तो सातत्याने लेखन करीत असतो त्यालाही आपल्या जोडीने मोठे करून सोडतो. लेखक–संपादक संबंधातील माझी भूमिका ही इतकी स्वच्छ आहे. श्रेयासाठी पदर पसरू नये, कृतज्ञता मात्र हातचे काही राखून न ठेवता व्यक्त करावी हे मी निष्ठेने सांभाळीत आलो आहे.'

एवढया एका पत्रामुळे ठोमरेंची अस्वस्थता सार्थकी लागली. एरव्ही ठोमरेंची अस्वस्थता हा आम्हा मित्रांमध्ये थट्टेचा विषय असतो. ते अधूनमधून वेगवेगळया कारणाने अस्वस्थ होत असले तरी प्रसन्नता हा त्यांचा स्थायीभाव आहे.

आणि त्या प्रसन्नतेत भर घालणाऱ्या त्यांच्या पत्नी सुधाताई ! या गांधीवादी कर्मयोगी पित्याच्या कन्या. ठोमरेंशी संसार हा त्यांचा एक कर्मयोगच ! ठोमरे यांची अर्धवट पगाराची नोकरी, ' वीणा ' मासिकाचा लौकिक देणारा पण आंत-बट्ट्याचा व्यवहार, त्यामुळे कायमची आर्थिक हलाखी, ग्रंथांची सततची खरेदी—या सर्व उलाढालीतून शेवटी सौ. सुधाताईंच्या हाती पैशाच्या रूपाने काय आले असेल, काय येत असेल याचे आमच्यासारख्यांना नेहमीच नवल वाटते. पण त्या कधीही कष्टी दिसल्या नाहीत. अनेकदा ठोमरेंच्या साहित्यप्रेमाची त्यांनी विनोदासाठी चेष्टा केली तरी त्या नेहमीच ठोमरेंच्या ' श्रीमंती 'त भरच घालीत आल्या आहेत !

□

# प्रतिभेचं लेणं घेऊन आलेला अभिजात कवी

प्र. श्री. नेरूरकर

इ. स. १९४९–५०–५१ हा तो काळ. भारत देश स्वतंत्र होऊन अवघी दोन–तीन–चार वर्षे होत आली होती. मुंबई–नागपूर व नागपूर–मुंबई अशी भ्रमंती करून मी कोकणातच माझ्या गावी नेरूरला (आताचा सिंधुदुर्ग जिल्हा) जाण्याचा निर्णय घेतला. गावी मी माझ्या घरी आलो. पदवी परीक्षेपर्यंत जाऊनही मी पदवी घेतलेली नव्हती. वर्ष–दीड वर्ष मी घरी नुसता वाचनात गुंतून राहिलो. खेडोपाडी भटकलो. नेरूरपासून अडीच-तीन मैलांवर कुडाळ हे तालुक्याचं शहर. त्यावेळच्या सावंतवाडी संस्थानातील 'कुडाळ हायस्कूल' उत्तम शैक्षणिक परंपरेसाठी नावाजलेलं होतं. मी त्याच हायस्कूलमधून १९४० साली मॅट्रिक झालो होतो. आता हायस्कूल देशाच्या फाळणीनंतर कराचीतून कोकणात आलेल्या कोकणी माणसांनी स्थापन केलेल्या एका शिक्षणसंस्थेकडे (कराची महाराष्ट्रीय शिक्षण प्रसारक मंडळ) सुपूर्त करण्यात आलं होतं. शिक्षणमहर्षी गुरुवर्य द. अ. अणावणकर व प्राचार्य वि. आ. आंगचेकर हायस्कूलचे संचालक होते.

एके दिवशी कुडाळ हायस्कूलच्या प्राचार्यांचा मला निरोप आला. मी गेलो. ते म्हणाले, " तुम्ही आमच्या प्रशालेत वरील वर्गांना इंग्रजी, मराठी हे भाषा-विषय शिकवाल का ?' मी तत्पूर्वी साडेतीन वर्षे मुंबईत दादरवरील छबिलदास हायस्कूलमध्ये भाषाविषय शिकवीत होतो. माझी गणना एक चांगला शिक्षक म्हणून होत होती. मी मान्यता दिली आणि कुडाळ हायस्कूलमध्ये– एके काळी ज्या प्रशालेत मी विद्यार्थी होतो त्याच वास्तूत–मी शिक्षक म्हणून रुजू झालो. मला वाटते १९५० सालच्या जून महिन्यात. रोज तीन मैल चालत येणं नेरूरहून व परत चालत घरी जाणं शाळा सुटल्यावर, असं काही दिवस केल्यावर माझ्या दोन शिक्षक सहकाऱ्यां-बरोबर मी शाळेच्या आवारातच विद्यार्थी–शिक्षक यांच्यासाठी बांधण्यात आलेल्या वसतिगृहात राहू लागलो. त्या दिवशी रात्री पावसातून माझ्या शिक्षक साथीदारांनी

मला त्यांच्याबरोबर आपल्या खाणावळीत जेवायला आणलं. कुडाळ शहरातील बाजारपेठेत. मारुतीच्या देवळाजवळ. एका जुन्यापुराण्या घरात. तिथे मी प्रथम रात्रीच्या वेळी अर्धकाळोखी, अर्धप्रकाशी घराच्या पडवीत कोकणी रॉकेल तेलाच्या दिव्यासमोर अर्ध्या–अधिक उघडयावंब अंगाने पाठीला पोक काढून व देहाची विचित्र खोंगी करून व जुन्या-नव्या कवींच्या कवितांची पुस्तके समोर ठेवून एका शाळकरी वहीत पेनाने लिहीत बसलेल्या व पूर्णपणे स्वतःतच हरवून गेलेल्या चिंतामणी ऊर्फ कुडाळकरांच्या तत्कालीन प्रचलित शब्दात म्हणायचं म्हणजे सी. टी. खानोलकरला पाहिलं.

कुडाळ हायस्कूलमध्ये शिक्षक म्हणून मी काम करू लागलो, तेव्हापासून शिक्षकांच्या खोलीत चहापाण्याच्या सुटीत किंवा फावल्या वेळात शिक्षकांच्या बोलण्यात सी. टी. हटकून यायचा. शिक्षकांचं म्हणणं एवढंच असायचं. सी. टी. सारखा बुद्धिमान विद्यार्थी .. त्याने मॅट्रिकची परीक्षा एकदाची पास होऊन घ्यायला हवं होतं. मग कॉलेजात जाऊन तो मराठी प्राध्यापकांचा प्राध्यापक झाला असता, अशी त्याची मराठी भाषा होती. निबंध काय लिहायचा ! कविता काय करायचा ! नेहमी आपल्याच तंद्रीत असायचा. तेव्हापासूनच सी. टी. बद्दल मला कुतूहल निर्माण झालं होतं. त्याची आई खाणावळ चालवत होती. तो खाणावळीत आईला मदत करीत होता. माझ्याबद्दल मात्र फारसं त्यानं ऐकलेलं नव्हतं पण हे नवे शिक्षक मराठी चांगलं शिकवतात आणि त्यांनी दोन-तीन वर्षांपूर्वी ' मौज ' साप्ताहिका-तून ' ललित निबंध ' व ' हंस ', ' वसंत ', ' धनुर्धारी ', ' प्रदीप ' व अन्य नियत-कालिकांतून कथा, समीक्षा व मुलाखती लिहिल्याचं त्याच्या कानावर गेलं होतं. त्याचा एक दोस्त व वर्गमित्र नेरूरचाच आमच्या कुटुंबाला जाणणारा होता.

चि. त्र्यं. चं. त्या पावसाळी रात्री कुडाळच्या त्या घरातील पडवीत जे दर्शन झालं... ते त्याचं ध्यान त्यानंतर अगदी आत्ता मी लिहितोय या क्षणापर्यंत माझ्या स्मृतिपटावरून कधीच पुसलं गेलं नाही किंवा ते धूसरही झालेलं नाही. लिओनार्डो दी व्हिन्सीच्या ' मोनालिसा 'सारखं ते चिरंतन माझ्या अंतर्यामात वस्तीला आलंय. त्या रात्री खरं म्हणजे चि. त्र्यं. शी संवाद करण्याची उमेद बाळगून मी खाणावळीत पाऊल टाकलं होतं. मी त्याच्याजवळ जाऊन बसलो. त्याच्या पुढ्यातील कवितांची पुस्तकं चाळली. कविवर्य भास्करराव तांबे, बा. भ. बोरकर, शरच्चंद्र मुक्तिबोध– मला वाटते, मर्ढेकरही असावेत .. यांचे संग्रह मी चाळले. पण चि. त्र्यं. ऊर्फ सी. टी. अबोलच माझ्या पुढ्यात बसला होता. त्याच्या तांबूस चिंचोळ्या चेहऱ्यावर कोणतेच परस्पर–संवादाचे भाव मला दिसत नव्हते. मी टाळीसाठी माझा हात पुढे केला होता, पण दुसरा हात टाळी देतच नव्हता. चि. त्र्यं. च्या डोळ्यावर जाडजूड भिंगांचा चष्मा होता. किंचित बुजल्यासारखा

किंवा घुश्शात आल्यासारखा सी. टीं. माझ्याकडे आपली किडकिडी मान अधिकच खाली वाकवून तिरकस नजरेने चष्म्यातून पाहात होता. चष्म्याच्या भिंगापलीकडे त्याच्या डोळ्यांची बुबुळे मला वटवटीत दिसत होती. अशा दोन-चार आमच्या बैठका (माझ्याकडूनच अर्थात) कवीला आळवण्या-ढळवण्यात गेल्यानंतर एका रात्रीला चिं. त्र्यं. ने आपण होऊनच त्याच्या कवितांची वही माझ्या हातात दिली. मी अगदी मोकळेपणाने त्याच्या कवितांबद्दल माझं मत त्याला सांगावं असं तो मला म्हणाला. त्याची आई त्याला ' चिंतू' म्हणून हाक मारायची. मी कधीतरी त्याला ' चिंतामणी ' म्हणून संबोधू लागलो. नंतर नंतर तर मी त्याला ' मणि ' म्हणूनही गंमतीने हाक मारायचो. कवी फक्त मी ' मणि ' म्हटलेलं सहन करायचा. दुसऱ्या कुणीही त्या नावाने हाक मारलेली तो चालू देत नसे. कवी आणि मी हळू-हळू खूप जवळ आलो. एकजीव झालो.

कवितेचं मला वावडं नव्हतं. बालपणी पाचव्या-सहाव्या वर्षी नेरूरच्या आमच्या घरात पहाटे मला जाग यायची. घरात माझी भावंडे व इतर माणसे गाढ झोपलेली असायची. माझी आजी (वडिलांची आई) मात्र भल्या पहाटे उठायची. रॉकेलचं डबडं पेटवायची. अंगाभोवती गरम शाल गुंडाळायची. कान, तोंड व मस्तक त्याच शालीने झाकून घ्यायची. पुढ्यात पितळी खलबत्ता घेऊन पान कुटता कुटता ओव्या, अभंग व भूपाळ्या विलक्षण गोड मधुर गळ्याने गायची. माझ्या गोधडीच्या बिछान्यात मी जागा व्हायचो नि किलकिल्या डोळ्यांनी तोंडावरचं पांघरूण बाजूला सारीत आजीच्या गोऱ्यागोमटच्या वयोवृद्ध चेहऱ्याकडे बघायचो. कानांनी तिने गायिलेली कविता ऐकायचो... " असा धरी छंद । जाई तुटोनिया भवबंध ", " धाव पाव सावळे विठाई का मनी धरिली अढी ", " हरिभजनाविण काळ घालवू नको रे...", " घनश्याम सुंदरा श्रीधरा .." अशी ती पदे त्या बाल-वयातच माझ्या कानातून मनात गुंजत राहिली. त्या क्षणांपासूनच मला कवितेचा सूर, तिची लय, तिचा छंद व तिचा नाद व्यापून राहिला. पदवी परीक्षेला मी इंग्रजी विषय घेतला म्हणूनच नव्हे तर तत्पूर्वी व त्यानंतर इंग्रजी कविता अगदी थेट चॉसरपासून इलियटपर्यंत मी एका धुंदीत वाचली होती, अभ्यासिली होती. स्वातंत्र्य संग्रामाच्या काळात हिंदी भाषेने व तिच्यातील साहित्याने मी झपाटून गेलो होतो. निराला, मैथिलीशरण गुप्ता (विशेषतः त्यांचं ' साकेत ') महादेवी वर्मा, संत सूरदास, विद्यापती, कबीर, संत तुलसीदास, संत मीराबाई यांच्या कवितेनं मला वेड लावलं होतं. मराठी कविता तर बालपणापासूनच माझी आई आम्हा मुलांना परशुरामतात्या गोडबोल्यांचं ' नवनीत ' स्वतः गाऊन व छंद वृत्तात गाऊन ऐकवायची तेव्हापासूनच माझ्या अंतर्यामात वसतीला आली होती. नंतर मग बालावल गावच्या इंग्रजी शाळेत शिकत असतानाच इंग्रजी तिसरी-चौथीत,

गोविंदाग्रज, केशवसुत, ना. वा. टिळक, विनायक, माधव ज्यूलियन, कविवर्य यशवंत व गिरीश, द. आ. कारे यांच्या कवितांचे संग्रह माझ्या हातों आले होते. शिवाय शाळेतच आमच्या मराठी भाषेच्या अभ्यासक्रमात 'महाराष्ट्र रसवंती' चे भाग आम्ही वाचत होतो. शिकत होतो. त्यातून कविता–गायनही करीत होतो. कधीतरी मग शाळेतच माझ्या वर्गातील एका कविमित्रामुळे मी भास्करराव तांब्यांची कविता त्याच्या मुखातून ऐकली व आम्ही दोघांनी ती चालीवर गायिली. एकमेकांसाठी .. आणि बा. भ. बोरकरांचा त्याच काळात आम्हाला शोध लागला .. 'मोडक्या पुलाकडून तार जाय बंदरा...' या ओळींनी मी व माझा वर्ग कविमित्र (प्रभाकर लाड) आम्ही धुंदफुंद होत गेलो. एवढेच नव्हे तर इंग्रजी तिसरी–चौथीत असतानाच (बारा-तेराव्या वर्षी) मी एक कवितेचा आल्बम, माझा चुलतभाऊ रमाकांत, बेळगावला सेंट पॉल शाळेत शिकायचा, तर त्याच्या शाळेच्या जाडजूड प्रगति–पुस्तकाची पाने वापरून केला. आमच्या घरी व माझ्या आजोळलाही त्या काळची सर्व मराठी मासिके, साप्ताहिके, (केसरी, मनोरंजन, प्रतिभा, सुधा, विश्ववाणी) यायची. त्यातील कविता कापून मी त्या वहीत चिकटवून ठेवायचो. आजही तो कविता आल्बम माझ्याजवळ शाबूत आहे. त्यातील गोविंद झोकरकरांच्या कविता मला आजही भारून टाकतात. बालकवी, गडकरी, बी., ना. वा. टिळक यांच्या-पासून तो अनंत काणेकर व हरींद्रनाथ चट्टोपाध्याय यांच्या हिंदी कवितेपर्यंत मी त्या काळात टिपलेल्या व जपून चिकटविलेल्या कविता त्या आल्बमात आहेत.

चितामणी खानोलकराची वही मी एका रात्री एकांतात कुडाळ मुक्कामीच माझ्या वसतिगृहात बसून वाचली. कवितांनी वही भरून गेली होती. वेगवेगळ्या प्रकृतीच्या, वेगवेगळ्या आकारांतील व छंदांतील त्या कविता होत्या. नवकविता मराठी साहित्यात प्रस्थापित झाली होती. कवी कटाक्षाने 'सत्यकथा' आणि मराठीतील दर्जेदार साहित्य देणारी मासिके कुठून ना कुठून मिळवून वाचीत होता. आज मी मागे वळून पाहतो व वहीतील कविता वाचण्यात रमलो ते कुडाळातील क्षण आठवतो तेव्हा मला आता जाणवतं (तेव्हा त्या तेवढ्या काळापुरतं नक्कीच जाणवलं होतं) की भविष्यकाळातील चितामणीची एक स्वयंभू कवी म्हणून होऊ घातलेल्या वाटचालीतील पहिली पावले त्या कवितांतून उमटलेली होती. ती बरीचशी पुसट होती हे खरं. पण हा कवी त्या काळात अगदीच कवितेच्या पाळण्या-तलं कुक्कुलं बाळ राहिला नव्हता. पाळण्यातले त्याचे पाय केव्हाच पाळण्याबाहेर पडले होते व त्यांना त्यांची स्वतःची अशी वाट सापडली होती. पण मला प्रकर्षाने दुसरं जे कवीचं न्यून जाणवत होतं ते म्हणजे या वाटेवरून चालताना कवी कुणाचा तरी अन्य कवीचा आधार घेत होता. त्या कवीच्या कवितेची काठी वापरीत होता. स्वतःला अजून तो पूर्णपणे झोकून फेकून देत नव्हता. मोकळा करीत नव्हता. कुठे-

तरी काहीतरी त्याची कुचंबणा होत होती. पदलालित्य, नादमाधुर्य, तरल, नाजूक, रंगगंध प्रतिमांनी थरथरणारी शब्दकळा, दुःखवेदनेचं सूक्ष्मतम पण अनाकलनीय गूढ, अमूर्तत्व, अपार्थिव सौंदर्यानुभूती, आणि स्थळकाळबद्ध, निकटवर्ती निसर्ग-चित्रण–आणि तरीही रसिक अंतःकरणातील स्पंदने चाळवीत त्याला अस्वस्थ करून टाकणारं, सरपटणारं कोणतंतरी कवितानिर्मितीचं अभिजात रसायन मला चिंतामणीच्या त्या वहीतील कवितांनी साहित्यिक प्रगल्भता व अप्रगल्भता या सीमारेषांवर प्रत्ययाला आणून दिलं. कवी खाणावळीत दरदिवशी अतीव आतुरतेने माझी वाट पहायचा. मी खाणावळीत पाऊल टाकलं की पहिला प्रश्न तो मला आवेगाने करायचा, "काय वाचलीत माझी कविता ? काय म्हणणं तुमचं ?" मी मुद्दामच अगदी हेतुपुरस्सर चिंतामणीला ताटकळत ठेवायचो. एक तर मला निक्षून वाटायचं, कवीचं हे प्रकरण बरंच नाजूक आहे. स्फोटक पण आहे. मला जे त्याच्या कवितांतून जाणवत होतं व जे त्याच्या एकूण कवितेबद्दल वाटत होतं, ते नेमक्या शब्दात आणि कवीच्या संवेदनशीलतेला सहज भिडेल, बुद्धीला पचेल व भाव-मयतेला रुचेल असं कसं सांगता येईल, याचा मी जरा जास्तच व खूप सांभाळून विचार करीत होतो. नंतर नंतर कवी संध्याकाळचा केवळ मला भेटण्यासाठी शाळेत यायला लागला. आम्ही दोघेही मग कवितेच्या अनावर नादात वाट फुटेल व पाय नेतील त्या दिशादिशांना कवितेवरच बोलत चालत धुंद होत वेड्यासारखे भटकत असू. कुडाळ शहरातील रावळदेवाचं ठिकाण, नदीकाठची भंगसाळ (भग्न शाळा), पिंगुळीचा तिठा, कुडाळ हायस्कूलभोवतालचा परिसर, तर कधी मारुतीचं किंवा कुडाळेश्वराचं देऊळ अशी आमची भ्रमंती व्हायची.

"चिंतामणी, तू स्वतःची अशी कविता कधी लिहिणार आहेस ?" एका भ्रमंतीत मीच कवीला प्रश्न विचारला. मला थोडं त्याला डिवचावंसं व चिडवावंसं वाटत होतं.

"म्हणजे ?" कवी एकदम माझ्यावर उखडून मला म्हणाला.

"मी तुझी कवितेची वही पुनःपुन्हा वाचली. मला तुझी कविता खूप आवडली. एक म्हणजे तुझी कविता स्वयंभू आहे. तुझा स्वतःचा असा तिला जातिवंत कवीचा स्पर्श झाला आहे आणि तरीही तुझी कविता मला तुझी वाटत नाही...मला ती अमुक तमुक या त्या मराठीतील कवीच्या कवितेचाच प्रतिध्वनी व प्रतिकृती का वाटते ?...तुझी स्वतंत्र कविता कुठे आहे ? ..."

माझं म्हणणं कवीच्या लक्षात नीट आणून देण्यासाठी मी त्याच्या कवितांच्या ओळीतील व अन्य कवींच्या कवितांच्या ओळींतील शब्दकळेचं साम्य व सही सही अनुकरण त्याला सांगत गेलो. कवी आतल्याआत धुसफुसत बराच रागावला. नंतर

शांत होत गेला. तो अंतर्मुख झालेलाही मला जाणवला. कवी चिंतामणीचं किंवा चिंतूचं किंवा सी. टी. खा. चं हे पुष्कळदा असंच असायचं. त्याला सांभाळून घेत घेतच मग त्याला उखडायला, रागवायला, मी अवधी देत होतो. या मी प्रथमच वाचलेल्या कवीच्या कवितांतून त्यांचा मनस्वी वेगळेपणा मला मोह घालीत होता. तो होता कवीच्या त्या सर्व कवितांमधून अभिव्यक्त होणाऱ्या आत्मानुभूतीमध्ये सामावलेला. त्या कवितांमध्ये दर्द, हुस्न व नजाकत भरलेली एखादी पंक्ती किंवा एखादं दोन ओळींचं कडवं किंवा शब्दरचना नि प्रतिमानिर्मिती कवीच्या एकूण कवितानिर्मितीच्या बाह्य अनुकरणशीलतेमध्ये त्याची स्वतःची व अपूर्व वाटायची. कधी कवी उदास, खिन्न आणि विफलग्रस्त झालेला असायचा तर कधी आत्मप्रसन्न, आत्मतृप्त व आत्मसिद्ध झालेला जाणवायचा. एखादी झाडाची फांदी, फांदीवरचं फूल, एखाद्या वेलीवरची रंगसुंदर नाजूक तरळ पर्णराजी, आकाशाचा पसारा आणि त्याचा निळा रंग, झुळूझुळू वाहणारा झरा आणि मधुगुंजन करणारा रानपक्षी, एखादं कोणतंतरी स्त्रीपुरुष प्रेमरहस्याचं फसवं, जादूमयी प्रेयस श्रेयस, आणि कधी अगदीच टोकाला जाऊन कवीने ऐहिक वास्तवाला दिलेला गूढगडद अध्यात्मवादी नकार . हे सगळं घेऊन चिंतामणीची ती त्या वहीतील कविता सजीव साकार झाली होती. गंमत म्हणजे नवकवितेच्या प्रवाहापासून ती पूर्णपणे अलिप्त होती. ती सरळ, सुबोध, सरस व स्पंदनक्षम होती. दुर्बोधता, विक्षिप्तपणा, तिरकसपणा तीत नव्हता.

कुडाळ शहर झपाट्याने बदलत होतं. असेच काही महिने गेल्यावर चिंतूची आई आम्हाला म्हणाली, " मास्तरानु, आम्ही आमची खाणावळ नव्या जागेत नेत आहोत." चिंतूने मग आम्हाला सगळी हकीकत सांगितली. कुडाळ हे पूर्वीही तालुक्याचं शहर होतं. पण आता तालुक्याच्या कामाचा व्याप वाढला होता. कोर्टकचेऱ्यांचं, महसूल खात्याचं आणि अन्य सरकारी कचेऱ्यांचं जाळं कुडाळ गावात वाढत जात होतं. कराचीहून येऊन कुडाळ गावात स्थायिक झालेल्या एका धनिक सद्गृहस्थांनी मारुतीच्या देवळासमोर कुडाळ शहरात जाणाऱ्या रस्त्याच्या कडेला आधुनिक पद्धतीची एका माडीची नवी अद्ययावत इमारत बांधली. ती इमारत आईने खाणावळीसाठी भाड्याने घेतली. खाणावळीचं ' गेस्ट हाऊस 'मध्ये रूपांतर झालं. रस्त्याच्या बाजूने तीन-चार पायऱ्या चढून ' गेस्ट हाऊस 'मध्ये जावं लागे. इमारतीचा खालचा दर्शनी भाग लांबरुंद व सखलउंच असा होता. आत आणखी एक ऐसपैस खोली किंवा घळई होती. आणि पलीकडे मागील बाजूला स्वयंपाकघर आणि परसू, विहीर, न्हाणीघर होतं. पायऱ्या चढून वर आल्यावर उजव्या अंगाला दर्शनी दालनाच्या कोपऱ्यात मालकांची बसायची खुर्ची व लाकडी टेबल होतं. तिथूनच उजवीकडे माडीवर जाणारा लाकडी जिना होता. माडी बरीच लांब, काहीशी

अरुंद व संपूर्णपणें मोकळी होती. तिला लाकडी कठडा बांधलेला होता. जिन्याच्या उजव्या बाजूला एक स्वतंत्र व बरीच मोठी खोली होती. व त्या खोलीला दालने होती. जिन्याच्या डाव्या बाजूला आतून दोन मोठ्या लांबरुंद खोल्या भिंतीने विभागलेल्या होत्या. एका खोलीतून दुसऱ्या खोलीत जाण्यासाठी मधोमध लाकडी दरवाजा होता. आतील बाजूला उजव्या हाताला भिंतीत पुरुषभर उंचीची चौकोनी खिडकी होती. तिला लोखंडी गज होते. दोन्ही खोल्यांत पॅसेंजर लोकांसाठी किर्लोस्करी लोखंडी खाटा टाकलेल्या होत्या. त्यावर गाद्या व चादरी पसरलेल्या होत्या. हळूहळू गिऱ्हाइकांची संख्या वाढत चालली व अधूनमधून तरुण जोडपी येऊ लागली म्हणून आतल्या खोलीत मधोमध लाकडी पातळ फळ्या किंवा पार्टिशन टाकून कामचलाऊ खोल्या तयार करण्यात आल्या. चितू खाली आपल्या खुर्चीत गल्ल्यावर नसला तर तो हटकून माडीवर उजव्या बाजूच्या आपल्या एकमेव खोलीत सापडायचा. तो वाचीत किंवा लिहीत बसलेला असायचा. त्याच्या खोलीत त्याच्या पूर्वपरवानगी-शिवाय कुणी प्रवेश केलेला त्याला आवडत नसे. रात्री खाणावळ बंद झाल्यावर खालच्या तळमजल्याचा दर्शनी भाग लाकडी फळ्या जोडून बंद केला जात असे. प्रत्येक फळी वर–खाली जोडलेल्या लाकडी पट्ट्यांमध्ये नीट जुळवून घ्यावी लागे. मग त्या फळ्यांना आतून कडी घातली जाई. या फळ्या सकाळी त्यांच्या जागांतून सरकवून अलगद बाहेर काढणं व पुन्हा रात्री त्या आत नीट बसवून घेणं हे कसबाचं काम असे.

एके दिवशी ' गेस्ट हाऊस 'ला बाहेरून माडीच्या कठड्याला जोडून लांब-लचक पण छान कलापूर्ण असा नामफलक लावण्यात आला. ' वीणा गेस्ट हाऊस.' चिंतामणीने कुडाळातील आपल्या चित्रकार मित्राकडून तो रंगीत फलक तयार करून घेतला होता. त्या चित्रात सरस्वतीच्या हातातील वीणा व वीणेला साथ करणारी वाद्ये चितारलेली होती. मधोमध गेस्ट हाऊसचं नाव देखण्या अक्षरांत लक्षवेधी रंगविलेलं होतं. ' गेस्ट हाऊस ' झाल्यापासून चितूबरोबर माझ्या बैठका माडीवर होऊ लागल्या आणि काही थोडे दिवस गेल्यावर मी कुडाळ हायस्कूलचे वसतिगृह सोडून ' वीणा गेस्ट हाऊस 'मध्येच राहायला आलो. त्याच काळात मुंबईतील माझा एकेकाळचा कामगार विभागातील कम्युनिस्ट मित्र द. कृ. सरमळ-कर कुडाळमध्ये राहायला आला. म्हणजे तसा तो महालकरी कचेरीत ' गोडाऊन कीपर ' म्हणून काम करायचा. कुडाळपासून दूरवर लांबच्या गावांना त्याच्या कामानिमित्त त्याला राहावं लागे. कुडाळात आला की मग ' वीणा गेस्ट हाऊस '-मध्ये त्याचा जेवणा-राहण्याचा कार्यक्रम होत असे. द. कृ. ने एक श्रमिक कामगार व पक्ष कार्यकर्ता म्हणून जीवनातील कडू–गोड व जाचक-शोषक समाजवास्तव जवळून अनुभवलेलं होतं. त्याचं मराठी साहित्याचं ललित व शास्त्रीय वाचन व्यापक,

विपुल व सखोल होतं. मराठी शिक्षण कसंबसं त्याने अपुरंसं केलं होतं. देखणा तरतरीत, उत्साही, वादविवादपटू, समंजस व स्नेहशील असं द. कृ. सरमळकराचं व्यक्तिमत्त्व होतं. प्रकृतीच्या अस्वास्थ्यामुळे पुन्हा तो कोकणात कोचरे या आपल्या जन्मगावी आपल्या आईकडे आला होता. नंतर कुडाळ शहरात कम्युनिस्ट पार्टीची कचेरी त्याने उघडली व कुडाळ येथेच तो राहू लागला. द. कृ. कडे मुंबई-पुण्यातील त्यांचे कार्यकर्ते, लेखक, पत्रकार, राजकीय पुढारी येत असत. साहजिकच 'वीणा गेस्ट हाऊस'मध्ये जेवण व माडीवर मैफिली होत असत. साहित्यापासून राजकारणापर्यंत होणाऱ्या साळढाळ वोलक्या रंगतदार चर्चांमध्ये चिंतामणी रंगून जात असे. 'वीणा गेस्ट हाऊस'मध्ये माडीवरील पहिल्या दर्शनी खोलीत माझी कॉट खिडकीकडे एक कोपऱ्यात अशी होती. इंग्रजी, हिंदी, मराठी साहित्यातील नानाविध जुने-नवे ग्रंथ माझ्या बिछान्यावर व कॉटखाली पडलेले असत. बराच काळ गेला. पण चिंतूने काही मला आपली नव्या लिहिलेल्या कवितांची वही किंवा इतर कोणतेच लेखन दाखवले नव्हते. मीही त्याला विचारले नव्हते. मात्र चिंतामणीवरोवर इंग्रजी, हिंदी, मराठी साहित्यावर माझा रात्रंदिवस संवाद चालू असे. विशेषतः इंग्रजी साहित्यातील अठराव्या-एकोणिसाव्या शतकातील कविता व कवींचं जीवन यावद्दल चिंतामणीला मी प्रत्यक्ष ग्रंथांतून व कवितांतून खूप काही सांगत असे. आंग्लकवी शेले, वायरन, कीट्स यांच्या कवितांचे संग्रह चिंतू मन लावून वाचायचा. डोस्टोयव्हस्कीचे वहुतेक ग्रंथ त्यावेळी माझ्याकडे मुंबईहून आले होते. तत्पूर्वी काही वर्षे अगोदर मुंबईहून निघणाऱ्या 'झारापकर' मासिकात मी डोस्टोयव्हस्कीच्या जीवनसाहित्यावर लेखमाला लिहिली होती. तीत 'ब्रदर्स कारमॉझॉव' या कादंवरीची ओळख मी विस्तारशः मराठी वाचकांना करून दिली होती. स्वातंत्र्यपूर्व काळात, तिचा समन्वय ? भारतीय क्रांतिकारकांशी मी जोडला होता. तशीच एक डोस्टोयव्हस्कीच्या कादंवरी लेखनावरील लेखमाला नागपूरहून डॉ. सुरेन्द्र बारलिंगे संपादन करीत असलेल्या 'इन्किलाब' साप्ताहिकात मी लिहिली होती. त्यावेळचा बंडखोर कवी श्रीकृष्ण पोवळे याच्या 'अग्निपराग' या पहिल्याच काव्यसंग्रहावर मी 'इन्किलाब'मध्ये समीक्षालेख लिहिला होता. माझ्याकडील ते सर्व लिखाण चिंतामणीला मी वाचायला दिलं. आम्ही भारतीय साहित्यावरोवरच जागतिक साहित्याचीही साहित्यधुंद होऊन चर्चा केली. रामानंद सागरची 'और इन्सान मर गया' ही कादंवरी मला आठवतें, चिंतू पुनःपुन्हा वाचायचा. त्याच काळात नंतर 'सत्यकथा' मासिक आणि त्यात क्रमशः प्रसिद्ध होत गेलेल्या 'गारंवीचा वापू' व 'पडघवली' या कादंवऱ्या चिंतूच्या हातात असायच्या.

मी १९५०–५१–५२ ही वर्षे कुडाळात घालवली. त्या वेळचं कुडाळ व 'वीणा गेस्ट हाऊस'मधील आमचं वास्तव्य व कुडाळ परिसरातील चिंतूच्या

मित्रांचं, चहात्यांचं, समवयस्कांचं आणि धंदेवाईकांचं येणं-जाणं, एकत्र जमणं, फिरणं, बोलणं, धुंद होऊन जाणं, रागावणं, रुसणं, प्रेम करणं व कधी प्रेमभंगही होणं याचं चित्रण अवघ्या काही शब्दांत करणं अशक्य आहे. 'वीणा गेस्ट हाऊस'-पासून जवळच बाजारपेठेचा रस्ता संपला की वळणावर कुडाळ गावातील एका जुनाटशा प्रोजेक्टरवर चालणारं 'नागराज' नावाचं चित्रपटगृह होतं. त्यात दररोज चित्रपट लागत आणि चित्रपट घेऊन येणारे चित्रपटवितरक 'वीणा गेस्ट हाऊस' मध्येच मुक्कामाला येत. अदलून-बदलून किंवा फिरतीवर येणारे तरुण अधिकारी किंवा सरकारी कर्मचारी पहिला मुक्काम 'वीणा'तच करीत. मला आठवतं एकदा एका संध्याकाळी एक तरुण अधिकारी कचेरीतून 'वीणा'त आला. माडीवर आमची एका कोपऱ्यात नेहमीप्रमाणें मैफल भरली होती. त्या यौवनाने मुसमुसलेल्या अधिकाऱ्याने चितूला जवळ बोलावलं. माडीच्या दुसऱ्या कोपऱ्यात नेऊन चितूशी तो काहीतरी बोलला. एका क्षणात माडीवरचं शांत वातावरण भंग पावलं. चितू क्रोधाविष्ट झाला. त्याचा पारा व आवाज चढत गेला. त्या अधिकाऱ्याला तो ओरडून सांगत होता, "चालते व्हा... उचला तुमचं सामानसुमान... हे 'वीणा गेस्ट हाऊस' आहे... इथे सरस्वती वास करते. चला... चालते व्हा...' आणि चितूने खाली गड्याला हाक मारून वर बोलावलं. त्या माणसाचं सामान बाहेर काढून त्याला गेस्ट हाऊस सोडायला भाग पाडलं. "अरे काय झालं चितू..." आम्ही सगळेजण चितूचे चाहते त्याच्याजवळ जाऊन विचारीत होतो. मग हळूहळू स्वतःला सावरीत चितू आम्हाला म्हणाला, "अहो... हा इसम मला विचारतो... आपल्या नाकपुड्यांना हात लावून... 'याची काय सोय इथे करता ना तुम्ही?' बदमाश... हरामखोर... काय समजला तो... हे 'वीणा गेस्ट हाऊस' आहे.." कुणीतरी मग धंदेवाईक सुरात चितूला म्हणाले, "अरे बाबा, हा धंदा तू उघडला आहेस ना... गेस्ट हाऊसचा... मग अशी बरी-वाईट गिऱ्हाइकं येणारच... त्यांना तुला असं तोडून नाही चालायचं... धंदा अशाने कसा चालणार?". वरील गडबड ऐकून चिंतामणीची आईदेखील वर आली. "मास्तरानु, सांगा हो चार गोष्टी आमच्या चितूला..." एवढंच म्हणून ती निघून गेली.

मला वाटतं, माझ्या त्या कुडाळमधील 'वीणा गेस्ट हाऊस' मुक्कामात मी व चितूने गावात लागलेला एकही चित्रपट चुकवला नाही. रात्रीच्या दुसऱ्या खेळाला आम्ही जायचो. फालतू कंटाळवाणे चित्रपटही असायचे तसेच 'मिर्झा गालीब', 'दहेज' आणि चांगले मराठी चित्रपटही असायचे. 'दहेज'मधील 'अंबुवाकी डालीपे कुहरे कोयलिया' ही ओळ चितू व मी दररोज गुणगुणायची. त्याच काळात कुडाळात सरकारी इस्पितळासमोरच्या जमिनीत एक मोठे चुडतांच्या झापाचे नाटकाचे थिएटर उभे झाले आणि पावसाळा संपल्यानंतर सात-आठ महिने

सतत महाराष्ट्रातील प्रत्येक नामवंत व सर्वसामान्य नाटक कंपनी त्या थिएटरमध्ये आपली हजेरी लावून गेली. आठवडयातून तीन-चार दिवस त्या नाटयगृहात मराठी जुन्या-नव्या नाटकांचा नाटयोत्सव चालू असायचा. भालचंद्र व सौ. मालती पेंढारकर आपली नाटके घेऊन कुडाळात आलीत ती मुक्कामाला 'वीणा गेस्ट हाऊस' मध्येच उतरली. मोठ-मोठे नामवंत नट, मास्टर दत्ताराम, अभ्यंकर, श्रीकृष्ण व सौ. जोगळेकर जेवायला 'वीणा'मध्ये यायचे. चिंतूने माडीवरील स्वतःची खोली पेंढारकर दांपत्याला राहायला दिली. आम्ही प्रत्येक नाटक—मी व चिंतू, इतर दोस्तमंडळींसह जमले तर नाही तर फक्त दोघेच—पाहत असू. काही नाटके पुनःपुन्हा पाहत असू. 'कृष्णार्जुन युद्ध', 'संन्याशाचा संसार', 'मृच्छकटिक', 'भावबंधन' 'प्रेमसंन्यास', 'सौभद्र', शारदा', 'एकच प्याला' अशी नाटके आम्ही पाहिली. नंतर शांता मोडक आपली नाटक मंडळी घेऊन आल्या. या नाटकातील सर्व कलावंत मंडळींशी बोलायचं, भेटायचं, त्यांच्या मुलाखती घ्यायच्या असं आम्ही ठरवीत असू व जमेल त्यांच्याशी संवाद करीत असू. घरात, खोलीत, माडीवर आम्ही असलो की साहित्यात आणि बाहेर रात्री चित्रपट आणि नाटयगृहातील नाटयकृतीत रमण्यात, रंगण्यात, धुंदफुंद होण्यात आमचे दिवस जात होते. बराच काळ निघून गेला आणि एकदा माडीवर बोलत बसलो असताना चिंतामणी मला म्हणाला, "माझ्या कवितांची नवी वही मी लिहून काढलीय. वाचणार का?" मी ज्या क्षणाची अपेक्षा करीत होतो तोच क्षण मी झटकन पकडला. मी होकार दिला. चिंतूने माझ्या हातात तशीच पूर्वीसारखी एक शाळकरी वही ठेवली. वही कवितांनी पाठपोट भरून गेली होती. मात्र चिंतूने आपलं गद्य लेखन मला फारसं कधी वाचायला दिलं नव्हतं. एक संगीतिका गावातीलच शाळेतील शिक्षकासाठी (ते 'वीणा'मध्येच राहायचे) त्याने अर्धवट लिहिलेली स्वतः वाचून मला दाखवली होती. मुलांमुलींसाठी ती होती आणि परी, अरण्य, फुले, प्राणी, पक्षी आणि अद्‌भुताच्या वास्तवाशी मिश्रण मला त्यात जाणवत होतं. एकदोनदा त्याने आपल्या कथा पण मला तोंडी सांगितल्या व मग त्यांचे कच्चे खर्डे लिहिलेले दाखवले. 'सत्यकथा' (नंतर 'छंद' मासिक यायला लागलं, पण ते मी कुडाळ सोडल्यावर) मासिकातील नव्या कथा व कवितांवर आमची वेळी-अवेळी विपुल चर्चा होत असे. चिंतामणीची कवितेची समज व कथेची जाण प्रगल्भतेकडे जाणारी होती. तरीही आमचे मतभेद अधून-मधून टोकाचे व्हायचे. 'गारंबीचा बापू' ही 'मिडिऑक्रट' कादंबरी आहे असे आमचे सर्वांचेच म्हणणे होते. शरदबाबूंच्या कादंबरींशी तुलना करता 'पडघवली' ही कादंबरी सुमार वाटत असे. 'सत्यकथे'तील काही जानेमाने कवींवर चिंतू सपाटून टीका करीत असे. चिंतामणी त्या काळात छोटे लघुनिबंध (ललितलेखच म्हणता येतील असे) लिहीत असे.

प्रथितयश मासिकांच्या मानाच्या काव्यकोंदणात या कविता तेजाने झळकाव्या इतकी त्यांची दीप्ती सचेतन व रंगदार जीवनरसाने रसरसलेली आहे. ऱ्याच कवितांचा उल्लेख इच्छा असूनही टाळणं मला अपरिहार्य आहे कवी पुष्पकुमारांच्या जीवनाचा पसारा नुकताच कोठे फुलू लागला आहे. त्यांची दृष्टी दिव्यातून जडते-कडे, अव्यक्तातून व्यक्ताकडे, अशरीरी जीवनातून मर्त्य शरीरी मानवी जीवनाकडे वेधलेली आहे. त्यांच्या अनुभूती युगायुगांच्या दोऱ्यात गुंफून चालविलेल्या व सळसळलेल्या वाटतात. जीवनाचा अनंत भविष्यकाळ त्यांच्या समोर आहे. आमच्या परिसरात आणि या कोकणच्या गाजलेल्या भूमीतील मातीतूनच त्यांची जीवन-धारणा पोसली आहे. पुष्पकुमारांचा भविष्यकाळ उज्ज्वल आहे. आणि त्यांच्या-बरोबरच मानवतेचे व संपूर्ण मानवांचेही भवितव्य उज्ज्वल आहे. कारण तेच 'भवितव्य' या कवितेत आक्रंदून सांगतात (मानवाला.)

स्वैरपणे सोडुनि दे
प्राण तुझे आकाशी
चैतन्य राखूनी तू
ठेवू नको तुजपाशी
उज्ज्वल भवितव्य तुझे
चिर होईल नाव नाव तुझे
उज्ज्वल भवितव्य तुझे
उज्ज्वल भवितव्य तुझे

माझ्या त्या काळातील कुडाळ मुक्कामात चिंतामणी माझ्या सन्निधच नव्हे तर माझ्या अंतर्यामात वसतीला आला. त्याचे रागलोभ, समज, अपसमज, जवळ येणं, दूर जाणं, तुटून पडणं आणि तुटत जाणं, स्वतःला अकस्मात आपल्या स्नेह्या-सोबत्यांपासून कमालीचं अलिप्त ठेवणं, अबोला धरणं, व आत्मक्लेश व आत्मपीडन करून घेणं, मी निरंतर अनुभवलं. त्याच्या अंतःकरणात थैमान घालणारे संघर्ष परिस्थितिजन्य, एका विशिष्ट परिसराशी बांधलेले, काहीसे कुटुंबगत, वांशिक व विपुलतेने व्यक्तिगत मानसिक स्वरूपाचे होते. त्याचं दैनंदिन सर्वसाधारण वागणं देखील सर्वसाधारण माणसासारखं सर्वसाधारण नव्हतं. कधी तो एका 'सबनॉर्मल' पातळीवर वावरायचा नाही तर कुठल्या तरी विचित्र आणि विक्षिप्त 'ॲबनॉर्मल' पातळीवर त्याचं एखाद्याला चक्रावून टाकणारे वागणं असायचं. कधी मी शैक्षणिक मानसशास्त्राच्या दृष्टीने त्याच्याकडे एक 'प्रॉब्लेम यूथ' म्हणून पाहायची व त्याच्या वागण्याचा अन्वयार्थ सहानुभूतीने व शास्त्रीयतेने लावण्याचा प्रयत्न करायचो. चिन्तूचे टोकाचे गैरसमज का होतात. आपलं त्याच्याबाबत काय चुकलं, हे सुद्धा चटकन माझ्या लक्षात खूप विचार करकरूनही येत नसे. आम्ही पत्ते

खेळायला बसलो. डाव रंगात आला. कोट, लॅडीस नाहीतर झब्बू. आनंदी वातावरण पसरलं. खेळाडू एकमेकांची हलकी फुलकी गंमत करायला लागले. चिंतूही त्यात मजेत व हसतखेळत सामील व्हायचा. पण क्षणार्धात कुठेतरी काही खट्टखुट्ट व्हायचे. काहीतरी कुणाकडून मजेत बोललं गेलेलं सुद्धा चिन्तू आपल्या मनाला लावन घ्यायचा. मग चिडत चडफडत हातातील पत्ते जमिनीवर फेकून डाव तसाच टाकून आपल्या खोलीत निघून जायचा. मग दोन दोन दिवस, कधी आठवडाभर सुद्धा तो कुणालाच तोंड दाखवीत नसे. तोंड दाखवलंच तर तोंड उघडून बोलत नसे. पुष्कळदा मी माझ्या मूडमध्येच माझ्या खाटेवर कंदिलाच्या उजेडात रात्री, किंवा खिडकीजवळ दिवसा वाचनात गढून जायचो. अकस्मात चिन्तू तिथे यायचा. हातात त्याच्या कागद किंवा वही असायची. नवीन कविता किंवा लेखन त्याने माझ्या-साठी आणलेले असायचे. 'ऐकता का ?' चिन्तू मला तातडीच्या आर्जवी स्वरात म्हणायचा. वाचनाची माझी तंद्री भंग व्हायची. काहीसा तितरवितर व अस्वस्थ होत मी चिन्तूला म्हणायचो, "आत्ताच काय एवढी घाई आहे. उद्या वाचूया ना. माझी आता मनोकथा ऐकण्याची नाहीय चिन्तू केव्हाही माझ्या जवळ आला की माझं एक नेणिवेतलं आकलन मला सावध करायचं नेहमी. ते असे, "नाजूक प्रकरण आहे. सांभाळून हाताळायला पाहिजे. फुटू देता कामा नये..." म्हणून चिन्तूची कोणतीही इच्छा किंवा गरज मी रागाने ओरडून किंवा चिडून तंडून नाकारीत नसे. माझ्याशी काही घरगुती व्यक्तिगत व मानसिक समस्यांच्या भोवऱ्यात माझ्या अंतरी संघर्ष उसळलेले असत. अशा मनोवस्थेत एकांत व अंतर्मुखता मी साधली असता ती भंग पावणं मला खूप पीडादायक वाटत असे. मी खरोखरच आतल्या-आत व्यथित होत असे पण अपार आपुलकीने व कळकळीणे चिन्तूला सबुरीचा शब्द ऐकवीत असे. पण अशा वेळी एक मोठी गंमतच व्हायची. रागारागाने चिंतामणी निघून जायचा. माझ्याशी अबोला धरायचा दिवसामागून दिवस जायचे. पण मग चिंतामणीलाच राहावत नसे. माझ्या विछान्यावर उशीखाली मला चिन्तूच्या अक्ष-रात लिहिलेली चिठ्ठी सापडत असे. चिठ्ठीत फार काही लिहिलेलं नसे. पण एक दोन ओळींत मजकूर असायचा. तो असा— 'सत्यकथेचा अंक आलाय. वाचणार का ? 'मी नवीन ललितलेख लिहिलाय. तुम्ही वाचावा म्हणून थांबलोय.' वाचना-लयात अमूक अमूक नवे ग्रंथ आलेत. 'कवितासंग्रह आलेत...' पण चिठ्या लिहिल्यावरही जिन्यात चुकूनमाकून आमची गाठ पडली तरी चिन्तू खाली मान घालून न बोलताच निघून जायचा. मीही मग चिन्तूला चिठी लिहून गड्याकरवी त्याला पाठवायचो.

दरम्यान खूप काही मराठीच्या साहित्यक्षेत्रात घडत होतं. मात्र चिन्तूने स्वतःच्या नावाने निरनिराळ्या प्रमुख मराठी मासिकांना पाठविलेल्या कविता

परत येत होत्या. चिन्तू सदैव विलक्षण कावलेला व दुखावलेला असे. त्याचवेळी कधी तरी 'नवा विद्यार्थी' हस्तलिखित मासिकाचा प्रकाशन समारंभ विद्यार्थी शिक्षकांनी कुडाळ हायस्कूलमध्ये साजरा केला. सावंतवाडी संस्थानातील नामवंत पत्रकार भाऊसाहेब (वि. स.) खांडेकरांचे निकटवर्ती व 'वैनतेय' साप्ताहिकाचे संपादक मेघश्याम उर्फ आबासाहेब शिरोळकर मुख्य पाहुणे म्हणून आले होते. चिन्तूही त्या समारंभाला हजर राहून बोलला देखील. चहापाण्याच्या वेळी बोलताना शिक्षक मंडळींनी चि. त्रि. च्या कवितेची व लेखनाची तारीफ आबासाहेबांजवळ केली. आबासाहेब शिरोळकर आमच्या शालेय जीवनापासून कोकणातील माझ्या पिढीला पत्रकार, विचारवंत व सामाजिक व राजकीय कार्यकर्ते म्हणून परिचित होते. उंच. गोरेगोमटे. भरीव देहाचे, सदासंपन्न व हसतमुख. बोलके व उत्साही. कशात ना कशात नेहमी गुंतलेले व सदैव घाई–गडबडीत असलेले. प्रेमळ असं आबासाहेबांचं व्यक्तिमत्त्व आम्हाला जाणवायचं. "वैनतेयाच्या छोटेखानी मर्यादेत अधून मधून मराठी साहित्यविषयक लेख, परीक्षणे व्यक्तिचित्रणे प्रसिद्ध होत असत. आबांनी चिन्तूला 'वैनतेया'साठी लिहायला सांगितलं. अवघ्या काही महिन्यांतच 'वैनतेया'त सुंदर देखण्या मुद्रणात व कवितेसाठीच निवडलेल्या चौकटीत चि. त्रि. खानोलकर यांच्या कविता प्रकाशित होऊ लागल्या. त्या कवितातून प्रकट होणारी शब्दकळा, आकृती, रूप व आशय व प्रतिमासृष्टी ही खास चिन्तामणी या कवीची होती. ती कविता मला आठवते. चितादर्शी बहिर्मुख, रंग गंध व भाव प्रतिमांमध्ये रंगणारी, गहिरी गडद व स्थळकाळ, व्यक्ती व निसर्ग–दर्शनात्मक होती. सावंतवाडी परिसरात आणि बेळगावपर्यंत चिन्तूच्या कवितेचा बोलबाला झाला.

दिवाळी–दसऱ्याकडचे दिवस होते. काही कारणास्तव मला मुंबईला जावं लागलं. तोपर्यन्त चितूची व माझी दिलजमाई झाली होती. चितूची कवितेची वही घेऊन मी मुंबईत आलो. मुंबईत आल्यावर 'मौजे'त डोकावणं हा माझा कार्यक्रम असायचा मी तसा डोकावलो आणि सदानंद रेगे मला तिथे भेटला. तो रेल्वेत नोकरी करीत होता. त्याच्याबरोबर बाहेर पडून इराण्याच्या रेस्टॉरॉंत आम्ही बसलो. मी सदूला म्हटलं, "अरे, कोकणात एक नवा प्रतिभासंपन्न कवी जन्माला आलाय. त्याच्या कवितांची वही मी आणलीय. 'मौजे'च्या संपादक मंडळींनी ती वाचून पाहावी अशी माझी इच्छा आहे." सदूने नेहमीच्या त्याच्या तऱ्हेवाईकपणाने माझं म्हणणं गंभीरपणाने न घेता, माझी थट्टा करण्याच्या स्वरात मला म्हटलं, "हा कवी काय करतो ?" तेव्हा मी सदूला म्हटलं, "त्याची आई व तो खाणावळ व गेस्ट हाऊस चालवितात...त्याचं शिक्षण...वाचन..." "बस...बस...बस...पुरे .. पुरे" मला पुढे काहीच बोलू न देता सदू मला म्हणाला, "तर मग तुला फुकटचं जेवायला मिळत असेल...म्हणूनच .." पण सदूला पुढे बोलू न देता मी चापलं



अनुक्रमणिका

नि विनवणीच्या स्वरात म्हटलं,. ." थट्टा आणि मजा करण्यासारखा हा कवी नाहीय...इथेच एखादी त्याची कविता वाचून तर पाहा..." पण सदूने माझ्याकडची वही घेतली व तो मला म्हणाला, " मी 'मौजे'त ही वही दाखवतो. मग तिथे तूसुद्धा ये." माझं मुंबईतील काम आटोपून मी परत कोकणात जायला निघालो. सदूला भेटलो तर चितूच्या कवितेची वही माझ्या हातात परत देत सदू मला म्हणाला, " अरे, कवितेपेक्षा कवीच्या खाणावळीवरच मंडळी जास्त बोलली..." मी वही घेऊन परत कुडाळला खूप संध्याकाळचा आलो. बुधवारचा कुडाळाचा बाजार होता. खाणावळीत जेवणारांची गर्दी झाली होती. चितू आपल्या गल्ल्यावर बसला होता. मी प्रवेशदालनात पाऊल ठेवलं आणि कवी समोरचं टेबल व गल्ला तसाच टाकून झपकन उठला. मी माडीवर जाऊन स्थिरस्थावर होईपर्यंत वहीचं काय झालं, कवितेचं काय झालं, कोण कोण भेटले, या प्रश्नांचा भडिमार कवी सारखा माझ्यावर करीत होता. मी अवाक् होत माडीत उभा होतो.

० ० ०

१९५२–५३ या काळात मी कुडाळ सोडलं आणि कणकवली येथील 'एस. एम. हायस्कूल'मध्ये वर्षभर शिक्षक म्हणून काम केलं. तसा शनिवार–रविवारी मी नेरूरला घरी जाताना सवडीप्रमाणे चितूच्या 'वीणा गेस्ट हाऊस'मध्ये चितूची भेट गाठ घेत असे. २० ऑगस्ट १९५३ पासून मी गोवा सरहद्दीवर तेरेखोल नदीच्या काठावरील बान्दे गावी गेलो. तेथील 'पंचम खेमराज स्मारक विद्यालया'त रुजू झालो. त्याच काळात गोवामुक्ति–संग्राम बाहेरून व आतून जोर धरीत होता. मीही त्यात सामील झालो. तब्बल दहा वर्षे बान्दे मुक्कामी मी शिक्षक व गोवा-मुक्ती लढ्यातील एक कार्यकर्ता म्हणून घालविली. महिन्यातून एखादी माझी फेरी कुडाळला 'वीणा गेस्ट हाऊस'मध्ये होत असे. मग एखादा दिवस, एखादी रात्र संपूर्णपणे काव्यशास्त्रविनोदात मी चितूबरोबर घालवीत असे. एकदा असाच दुपारचा मी चितूकडे डोकावलो तर चितू माझीच वाट पाहत बसला होता. माडी-वर गिऱ्हाइकांची उपस्थिती नव्हती. सामसूम होतं. आतल्या खोलीत मोठ्या खिडकीजवळ नेत चितू मला म्हणाला, "अलीकडचे 'सत्यकथे'चे अंक तुम्ही वाचलेत काय?" आणि घाईघाईने आपल्या खोलीत जाऊन तो सत्यकथेचे अंक आणि आपल्या ताज्या नव्या कविता कागदावर लिहिलेल्या घेऊन आला. त्या कविता पुढील 'सत्यकथे'त प्रसिद्ध होणार आहेत असं सांगून 'सत्यकथे'तील काही कवितांकडे त्याने माझं लक्ष वेधलं. मला त्या कवितांमधील तीन-चार कविता विलक्षण परिचयाच्या वाटल्या...विशेषतः 'शून्य हळदिचे ..' ही कविता व दुसऱ्या दोन–तीन पूर्वी जी वही मी मुंबईला नेली होती तीत मी वाचल्या होत्या. 'होत हळदिचे' या ओळीत 'ह' चा 'श' समजण्यात येऊन 'शेत हळदिचे' कसे मुद्रित

झालेय याचाही उलगडा चिंतूने माझ्यापाशी केला. मात्र कवितेखाली 'आरती प्रभू' ही अक्षरे पाहून मी गोंधळलो. तेव्हा चिंतूने मला त्यामागील घटनेची सर्व हकीकत सांगितली. कुडाळपासून पाच–सहा मैल अंतरावर कोचरे या गावी चिंतूची वहीण व मेहुणे राहत असत. त्यांच्या पत्त्यावरून आपण आपल्या कविता 'आरती प्रभू' या टोपणनावाखाली डाव्या हाताने लिहून कशा पाठवल्या व लगेच 'सत्यकथे'तून आपल्याला कसा प्रतिसाद आला ते ती पत्रे मला वाचायला देऊन चिंतूने मला नेहमीच्या मोकळेपणानं सांगितलं. आपण कुणी एक अकाली वैधव्य प्राप्त झालेली महिला खेडचात आपलं जीवन लेखन-वाचनात व्यतीत करते असंही आपण आपल्या पहिल्यावहिल्या पत्रातून संपादकांना लिहिल्याचं चिंतू मला म्हणाला. एवढेच नव्हे तर त्या वर्षा–दोन वर्षांत पुनःपुन्हा माझी व चिंतूची 'वीणा'त गाठभेट होई तेव्हा आपल्या 'सत्यकथे'तील कविता वाचून आघाडी-वरील मराठी कवी-लेखकांची आलेली पत्रे चिंतू आवर्जून मला वाचायला देई. हां हां म्हणता १९५५–५६ च्या दरम्यान 'आरती प्रभू' ही मराठी नवसाहित्या-तील एक मोठी खळवळ व चर्चेचा विषय ठरली होती. त्याच काळात पुन्हा एकदा मी मुंबईत गेलो असता सदानंद रेगेची भेट घेतली. आमच्या आवडत्या रेस्टॉरॉंमध्ये आम्ही बसलो. तर अतिशय गंभीरपणे व आग्रहपूर्वक सदू मला म्हणाला, "अरे, तू 'आरती प्रभू'च्या 'सत्यकथे'तील कविता वाचतोस का?" मी भारावून गेल्या-सारखा म्हणालो, "हो तर–ही नवी कवयित्री मला विलक्षण वाटतेय .." "तेच तुला मला सांगायचं आहे ." सदू मला आळवणीच्या स्वरात म्हणाला. "कोकणात कोचरे गाव तुझ्या गावापासून किती दूर आहे?" सदूचा मला प्रश्न. मी म्हटलं, "फार लांब नाही. माझ्या आजोळजवळ चार-पाच मैलांवर असेल .." "तू कधी जातोस तिथे?"... "कधीतरी." मी म्हटलं. "हे पाहा..." सदू जणू मला कोणत तरी गुपित सांगितल्याच्या स्वरात म्हणाला, "त्या गावात ही 'आरती प्रभू' राहते. तू कधी भेटला आहेस तिला?"... "नाही बुवा..." मी अचंबा दाखवीत म्हटलं. पण मला आतल्या आत हसू फुटत होतं नि ते ओठावरून बाहेर फुटू नये म्हणून मी सावध राहत होतो. सदूला काय वाटलं कुणास ठाऊक. एकाएकी सदू क्षणभर स्तब्ध राहून मला म्हणाला, "हे 'आरती प्रभू' हे टोपणनाव कुणीतरी पुरुषाने घेतलेलं असावं असा आम्हाला संशय वाटतो..." त्यावर मात्र मी खुद्कन हसलो. आजही तो सदूचा व माझा झालेला संवाद मला जसाच्या तसा आठवतोय.

...मी बराच काळ मध्यंतरी ('मौजे'त सातत्याने ललित लेख लिहिल्यावर–जे सर्व 'अनवाणी चाल' या माझ्या पहिल्या पुस्तकात समाविष्ट झालेत) लेखन-संन्यास घेतला होता. तो १९६२ सालापर्यंत चालू राहिला. सदूला माझ्यावद्दलच शंका येऊन तो मला म्हणाला, "तूच तर नाही ना 'आरती प्रभू' म्हणून लिहीत?" ...मग मात्र मी खूप खळखळून हसत सदूला म्हटलं, "लेको,...याच रेस्टॉरॉंत

काही वर्षांपूर्वी मी तुला एका कवीची वही कोकणातून आणून वाचायला दिली... 'सत्यकथे'चं त्या कवितांकडे लक्ष जावं म्हणून तुला विनंती केली...आणि त्या कवीची तुम्ही सर्वांनी तो एक खाणावळवाला व मी त्या खाणावळीत फुकट जेवणारा म्हणून थट्टामस्करी केलीत...तोच हा कवी.. आरती प्रभू. तुझा संशय खरा आहे..." 'आरती' चं गुपित असं तेव्हाच बाहेर फुटलं होतं.

मुंबई नभोवाणीवर अखिल मराठी कविसंमेलनात व नंतर व्यक्तिश: आरतीचं काव्यवाचन होत होतं. त्याच काळाच्या आसपास विजय तेंडुलकरांचं 'माणूस नावाचं बेट', 'श्रीमंत' ही नाटकं गाजत होती. मी मुंबईतून 'माणूस नावाचं बेट' या नाटकाची प्रत चिंतूसाठी आणली. चिंतू झपाट्याने लिहायला लागला. कादंबऱ्या, नाटके, संगीतिका, लघुकथा, ललित लेख आणि काव्यसंग्रहावर परीक्षणे. १९५७–५८ च्या सुमारास मराठी साहित्य संमेलन मालवण या ऐतिहासिक शहरात भरायचं ठरलं. त्या काळात दक्षिण रत्नागिरीतील मालवणपासून बांद्यापर्यंत संमेलनासाठी स्वागतसमिती नेमली गेली. त्या समितीत चिंतामणीचं व माझंही नाव होतं. चिंतामणीच्या भोवती कुडाळात त्याच्या 'वीणा गेस्ट हाऊस'-मध्ये दक्षिण कोकणातील (आताचा सिंधुदुर्ग जिल्हा) तरुण रसिक व उगवत्या लेखक–कवी मंडळींची वर्दळ सुरू झाली. मुंबई, पुणे, गोवा इथूनही आरती प्रभूचे चाहते येऊ लागले. विद्याधर भागवत, सी. श्री. उपाध्ये, आ. ना. पेडणेकर, मधु मंगेश कर्णिक, वि. ज. बोरकर, द. कृ. सरमळकर, मंगेश पाडगावकर (कवी नव्हेत), रमण कामत, वासू वर्दन अशी ही मंडळी असायची. पेडणेकर, कर्णिक, बोरकर ही नावे मराठी मासिकांतून, साप्ताहिकांतून झळकत होती. भागवत, उपाध्ये पण अधूनमधून आपली कविता घेऊन प्रकट होत होते 'छंद' मासिकातून. 'छंद', 'सत्यकथा'नंतर हाती येऊ लागलेली 'शब्द'सारखी अनियतकालिके व त्यातील स्फोटक, नव्या वळणाच्या मूर्तिभंजक कविता, यांवर 'वीणा'त विपुल व कधीकधी आकांताची चर्चा व वादविवाद होत असत. अशाच एका बैठकीत मालवण येथे भरणाऱ्या 'मराठी साहित्य संमेलना'च्या निमित्ताने दक्षिण कोकणातील प्रसिद्ध, अप्रसिद्ध व उगवत्या कवींच्या नव्या-जुन्या कवितांचा एक प्रातिनिधिक काव्यसंग्रह प्रकाशित करण्याचे 'वीणा'त जमणाऱ्या कवी व लेखक मंडळींनी ठरवले. 'पल्लवी' हे त्या काव्यसंग्रहाचे नावही मुक्रर झाले. चिंतूच्या हातात सर्व सूत्रे देण्यात आली. या काळात मी चिंतूचं कौतुक करीत असे तितकीच त्याच्यावर टीका-पण करीत असे. क्वचित मी मुद्दामच एका टोकाला जाऊन काहीशी एकांगी व दुखरी, बोचरी टीका एकूण तो जे मला त्याचं लेखन वाचायला द्यायचा त्यावर करीत असे. तितकीच ती टीका काहीशा त्याच्या एकलकोंडी व आत्मकेंद्रित होत अहंकारी बनत चाललेल्या स्वभावावर व वागण्याबोलण्यावरही मी करीत असे.

बाल वॉशिंग्टनच्या हातात कुऱ्हाड यावी आणि त्याने ती मिळेल त्या लहान मोठ्या झाडावर ऊठसूट चालवावी तसंच चितूचं काहीसं साहित्याच्या उपवनात होत आहे असं मला जवळून जाणवत होतं. या त्याच्या वागणुकीत त्याच्या साहित्यिक भविष्यकाळाच्या दृष्टीने काही मूलभूत धोके माझ्या लक्षात येत होते. तसे पाहिले तर चितूवर माझा एक वडिलकीचा अधिकार होता व चितूही तो पुष्कळदा माझी टीका शांतपणे सहन करीत मान्यही करीत असे. पण मनातल्या मनात तो कावत व वैतागत असे. चितू झपाझप झपाट्याने गद्यलेखन करू लागला की मी माझी त्यावरील टीका समतोल पण सुस्पष्ट करीत असे तीत मी चितूला कोणतीच फसवी सवलत निखून देत नसे. मग मग मात्र चितू असहनशील आणि उतावळा बनत चालला. त्याचा आतल्या आत रुसण्याचा व स्वतःशीच मानसिक व बौद्धिक खोंगी घालून कुढत बसण्याचा प्रकार वाढत गेला. ती त्याची प्रवृत्ती कशी रोगट व आत्मघातकी आहे हे चितूला मी शिक्षकासारखा समजावून सांगत असे. जागतिक व भारतीय वाङ्मयातील मनोविकृतीला बळी पडलेल्या लेखक प्रतिभावंतांची उदाहरणें देत असे. त्याच्या हातात या विषयाला अनुसरून माझ्याकडे येणारी पुस्तकेही मी ठेवीत असे. पण नंतर चितूच्या मनाने एकच घेतलेले मी पाहत होतो. नेरूरकर माझा द्वेष करतात. त्यांना माझी असूया वाटते. माझ्या प्रतिभेची ते हेतुपुरस्सर निंदानालस्ती करतात. स्वतःला माझ्यासारखं प्रतिभेचं देणं मिळालेलं नसल्यामुळे माझ्यावर सूड उगवू पाहतात. १९५२–५३ सालच्या 'बालार्क' वार्षिकात त्यानं मला आठवते, 'तडफड' किंवा अशाच शीर्षकाचा लेख लिहिला होता. तो संपूर्ण ललित लेख म्हणजे चितूने आपल्या मनातील बाहेर ओतलेली जळजळ, तडफड, मळमळ व आंतरिक दुखणं आहे. त्यात त्याने चितारलेला वडील माणूस म्हणजे मीच केवळ होतो.

चितूच्या बोलण्यात, पुष्कळदा लिहिण्यातही व चर्चा, बैठकांतून व्यक्त होताना येऊ लागलं ते मत मूर्तिभंजक व नकारात्मक असायचं. त्याच्या उचित मूर्तिभंजनाचं कोडकौतुक मी आवर्जून करीत असे. पण मराठीतील ज्येष्ठ लेखक व कवी यांच्याबाबतही तो जेव्हा म्हणे, ते लेखकच नव्हेत, ते कवीच नव्हेत, तो अमका तमका नाटककार कसला नाटककार? असली नाटके मी बसल्याबसल्या हवी तेवढी लिहून दाखवीन, तेव्हा मात्र मी चितूला आवरण्याची आपुलकीची शिकस्त करीत असे. पण चितू काही वेगळीच दिशा व दशा घेत चाललेला माझ्या प्रत्ययाला येत गेला. त्याची बारेमाप स्तुती करणारी मोठमोठ्या माणसांची पत्रे तो माझ्याकडे वाचायला देऊन मग म्हणत असे, "यांच्यापेक्षा तर तुम्ही मोठे नाहीत ना?" पण त्याच वेळी मुळीच न रागावता, विलक्षण संयमाने व चितूबद्दलच्या उत्कट, आंतरिक ओढीने व आत्मीयतेने, पण वरवर आढ्यतेने व काहीशा



अनुक्रमणिका

उद्धटपणाने मी चितूला म्हणत असे, " हे बघ मणि, लोक तुला काहीही म्हणू देत. ते कितीही मोठे लोक असोत...पण ज्या दिवशी मी तुझ्यावर माझा अखेरचा लेख लिहून तुला 'मोठा' म्हणेन त्याच दिवशी तू साहित्याच्या इतिहासात 'मोठा' म्हणून अजरामर होशील..." माझं हे बोलणं ऐकून चितू माझ्यावर भयंकर चवताळून उठायचा. मग निघून जायचा. महिनोन्महिने त्याचा अबोला चालू राहायचा. मालवण येथे 'साहित्य संमेलना'त 'पल्लवी' हा दक्षिण कोकणातील कवींच्या कवितांचा संग्रह देखणा व संपन्न असा प्रकाशित झाला. पण संपादक मंडळातून फक्त माझे नाव तेवढे चितूने कटाक्षाने गाळले होते. संपूर्ण साहित्य संमेलनात तो माझ्याशी एक चकार शब्दही बोलला नव्हता. माझ्याकडे ढुंकूनही त्याने पाहिले नव्हते. कालांतराने पुन्हा आमचा समझोता झाल्यावर 'वीणा'त कवि-लेखक मंडळींची मैफल रंगत गेली. एका सकाळी सर्वांनी नेरूरला माझ्या घरी जायचं ठरलं. तिथे आमच्या घरी माझ्या आईच्या हातचं जेवण जेवून नेरूर गावातील डोंगरदऱ्या, नदीपारावरून मनसोक्त भटकायचा बेत आम्ही एका काव्य-धुंदीत केला. सर्वांच्याच भाववृत्ती उत्फुल्ल, सचेतन व प्रसन्नोत्सुक झाल्या होत्या. कुडाळहून आम्ही सगळेजण चालतच कुडाळ-नेरूर हमरस्त्याने निघालो. तीन मैलांचा रस्ता. रस्त्याच्या सभोवतालच्या झाडाझुडपांत रमत गमत, कविता ऐकवीत व कवितेवर बोलत, व्यक्तिगत गप्पाटप्पा करीत व हास्यकल्लोळात आमचा तांडा चालला होता. आता आमचं घर फर्लांगभर राहिलं असेल. अकस्मात काहीतरी, कुठेतरी चिंतामणीचं बिघडलं. कुणाच्यातरी कसल्या बोलण्यावर चितूने चिडून आक्षेप घेतला. आम्ही सगळे थांबलो. सर्वांचाच रसभंग झाला होता. 'बाबापुता' करून चितूची खूप समजूत करण्याचा आम्ही प्रयत्न केला. पण स्वारी रागावली ती रागावलीच. आणि सर्वांच्या डोळ्यांदेखत 'अबाऊट टर्न' करून माघारे एकटीच कुडाळच्या रस्त्याला लागली. त्या दिवशीचा आमचा सगळाच कार्यक्रम ढासळून गेला.

असाच एकदा खूप दिवसांनंतर मी बांद्याहून कुडाळला आलो. संध्याकाळची वेळ होती. मी 'वीणा'त गेलो. कवी खुषीत आपल्या खोलीत बसला होता. मी आत गेलो व कवीची कळी खुलली. आपल्या हातातील नाटकाचं बाड दाखवीत चिन्तू मला म्हणाला, "हे नाटक मी मामलतदारांतर्फे एक सरकारी कार्यक्रम कुडाळ गावात होणार आहे, त्यासाठी लिहिलंय. आता नाटक बसतही आलंय. थोड्या वेळाने यात काम करणारी माणसं इथे येतील, पण सर्वांचं म्हणणं पडलंय की नाटक फार गंभीर झालंय. त्या नाटकात काही विनोदी प्रवेश हवेत." "मग त्यात काय आहे?" मी मजेत म्हटलं, "माझ्या डोक्यात काही कल्पना आहेत..." मग ते प्रवेश तुम्हीच लिहा " चिंतामणी प्रसन्न होत मला म्हणाला, "पण

मी तुझं नाटकच वाचलेलं नाही." मी म्हटलं. "तुम्ही नाही वाचलंत तरी चालेल - विनोदी प्रवेशांना नाटकांच्या मूळ कथानकाशी काय करायचं आहे ?" ती संध्याकाळ मी तिथेच चितूबरोबर घालविली. आम्ही दोघांनी मिळून नाटकाच्या प्रत्येक अंकात एकेक विनोदी प्रवेश लिहिला. आम्ही त्या प्रवेशात एका फोटोग्राफराचं पात्र घातलं. असा एक अवलिया फोटोग्राफर कुडाळ–वेंगुर्ला परिसरातील लोकांना ठाऊक होता. गळयात कॅमेरा लटकावून तो हिंडायचा. फोटो घेण्यापूर्वी, नंतर घेताना व घेतल्या-वर त्याची जी हालचाल, धावपळ व कॉमेन्टरी व्हायची त्यामुळे भोवताली हशा पिकायचा. वातावरण आनंदी व्हायचं. उंच लंबूस देखणा, चुटपुटीत असं त्याचं दिसणं असे. गुरुनाथ घडाम या कुडाळकराने ती भूमिका नंतर नाटकात रंगभूमीवर छान रंगवली. आपण त्या नाटकात स्त्रीभूमिका करतोय हे कवीने त्याचवेळी मला सांगितलं. नाटकाच्या प्रयोगाला त्या रात्री मी उपस्थित राहिलो. रंगपटात चितू साधं पांढरट निळसर धारीचं सुती लुगडं नेसून स्त्रीरूपात सजलेला मी पाहिला. काही प्रवेश झाल्यानंतर रंगपटात येऊन एकाएकी मूर्च्छित झालेला स्त्रीरूपातील चिंता-मणीही मी त्या रात्री पाहिला. चिंतामणी नाटककार व नट झालेला त्या रात्री मी पाहिला. चितूची उंच, लंबायमान खंगलोशी वाटणारी बारकुली आकृती स्त्री-भूमिकेला अनुरूप होती.

° ° °

१९६० साली चिं. त्र्यं. खानोलकर कुडाळचा निरोप घेऊन मुंबईत आपले नशीब काढण्यासाठी आला. 'वीणा गेस्ट हाऊस' चालविणं आईंना कठीण होत गेलं. चितूची आई मला म्हणायची, "मास्तरानु, धंद्याची परिस्थिती चिंताजनक झाली आहे." आमच्यासमोर चितू बसलेला असायचा. मग मी मुद्दामच चितूकडे पाहात म्हणायचो, "आई, चिंताजनक नाही चितूजनक झाली आहे." त्यावर चिंतामणी माझ्यावर चिडायचा आणि त्याचा अबोला सुरू व्हायचा. १९६२ साला-पर्यंत मी कोकणातच बांद्याला गोवा सरहद्दीवर राहात होतो. गोवा पोर्तुगीजांच्या गुलामगिरीतून मुक्त झाला होता. नंतर मीही कोकण सोडलं आणि मुंबईत राहायला आलो. मला पुन्हा एकदा जमलं तर मराठीच्या साहित्यविश्वात वाटचाल करायची होती. 'स्टेजवॅक' करायचं होतं. चिं. त्र्यं. खानोलकर आणि आरती प्रभू या दोन्ही नावांनी चिंतामणी मराठी साहित्यसृष्टीत झळाळीने चमकत होता. गरूडझेप घेत होता. योगायोगाने तो वांद्रा येथील सरकारी कर्मचारी वसाहतीत आई–बायको–मुलांसह राहायला आला. गांधीनगरमध्ये आणि खेरनगरमध्ये काही काळ आम्हाला आमच्या एका मित्राने आपली जागा राहायला दिली म्हणून मी व माझी बायको तिथे राहायला आलो. त्यामुळे चिं. त्र्यं. ची घरगुती भेट व्हायला लागली. कै. दीनानाथ दलाल यांच्या 'दीपावली'त मी पुस्तकपरीक्षणे लिहू लागलो. 'दलाल स्टुडिओ'त आणि 'वसुधा' कार्यालयात (विजय तेंडुलकर

संपादन करीत तो काळ) नामवंत साहित्यिक मंडळींबरोबर माझी ऊठबस होऊ लागली. माझा कथाकार मित्र श्रीराम कामत याने मला तेंडुलकरांकडे नेले. माझ्या कथा वसुधेतून येऊ लागल्या. वसंतकुमार सराफही मुख्य संपादक म्हणून भेटायचे. एका संध्याकाळी बांद्र्याला चिं. त्र्यं. माझ्या घरी आला. स्वतःच्या अक्षरात लिहून त्याने मला आपला 'दिवेलागण' हा कवितासंग्रह भेट दिला. नंतर की त्याच सुमाराला त्याची 'रात्र काळी घागर काळी' कादंबरी गाजू लागली. तिच्यावर उलटसुलट टीकाची चर्चा होऊ लागली. साहित्यिक वर्तुळात मुंबईत चिं. त्र्यं. किंवा आरती प्रभूबद्दल खूप काही उलटसुलट ऐकायला मिळायचं. मी कधी त्या बद्दल चिंतामणीला समोरासमोर किंवा खासगी बैठकीतही विचारीत नसे. मला दिसून आलं की काही वर्तुळांत तो मनस्वी लोकप्रिय होता तर अन्यत्र तितकाच माणूसघाणा, तुसडा, फटकळ, अहंकारी व स्वयंमन्य म्हणून अप्रिय होता. त्याला विपुल प्रसिद्धी मिळत होती. त्याच्या कादंबऱ्यांची प्रकरणं 'रविवार पुरवण्या'तून दिमाखात प्रसिद्ध होत होती. त्याच्या एकांकिका 'सत्यकथे'त येत होत्या व नाट्यस्पर्धांतून सादर झाल्या होत्या. नभोवाणीवरही त्या पेश होत होत्या. चिं. त्र्यं. ची व माझी जेव्हा केव्हा व कुठेही भेट व्हायची तेव्हा चिं. त्र्यं भलत्याच फॉर्मात असलेला मला जाणवायचा. माझ्याशी तो आपुलकीने बोलायचा. कुठे प्रसिद्ध झालेले माझे ललित लेख खूप आवडल्याचे मला तो सांगायचा आपल्या लेखनाचे पुढील बेत सांगायचा. त्याच्या साहित्यिक वर्तुळातील काही ठळक व्यक्तींबद्दल तो भारावून बोलायचा. तर काहीजणांबद्दल तो तक्रारवजा सुरात बोलायचा. त्याच्या भोवती नेहमी त्याच्या चाहत्यांचा तरुण मध्यम घोळका असायचा.

दीनानाथ दलाल यानी एका कोठल्या तरी बैठकीत चिं. त्र्यं. चा 'दिवेलागण' हा कविता संग्रह व 'रात्र काळी घागर काळी' ही कादंबरी मला परीक्षणासाठी दिली. चिं. त्र्यं. ची ती दोन्हीही पुस्तके कोणत्या तरी एका साहित्य निर्मितीच्या अंगाने मला आवडली होती. पण अन्य अनेक निर्मिती व आशयपूर्तीच्या अंगाने ती मला अपुरी व अपक्व वाटली होती. 'दिवेलागण' वर लिहिताना मी म्हटलं होतं, "'दिवेलागण' झाली. पण उजेड कुठे आहे?' हे असे लिहिताना चिं. त्र्यं. चा अहंकार किंचितसा जाणीवपूर्वक दुखविण्याचाही माझा मानस होता. तीच गोष्ट मी लिहिलेल्या 'रात्र काळी...' या कादंबरीवरील परीक्षणाची झाली. त्या कादंबरीचा संपूर्ण परिसर कुडाळ गावातील होता त्या कादंबरीतील पात्रेही आमच्या पाहण्या-बोलण्यातील होती. मी काहीशा कठोरपणेच त्या कादंबरीवर लिहिलं. त्या कादंबरीत बाष्कळपणा, आचरटपणा व मानवी स्वभावाचं अपुरं दिग्दर्शन असल्याचं विस्तृत विवेचन केले. त्या काळात मी बांद्रा सोडून विलेपार्ले येथे हनुमान रस्त्यावर स्वतःच्या जागेत (भाड्याच्या) रहायला आलो होतो. चिं.

त्र्यं अधून मधून आमच्या घरी यायचा. लेंगा–झब्बा, डोक्यावरचे मागे वळवलेले लांब केस, लांबट चेहरा, पानाच्या विडयाने रंगलेले ओठ, डोळयांवर चष्मा, डोळयात भरणारं लांब ठळक नाक. मुद्रेवर प्रसन्नता व चिंता यांचं गहिरं मिश्रण. किरकोळ किडकिडीत देहयष्टी–सार्त्र, आयनेस्को, आल्बर्ट कामू यांची नाटकं-कादंबऱ्या-कथांची पुस्तकं मी चिं. त्र्यं. ला आवर्जून वाचायला द्यायचो. पण माझी परीक्षणे वाचल्या-नंतर पूर्वीसारखाच चिं. त्र्यं. माझ्यावर भयंकर चिडला. रागावला. आमच्याकडे त्याचं येणं बंद झालं त्यानंतर चिं. त्र्यं. ची ' अजगर ' कादंबरी गाजली ' एक शून्य बाजीराव ' या त्याच्या प्रायोगिक नाटकाने तो मराठी रंगभूमीवर प्रस्थापित झाला त्याचे कथासंग्रह आणि अन्य कादंबऱ्या प्रसिद्ध झाल्या, मी त्यावर वेळोवेळी कठोर टीका करीत राहिलो. त्यावर लिहिताना किंवा परिसंवादातून चि. त्र्यं. च्या लेखन कृतींवर बोलताना. तितका चिं. त्र्यं. माझ्यापासून दूर दूर जात राहिला. मला वाटायचं चिं. त्र्यं. कधीतरी माझ्यावर तुफान रागावून निदान माझ्यावरोबर भांडण्यासाठी कधी तरी माझ्या घरी येईल. खवळून पत्र लिहील, पण तसे चिं. त्र्यं. ने काहीच केले नाही. माझ्या खूप जवळ असलेले चिं. त्र्यं. चे चाहते लोक मला विचारीत, ' चिं. त्र्यं.वर तुम्ही नेहमी एवढी कडक टीका का करता ? तो तर आता केवढा मोठा कवी, लेखक व नाटककार झाला आहे !' मग मी त्यांना मुद्दामच म्हणायचो, कारण चिं. त्र्यं. हा किती मोठा प्रतिभावंत कवी, लेखक, नाटककार आहे हे मीच जगाला दाखवून देणार आहे.' मी हे मोजून मापून-बोलतानां मनात एक खूणगाठ बांधायचो. ही मंडळी नक्कीच चिं. त्र्यं. ला माझं हे म्हणणं सांगतील. आणि तसंच व्हायचं. पण त्यामुळे चिं. त्र्यं. ची फुरंगुट अधिकच वाढायची. एकदा चर्नीरोड स्टेशनात अवचित चिं. त्र्यं. ची समोरासमोर गाठ पडली. मी चिं. त्र्यं. कडे पाहून हसलो. चिं. त्र्यं. चष्म्यातून माझ्यावर डोळे रोखून पाहत घुम्म उभा राहिला. कुडाळातील दहा-बारा वर्षांपूर्वीचा चिंतामणी मला आठवत होता. चिंतामणीचं जुनं व नवं रूप एकमेकांत सरमिसळत होतं. मग गंमतच झाली. चिं. त्र्यं. आपण होऊन एकदम माझ्याशी बोलला, " माझा कवितासंग्रह मुंबई विद्यापीठात एम. ए. च्या परीक्षेसाठी निवडलाय..." माझ्याकडे दृष्टी रोखीत चिं. त्र्यं. माझ्यावरोबर चालत होता. माझी प्रतिक्रिया ऐकायला तो उत्सुक होता. कदाचित चिं. त्र्यं. ने माझ्यावर हा मुद्दामच डाव टाकला असावा असं मला वाटलं. मी अजूनही त्याचा किती मत्सर करतो, त्याच्या सदैव वाढत्या कीर्तिझोतात दिवाभीतासारखा तोंड झाकून घेतो व वेडेवाकडे बोलतो ते त्याला अंदाजून घ्यायचं असावं, या विचारानं माझं मन पापशंकी बनलं. मनातून मी चिं. त्र्यं. च्या मोठेपणाने भारावून व हर्षून गेलो होतो. चिं. त्र्यं. नं अधिक चिंतनसखोल व्हायला पाहिजे, सुलभ व स्वस्त प्रसिद्धीच्या लखलखाटात स्वतःला हरवून घेऊ नये, साहित्याचं चौफेर वाचन व अध्ययन

करावं, घाई किंवा उतावळी न करता प्रसिद्धीच्या मोहक अभिलाषेने मागणी तसा पुरवठा म्हणून कादंबऱ्या, कथा, नाटके लिहू नयेत असं त्याला निक्षून सांगावंसं गिरगावची वाट चालताना मला खूप आतून वाटत होतं. पण मग प्रत्यक्ष मी उद्गारलो ते एवढंच, " एखाद्याचा कवितासंग्रह एम. ए. ला लागला म्हणजे तो मोठा जातिवंत कवी आहे असे मी मानीत नाही. आणि स्वतः कवीने असल्या खोट्या भ्रमात राहू नये..." चिं. त्र्यं. ने माझे शब्द ऐकले नि रागाने फणफणत व माझ्यापासून दूर होत नेहमीच्या त्याच्या गल्लीत अदृश्य झाला.

नंतर चिं. त्र्यं. अनेक अंगांनी मराठी साहित्यात, मराठी रंगभूमीवर व संमेलनातून वगैरे सतत गाजत राहिला. त्याच्याबद्दल साहित्यिक वर्तुळात खूप काही बोललं जायचं. एके दिवशी माझ्या कानावर आलं की, चिं. त्र्यं. वर ठाणें येथील इस्पितळात मानसोपचार केले जात आहेत. कुठल्यातरी एका नामांकित नाट्य-गृहात केवळ एकपात्री पद्धतीचा स्वतःचा नाट्यप्रयोग नामवंत साहित्यिक व नाट्य-कलावंतांच्या उपस्थितीत सादर करताना त्याची होऊ नये ती फजिती झाली. कुणी सांगितलं की, तो प्यायला लागलाय. या सगळ्या वार्ता माझ्या मनाला व्यथित करीत होत्या. चिं. त्र्यं. ला एक मोकळं त्याचं समग्र संश्लेषण व समीक्षण करणारं, पूर्वीचा चिंतामणी, आताचा चिं. त्र्यं. किंवा आरती प्रभू व उद्याचा कुणी एक खानोलकर तेवढाच, अशा टप्प्याने चिकित्सा व परीक्षण करीत, मनसोक्त लिहावं कदाचित ते ' मराठा 'च्या ' रविवार पुरवणी 'त ' एक चिं. त्र्यं. ला मुक्त पत्र ' म्हणून प्रसिद्ध करावं किंवा खाजगीरीत्या त्याला स्वतःच नेऊन द्यावं; असं मला वाटे. तशा पत्रलेखनाच्या बैठकाही मी घेतल्या. पण माझं मलाच सारखं लिहिणं चिं. त्र्यं. मनावर घेईल असा भरवसा वाटत नव्हता. मी कुणी मोठा मराठी साहित्यातील प्रस्थापित अधिकारी समीक्षक होतो असं नव्हतं. पण तरीही चिं. त्र्यं. वर अधिकारी टीका करण्याची कोणती तरी अनामिक नैतिकता माझा छळ मांडीत होती. चिं. त्र्यं. चा अहंकार जितका माझ्यामुळे वेळोवेळी दुखावला असेल तितकाच माझाही अहंकार कदाचित चिं. त्र्यं. च्या एकूण माझ्याशी वागण्याच्या पद्धतीमुळेही दुखावला असावाच. आम्ही दोघेही माणसे होतो. एक प्रकारच्या व्यक्तिगत, साहित्यिक व स्नेहसंबंधांच्या परिघात आम्ही दोघे कळत-नकळत की मुद्दाम जाणीव-पूर्वक युद्धपातळीवरच वावरत होतो ? आणि हे शीतयुद्ध होतं की उष्णयुद्ध होतं ? या मागील आम्हा दोघांची मानसिकता व मानसशास्त्रीय व्यथा नेमकी कोणती होती ? काहीतरी घडत होतं आणि तरीही कोसळत होतं, असं का होत होतं ? चिं. त्र्यं. ने केवढी झेप घेतली होती. केवढा मोठा पल्ला गाठला होता. चिं. त्र्यं. च्या यशात, चिं. त्र्यं. च्या कीर्तीत, चिं. त्र्यं. च्या नावलौकिकात चिं. त्र्यं. बरोबर खरं म्हणजे मीसुद्धा न्हाऊन धुऊन निघत होतो. त्याचा मला नितांत निर्मळ आनंद

होत होता. अभिमानही वाटत होता. कुठेतरी साहित्यिक चिंतामणीच्या या चढत्या-वाढत्या व्यक्तित्वविकासात माझाही थोडाफार हातभार लागलाय याची जाणीव मला सुखद वाटत होती. तरीही मला चिं. त्र्यं. कुठेतरी फसतोय, चुकतोय असं मला वाटायचं आणि माझं माझ्यातरच एक आंतरिक दडपण येत राहायचं की, चिं. त्र्यं. ला हुडसून–खडसून हे सगळं काही मीच सांगायला हवं. तसे काही feelers मी चिं. त्र्यं. समान मित्रामार्फत देतही होतो. कदाचित त्याचे परिणाम चिं. त्र्यं. ला अल्पशा प्रमाणात का होईना अंतर्मुख करण्यात होत असावेत. ते चिं. त्र्यं. चे अखेरचे दिवस होते हे मी आता लिहितोय. तशी कोणतीच जाणीव त्या कालखंडात मला झाली नव्हती. त्या वर्षभरात काही दिवाळी अंकांतून चिंतामणीने मागे वळून पाहणारं आत्मकथनपर लेखन केलं. ते कुणीतरी माझ्या निदर्शनाला आणलं. आवर्जून चिं. त्र्यं. ने त्या आपल्या लेखनात माझ्याबद्दल चांगलं भावुक होऊन लिहिलं होतं. त्याची एक मुलाखतही प्रसिद्ध झाली होती. तीत आपल्या साहित्यिक जडण-घडणीच्या काळाबद्दल बोलताना माझा व द. क्रु. सरमळकर यांचा त्याने विशेष उल्लेख केला होता. माझ्याबद्दल बोलताना चिं. त्र्यं. ने मी त्याला इंग्रजी साहित्या-तील काव्य भरभरून पाजलं आणि त्याच्या स्वतःच्या कवितेची निगराणी आत्मीयतेने केली असं म्हटलं होतं. केवळ चिं. त्र्यं. न माझ्याबद्दल आपुलकीचे उद्गार काढले म्हणूनच नव्हे तर झालं गेलं विसरून एका वडिलकीच्या नात्याने आपणच चिं. त्र्यं. च्या घरी टपकायचं आणि त्याला चकित करायचं असे बेतही मी मनात आखले. कदाचित एकमेकांच्या भेटीत आम्ही एकमेकांची प्रचंड मानहानीही करू, हेही मी गृहीत धरलं होतं. त्याची एक सुंदर कविता 'सत्यकथे'त प्रसिद्ध झाली होती. तिची समीक्षेसह स्तुती करणारं साहित्यिक पत्र मी चिं. त्र्यं. ला लिहिलं. त्याला भेटण्याची इच्छा पण व्यक्त केली. पण चिं. त्र्यं. कडून प्रतिसाद आला नाही. मी वाट पाहत राहिलो. थोडासा रागावलोच. माझ्यातील एका लहान अपरिपक्व मुलानं मला डाचलं नि म्हटलं, 'पुन्हा चिं. त्र्यं. कधी भेटला तर त्याच्याशी तू मुळीच बोलू नकोस.' आणि तसंच घडलं. मुंबई मराठी साहित्यसंघात 'पुरंदरे सभागृहा'त कोणत्या तरी साहित्यिक सोहळ्याला मी संध्याकाळचा उपस्थित राहिलो. माझ्या-बरोबर एक-दोन रसिकमित्र होते. सोहळा साडेआठ–नऊच्या सुमाराला रात्री संपला. मग रेंगाळत, भेटीगाठी घेत व एका सायंकालीन भाववृत्तीत लिफ्टमधून मी खाली आलो. खालच्या मोकळ्या विस्तृत जागेत समोर बाकावर चिं. त्र्यं. खानोल-कर एकटाच चिंतनमग्न बसला होता. कुणाची तरी तो वाट पाहत असावा. पिवळट रंगाचा झब्बा, डोळ्यांवर चष्मा, चष्म्यातून तिरपं रोखून माझ्याकडे पाहणं. पण माझ्याकडे तो पाहत असताना नेहमीपेक्षा वेगळीच आतमझळाळी चिंतामणीच्या नजरेत चमकताना मला दिसली. त्याचे घट्ट मिटलेले ओठ हलल्याचा मला भास झाला. एवढेच नव्हे तर आपली बाकावरील बैठक ढळवीत तो उठून उभा राहिला.

माझ्या दिशेने आणि निश्चितच मला भेटण्यासाठी त्याची पावले पडत होती आणि मी मात्र तसाच त्याला तिथेच झुगारून आवेगाने व वेगाने संघ इमारतीच्या बाहेर पडलो होतो. मात्र स्टेशनच्या दिशेने चालताना, आगगाडीत बसल्यावरही व पुन्हा साहित्य सहवासात आल्यावरही रात्रभर माझं अंतर्याम अतीव पीडन वेदनेने तळमळत होतं, हुरहुरत होतं. माझं मन मला खात व गिळीत होतं. तू केलंस ते फार चांगलं केलं नाहीस असं सारखं बजावीत होतं. त्या बाकावरून उठून माझ्या दिशेने येणारा त्या रात्रीचा चितामणी सारखा माझ्या डोळयांसमोर उभा राहात होता. माझ्याशी बोलू इच्छीत होता.

त्यानंतरच्या काही दिवसांतच एक सकाळ उजाडली. मी दैनंदिन वर्तमानपत्र उघडलं. पहिल्याच पानावर ठळक अक्षरात चि. त्र्यं. खानोलकर यांच्या अकाली मृत्यूची वार्ता प्रसिद्ध झाली होती. चुलीकडे चहा करण्यात गुंतलेल्या माझ्या पत्नीला मी ती आकांताची वार्ता ओरडून सांगितली. चि. त्र्यं. असा तडकाफडकी जावा यावर माझा विश्वास बसत नव्हता. तो आजारी आहे, के. ई. एम. इस्पितळात त्याच्यावर उपचार चालू आहेत. तो बरा होण्याच्या मार्गावर आहे असंच माझ्या कानावर यायचं. इस्पितळाची मला बालपणापासूनच का कुणाला ठाऊक एक दारूण भीती वाटत आली आहे. सहसा मी इस्पितळात जाण्याचं टाळतो. शिवाय चितू इतका काही आजारी नसावा अशी माझी मी समजूत घालीत होतो. पण तो हा इहलोक सोडून गेला हे खरं होतं. मी चि. त्र्यं. च्या अंत्ययात्रेलाही गेलो नाही. माझ्या खुर्चीत जागच्या जागी मी बसून राहिलो. आता मला कविवर्य– शरच्चंद्र मुक्तिबोध यांच्या ' आता ' या कवितेच्या भावसुरात म्हणावंसं वाटतं–

सारे धुके सरले आहे
माझ्या थरथरत्या हाताला चैतन्याने
स्पर्श केला, आणि म्हटले,
सरू दे व्यथा तुझी. वाटचालीची !
आता तू जेथे असशील तोच मुक्काम आहे
आता तू जे जे करशील तेच काम आहे
आता स्वप्नांचा लाचार आधार तुला नको
धुक्यातील इंद्रधनुष्याची वहार तुला नको
आता सत्याने तुझे हृदय दुभंगून टाकले आहे
आणि त्यामधून आपलेच सूर भरले आहेत.
आता तुझ्या अश्रूंचा छान उजेड पडेल
आणि तुझ्या पावलांचा नेटका ठसा दिसेल.

१३, फुलराणी, साहित्य सहवास,
वांद्रा (पूर्व), मुंबई– ४०० ०५१.

# क्रांतदर्शी बुधे : हिमशिखरावरील आकाशनौका

डॉ. द. भि. कुळकर्णी

१९५६ हे वर्ष नागपुरातील सरकारी नोकरांचं घातवर्ष होतं : द्वैभाषिक राज्याची स्थापना झाली आणि या सरकारी चाकरांची ससेहोलपट सुरू झाली. भराभर ऑर्डरी निघू लागल्या आणि कुणी भोपाळ तर कुणी मुंबईला फेकले जाऊ लागले. आश्चर्य म्हणजे इथल्या हिंदी माणसाप्रमाणं मराठी माणसालाही भोपाळच जवळचं वाटत होतं; मुंबईबद्दल दुरावा आणि संदेह होता. नागपूरचं राजधानीपद गेलं होतं. तिला वैधव्य आलं होतं. चीड आणि कढ यांनी नागपूरची नेणीव भरून गेली होती.

मी तर नुकताच बी. ए. झालो होतो आणि झाल्या झाल्या प्रसिद्धी विभागात सहसंपादक होऊन बसलो होतो. खुशीत होतो. 'हम तो बम्बई जाएंगे' असं ज्याला त्याला सांगत सुटलो होतो. द्वैभाषिक हे मला वरदान वाटत होतं. त्यानिमित्तानं आपण मुंबईकर होणार याचाच मला अभिमान वाटत होता.

आमचं ऑफिस सदरमध्ये चिन्ना गॅरेजमध्ये होतं. या धावपळीत आमची साऱ्यांची उचलबांगडी जुन्या सेक्रेटेरिएट बिल्डिंगमध्ये झाली. तिथे सारं कामकाजच थंडावलं होतं आणि सारे कर्मचारी हातावर हात ठेवून 'बुलावा' येण्याची वाट पाहत बसले होते. कामं थंडावली होती पण माणसं उत्स्नावली होती. भयभीत झाली होती, कावली होती. सारखी देशाच्या राजकारणाबद्दल आणि आपल्या भवितव्याबद्दल चर्चा करीत होती.

माझी आणि बुधे यांची पहिली भेट आणि चकमक इथेच झाली. आम्हाला एकमेकांचे नावगावही माहिती नव्हते. ते वऱ्हाडपांडे नावाच्या कारकुनाला त्याचे भविष्य सांगत होते. ते भविष्य निराशाजनक होते. ते ऐकून मी एकदम उखडलोच. ज्योतिष, कुंडली, अंधश्रद्धा आणि बुद्धिवाद यावर आमची थोडी तावातावी झाली; आणि मग बुधे एकदम शांत होत म्हणाले, 'उद्या तुमची कुंडली तर तुम्ही आणा.

मग पाहू.' आणि इतक्या वेळ आवेशाने बोलणारे ते एकदम लहान मुलासारखे निरभ्र हसायला लागले. यावर नेमकी काय प्रतिक्रिया द्यावी ते बराच वेळ मला नीटसे कळलेही नाही; बहुधा मी तेव्हा खांदे उडविले असावेत. विशीत असावा तसाच तेव्हा माझा स्वभाव होता– बुद्धिवादी म्हणवून घेत भावनाप्रधान. शिवाय रावता होता तो कॉमरेड देशपांडे–वडस्कर–मासोदकर–हुद्दार या डावखोऱ्यांमध्ये.

त्या दिवशी बुधे मला जसे दिसले तसेच आजही दिसताहेत–शरीराने, मनाने आणि जगण्यानेही. काहीच फरक नाही. किती वर्षं झालीत बरं? जवळजवळ चौतीस. वीस वर्षांचा तेव्हाचा मी आता चौपन्न वर्षांचा झालो. पुरा बदलून गेलो. टाळूवर चांदवा आला. खांदे झुकले. मते बदलली. कथा–कविता लिहिणे बंद झाले. नागपूर–मुंबई–बनारस–कोल्हापूर–नागपूर असा वळसा पडला. बुधे मात्र जिथेच्या तिथे, जसेच्या तसेच राहिले. काही बदल नाही. काटोल मुक्कामी चक्रधरस्वामींना कुणी उधळीनाथ भेटले होते. स्वामींनी त्यांच्याकडून वयस्तंभिनी विद्या आत्मसात केली होती. बुधे यांना अशी वयस्तंभिनी विद्या तर लाभली नाही ना?

वयस्तंभिनी नाही पण बुधे यांनी गुरूकडून दीक्षा अवश्य घेतली आहे. वयाच्या २३ व्या वर्षी बनारसच्या योगेंद्र शंकर ऊर्फ भय्याजी महाराज यांच्याकडून बुधे यांना राधास्वामी संप्रदायाची दीक्षा मिळाली. या दीक्षेच्या बाह्यखुणा काहीच दिसत नाहीत पण आंतरखुणा मात्र ओतप्रोत आहेत. आज बुधे ७३ वर्षांचे आहेत पण वार्धक्याची अवकळा नाही, व्याधींचा गोतावळा नाही; शरीर चपळ आवाज खणखणीत आणि वृत्ती प्रसन्न. म्हणूनच त्यांच्या सहवासात आपण त्यांच्यापेक्षा लहान आहोत असेही वाटत राहते, मोठे आहोत असेही वाटत राहते.

अध्यात्माचा हा वारसा बुधे यांना गुरूंकडूनच मिळाला असे नाही. तो त्यांचा कुळाचारच आहे : त्यांचे वडील वेदान्ती होते. म्हणूनच सोमवंशी क्षत्रिय कुळास न शोभणारी नावे त्यांनी आपल्या मुलांची ठेवली : पहिला सद्रूप, दुसरा चिद्रूप, तिसरा सुखरूप आणि चौथा आपला हा क्रांतदर्शी. 'मुक्तिबोध' या नावाप्रमाणेच 'कांती बुधे' हे नावही मी पूर्वी वाङ्मयीन टोपणनावच समजत होतो. 'युगवाणी'त त्यांची गद्यगीते यायची तेव्हा ही कोणी कवयित्री असावी असे अनेकांना वाटत होतेच; त्यातील मधुरा भक्तीने त्यास बळकटी येत होती.

रामटेकला बुधे यांच्या घराण्याचे पानाचे मळे होते आणि भंडारा जिल्ह्यात 'गोपीवाडा' हे त्यांचे मालगुजारी गावही होते; सावकारीही होती; पण बुधे यांना अभिमान होता तो घराण्याच्या पारमार्थिक वारशाचा. 'हिमशिखरे' आणि 'आकाशनौका' हे त्यांचे गद्यकाव्यसंग्रह मी प्रथम वाचले तेव्हा हा सरळ सरळ टागोरांचा अनुयायी आहे असे वाटले होते; त्याच्यामागे इतकी स्पष्ट कुलपरंपरा आहे हे नंतर कळले.

नागपूरपेक्षा आमची मैत्री जुळून आली ती मुंबईला. तिथे आम्हा दोघांना एकच टेबल मिळाले. सोबतीला कायकिणी, माथुर, शिरवाडकर, जोगळेकर असे अनेक खंदे सहकारी लाभले. ही ५६-५७ मधली गोष्ट. आता सांगायला हरकत नाही. तेव्हापासून बुधे यांच्यावर माझी श्रद्धाच जडली आहे : बुधे यांनी वर्तविलेली माझ्यासंबंधीची भविष्ये आजवर ९५% खरी ठरली आहेत आणि तीही स्थूलमानाने नव्हे तपशीलवारीने.

अध्यात्म, ज्योतिष आणि वाङ्मय हे बुधे यांच्या आयुष्याचे वेलपान आहे.

त्यांची वाङ्मयीन महत्त्वाकांक्षा ही एक अजब बात आहे. सर्वसाधारण मराठी साहित्यिकाला काय हवे असते ? प्रथम त्याला वाटते, आपले एक पुस्तक निघावे. पुस्तक निघाले की त्याला वाटते, आपण जे लिहिले आहे ते कसेही असो त्याला टीकाकारांनी वाखाणावे. मग त्याला वाटते, बक्षिसे मिळावीत; पाठ्यपुस्तक म्हणून अभ्यासक्रमात आपल्या पुस्तकाचा समावेश व्हावा; भरपूर रॉयल्टी मिळावी; कमिट्या आणि अध्यक्षपदे आपल्याकडे चालत यावीत. थोडक्यात बहुतेक मराठी साहित्यिकांना 'लेखकराव' होण्याची महत्त्वाकांक्षा असते. बुधे नागपूरला होते तेव्हा पु. भा. भावे आणि वा. कृ. चोरघडे हे त्यांचे निकट स्नेही होते. मुंबईला आता तीस-पस्तीस वर्षे ते आहेत तिथे तर प्रकाशन आणि प्रसिद्धी याला काही तोटाच नव्हता; पण बुधे यांना लेखकराव होण्याची इच्छाच नव्हती. 'हिमशिखरे', 'आकाशनौका' आणि 'चँट अँण्ड इनसेन्स' हे त्यांचे गद्यकाव्याचे तीन संग्रह प्रकाशित झाले पण त्यांचा वाङ्मयीन अभिमान बुधे यांना वाटला नाही; तो त्यांच्या आध्यात्मिक साधनेचा हिमनग होता. आज इतकी वर्षे नागपूरला आणि मुंबईला आमच्या किती भेटी झाल्या; पण त्यांनी स्वतःहून कधी आपल्या लेखनाच्या गोष्टी केल्या नाहीत.

मुंबईला प्रारंभी आम्ही सारी वैदर्भी मंडळी गोरेगावला आणि नंतर कॉटन ग्रीनला राहत असू. तेव्हा बुधे एका इंग्रजी कादंबरीच्या लेखनात गुंतले होते. ती कादंबरी होती भारतीय भिकाऱ्यांच्या जीवनावरची. त्यासाठी ऑफिसमध्ये जाता-येता बुधे चिंचपोकळीला उतरत आणि भिकाऱ्यांच्या मुलाखती घेत, त्यांची टेहळणी करीत. खरं-खोटं मला माहीत नाही, पण तेव्हाचे आमचे मित्र म्हणत, 'अहो; बुध्यांना पाहिलं की ते भिकारी पळ काढतात. त्यांना वाटतं हा कोणी पोलिस का आदमी आहे.' बुधे वर्षानुवर्षं ती कादंबरी लिहीत होते. 'आकाशनौके' नंतर मराठी वाचन-लेखन सोडलेच होते. त्यांना एकच ध्यास होता- कादंबरी. ५७ साली मी मुंबई सोडली तेव्हा बुधे वात्सल्याने मला निरोप द्यायला व्ही. टी. वर आले होते. तेव्हा त्यांनी मला डॉस्टोएव्हस्कीची 'ब्रदर्स कारमाझोव्ह' कादंबरी भेट दिली होती. टॉलस्टॉय आणि डॉस्टोएव्हस्की हे बुधे यांच्या गळ्यातले ताईत.

किती तरी वर्षे ऑफिसमधे जाताना त्यांच्या पिशवीत या आवडत्या कादंबरी-कारांची एक ना हटकून असे. तिचे वाचन करमणुकीसाठी नाही, तिचा अभ्यास. लेखक म्हणून. आता अगदी परवा भेटले तेव्हाही त्यांचे तेच बोलणे, 'अहो द. भि. तुमचे मराठी लेखक काय लिहितील ! टॉलस्टॉय वाचा, डोस्टोएव्हस्की वाचा.' आयन रॅण्ड, सोलझेनितसिन, पास्तरनाक, कामू इत्यादी अनेक नावे मी घेतली तेव्हा त्यांनी लहान मुलासारखी मान जोरजोराने हलवली. त्यांची ही जुनीच सवय. चालता चालता एकदम थांबायचे, बरोबरीच्याचा हात घट्ट धरायचा आणि मान हलवीत आवेशाने आपले मत मांडायचे. त्यांची मते लोकविलक्षण आणि एकदम टोकाची, टोकदारदेखील. एकूण मराठी साहित्य आणि साहित्यिक यांच्याबद्दलची त्यांची मते न सांगितलेली बरी. रात्रंदिवस विश्ववाङ्मयात विहार करणाऱ्याला अर्वाचीन मराठी वाङ्मय काय होय ?

मात्र त्यांचे अध्यात्म आणि त्यांचे हे रशियन मास्टर्संचे प्रेम यांची सांगड कशी घालावी हा प्रश्नच आहे. परवा मी त्यांना म्हटलं, 'बुधे, तुमच्या त्या भिकाऱ्यांवरच्या कादंबरीचं काय झालं ?' त्यांनी प्रथम कान टवकारले. मी त्यांची चेष्टा तर करीत नाही ना हे पाहिलं. बुधे यांच्याइतकं पारदर्शक व्यक्तिमत्त्व मी आजवर दुसरं पाहिलेलं नाही. मनातील प्रत्येक भाव त्यांच्या मुखावर आणि हालचालींत सारखा व्यक्त होत राहतो. खूप प्रसन्न असलेले बुधे माझा तो प्रश्न ऐकून एकदम गंभीर झाले. म्हणाले, 'छोडो यार ! फेकून दिली ती कादंबरी.' मी अवाक् झालो. कमाल आहे या गृहस्थाची. वर्षानुवर्षं तपश्चर्या करून यानं ती कादंबरी लिहिली. मराठीकडे पाठ फिरविली. लौकिक यश आणि सुख यांचा कधी विचार केला नाही. आपल्या हातून एकच पण अत्युत्कृष्ट वाङ्मयकृती निर्माण व्हावी यासाठी सारं आयुष्य पणास लावलं, आणि आता हा गृहस्थ म्हणतो, 'छोडो यार ! फेकून दिली ती कादंबरी.' नक्की काय घडलं मला माहिती नाही, पण एवढं नक्की की त्या कादंबरीतून बुधे यांनी आपलं तनमन काढून घेतलं. प्रस्तावना दिली नाही म्हणून नाराज होणारे, बक्षिस मिळालं नाही म्हणून ढसढसा रडणारे, संपादक-प्रकाशक यांच्या मर्जीखातर लेखनाचा कायापालट करणारे असे कोते, आधीशी आणि मिंधे साहित्यिक मी शेकड्याने पाहिले होते पण एक भव्य वाङ्मयीन स्वप्न उराशी कवटाळून आयुष्यभर एक साहित्यव्रत घेणारा साहित्यिक मी प्रथमच पाहात होतो- माझ्या पाहण्यातली अशी दुसरी व्यक्ती आणखी एकच- राम कोलारकर. बुधे यांनी ती कादंबरी का टाकून दिली तर ती नोबेल पारि-तोषिकाच्या तोडीची नव्हती म्हणून. मी म्हटलं, 'पण तुम्हाला नोबेल पारितोषि-काचं इतकं काय वेड ?' तेव्हा ते अतिशय दुखावलेल्या स्वरात म्हणाले, 'नाही. नाही. नोबेल प्राईज मिळावं म्हणून मी लिहीत नाही. त्या तोडीचं लेखन आपल्या

हातून व्हावं ही माझी इच्छा. त्यापेक्षा कमी तसूभरही नको. वरच. टॉलस्टॉय–डॉस्टोएव्हस्कीसारखं.' सगळ्यांची सगळी भविष्यं बुधे सांगतात पण या संदर्भातलं स्वतःचं भविष्य काही ते सांगू शकत नाहीत, या कर्माला काय म्हणावं! बुधे यांच्यावर माझा लोभ आहे तो त्यांच्या या निर्व्याज स्वभावामुळे आणि या भव्य-दिव्य स्वप्नवेडामुळे, आणखी अर्थातच त्यांच्या 'क्रांतदर्शित्वा'मुळे.

सध्या बुधे 'दि आफ्टर–माथ' नावाची, नोबेल पारितोषिक दर्जाची, कादंबरी लिहीत आहेत. पहाटे ध्यान–धारणा–प्राणायाम झालं की ते लिहावयास बसतात. आता फक्त उपसंहाराची थोडी पाने बाकी आहेत. बाकी सारे लिहून झाले आहे. पण बुधे यांचे काही खरे नाही: स्वतःच्या लेखनासंबंधी त्यांना थोडी जरी शंका आली तरी ते त्यांचा निरोप घेतील. नव्या स्वप्नप्रकल्पाकडे वळतील. 'चॅण्ट ॲण्ड इनसेन्स' या गद्यकाव्यसंग्रहात ते म्हणतात, 'येट आय से टू लिटरेचर इज दॅट विच स्टॅण्डस् अमिड द स्ट्रिम्स ऑफ हार्ट ॲण्ड लीड्स देम टू द सी विदिन, विच इज गॉड.' अशा वाङ्मय निर्मितीचा त्यांना ध्यास आहे. एकदा मला वाटले होते की नोबेल पारितोपिकाच्या स्वप्नामुळेच बुधे गद्य–काव्य-लेखनाकडे वळले की काय, पण नंतर लक्षात आले होते की नाही, तो त्यांचा कौटुंबिक वारसाच होता. आता नोबेल पारितोपिक–प्राप्त प्रत्येक कादंबरी अभ्यासत ते कादंबरीलेखन करीत आहेत तेही अनुकरणाने नव्हे तर परमात्म्या-कडून जीवात्म्याकडे त्यांचे अवधान वळले आहे म्हणून. प्रथम भिकाऱ्यांवर कादंबरी लिहावयास घेतली, आता स्त्रीजातीवर कादंबरी लिहीत आहेत. किती तरी कादंबरीकारांच्या यशापेक्षा बुधे यांचे अपयशही मी मोठे मानीन. 'वाङ्मयीन महात्मता' लिहिणाऱ्या मर्ढेकरांच्या कानावर ही वार्ता जाईल तर आनंद होईल. आजही मराठी वाङ्मयाला जागतिक वाङ्मयात नामाचे देखील पान नाही पण निदान आता मराठी लेखक अशा पानाचा विचार करीत आहे, हे कळल्यावर मर्ढेकरांनाच का आपल्यालादेखील बरे वाटेल. मराठी लेखक 'हृदयाचा भडका होऊन लिहीत नाहीत, विचारांची किंवा भावनेची एक बारीकशी काडी पेटवून लिहितात' हा मर्ढेकरांचा आक्षेप निदान बुधे यांच्या इंग्रजी लेखनास तरी खास लागू नाही.

'हिमशिखरे' हा गद्यकाव्यसंग्रह १९५० चा. खरे तर गद्यकाव्य हा प्रकार तेव्हाच लुप्त झालेला. आज तर कुणास त्याची आठवणही नाही. पण उद्या गद्य-काव्याचे पुनरुज्जीवन होईल असा माझा अंदाज आहे. अंतिम तत्त्वाचे चिंतन, वैचारिकता, प्रतीकात्मकता, मुक्त शैली हे सारे वाङ्मयीन विशेष आजच्या साहित्याला प्रियच आहेत. मग जी. एं. च्या नव्या रूपककथेप्रमाणेच नव्या गद्य काव्याची निर्मिती का होऊ नये? तसे होईल तेव्हा मराठी गद्यकाव्यलेखनाचा

इतिहास नव्याने लिहिला जाईल आणि मग क्रांतदर्शी बुधे यांचे साहित्यक्षेत्रातील स्थानही नव्याने स्पष्ट होईल.

ए वन्, जंतर मंतर सोसायटी
अमरावती मार्ग
नागपूर ४४००१०



अनुक्रमणिका



# विद्याधर पुंडलिक

**सुभाष भेंडे**

---

विद्याधर पुंडलिक यांच्याशी माझी ओळख निश्चित कधी झाली हे मला आठवत नाही. मात्र वि. ग. कानिटकर वा श्री. ज. जोशी यांनी ती पुण्यात १९६६ च्या सुमारास करून दिल्याचं अंधुकपणे स्मरतं. पहिल्या भेटीत त्यांची मान किंचित् कलती करून बोलायची सवय, त्यांचं मिस्किल हसणं, डोळे किंचित मिचकावीत चेष्टा करणं माझ्या ध्यानात राहिलं. मी त्यांच्याशी फारसं बोललो नाही. माझ्या लेखनाविषयी त्यांनी जुजबी प्रश्न विचारले आणि आम्ही आपापल्या वाटेनं मार्गस्थ झालो.

आम्ही दोघं अधिक जवळ आलो पुण्याबाहेर – वाईला. विश्वकोशाच्या कामासाठी मी १९६९ पासून वाईला अभ्यागत संपादक ( व्हिजिटिंग एडिटर ) म्हणून जाऊ लागलो. अर्थशास्त्र विषयाच्या नोंदी लिहिण्याचं व लिहून आलेल्या नोंदी संपादित करण्याचं काम माझ्याकडे होतं. विश्वकोशाच्या पहिल्या खंडाची जुळवाजुळव वेगानं चालली होती. दिवाळीच्या सुट्टीत दोन आठवडे आणि उन्हाळ्याच्या सुट्टीत महिनाभर मी वाईला राहात होतो. प्राज्ञ पाठशाळेचं आवार, कृष्णा नदीचा रम्य परिसर, 'विश्वकोश कार्यालया'तील नियतकालिकं आणि दुर्मिळ ग्रंथ आणि भरपूर मोकळा वेळ या गोष्टी माझ्या वृत्तीला मानवणाऱ्या होत्या. त्या काळात अरविंद मंगरूळकर, स. गं. मालशे, मे. पुं. रेगे, देवदत्त दाभोळकर ही बुजुर्ग मंडळी तिथं नियमितपणानं येत. वेगवेगळ्या विषयांतील तज्ज्ञ प्राध्यापक वाईला सुट्टीत वास्तव्य करीत. नव्या ओळखी, गप्पाटप्पा यांत वेळ छान जाई. १९७१ ची उन्हाळ्याची सुट्टी. एक दिवस कार्यालयात कामात व्यग्र झालो असता समोर पुंडलिक उभे राहिले आणि मान हलवीत हसत विचारू लागले– 'काय– ओळख आहे ना?'

पुंडलिकांना पाहून मला खूप आनंद झाला. ते नुकतेच पुण्याहून आले होते आणि आठवडाभर राहणार होते. समाजशास्त्राच्या नोंदी तपासण्याचं, नव्या नोंदी

अनुक्रमणिका

लिहिण्याचं काम त्यांच्याकडे होतं. उभ्या उभ्या आम्ही पाचदहा मिनिटं गप्पा मारल्या. मग तेच म्हणाले, 'संध्याकाळी फिरायला जाऊ– येणार ना?'

नाही म्हणायचं कारणच नव्हतं!

त्यानंतर कार्यालयाची वेळ संपल्यावर आम्ही दोघं पसरणीच्या वाटेवर श्रीदत्तमंदिराच्या बाजूला रोज फिरायला जाऊ लागलो. गप्पा साहित्याविषयीच्या. त्यांचा 'पोपटी चौकट' संग्रह माझ्याकडे होता आणि 'आजी शरण येते', 'सामोरी', 'दवणा' या कथा मी पुन्हा पुन्हा वाचल्या होत्या. 'सत्यकथे'चा मी नियमित वाचक होतो. प्रा. म. द. हातकणंगलेकर यांनी 'समाज प्रबोध पत्रिके'त 'मरण आणि वेलबुट्टी' हा प्रदीर्घ लेख लिहून पुंडलिक व त्यांचे समकालीन कथाकार पानवलकर, ए. वि. जोशी, दिलीप पुरुषोत्तम चित्रे, चिं. त्र्यं. खानोलकर यांच्या कथालेखनाचा साक्षेपी परामर्श घेतला होता. मराठी कथेच्या वेदना आणि विभ्रम त्यांनी नेमक्या शब्दांत उकलून दाखविले होते. पुंडलिक समकालीनांविषयी मोकळेपणानं बोलत. आपल्या कथेच्या वेगळेपणाचा त्यांना रास्त अभिमान होता. प्रा. हातकणंगलेकरांचं त्यांच्याबद्दलचं निरीक्षण 'जुन्यातले नवे आणि नव्यातले जुने' त्यांना मनोमन पटलं होतं. त्या विधानाच्या संदर्भात जुन्या-नव्या कथालेखकांबद्दल ते भरभरून बोलत असत. चपखल शब्द वापरून आपला मुद्दा स्पष्ट करण्याची, अधूनमधून पाश्चात्त्य लेखकांचे संदर्भ देण्याची त्यांची पद्धत माझ्या ध्यानात राहिली. 'लखलखीत', 'भळभळीत' ही विशेषणं त्यांच्या विशेष आवडीची दिसली.

पुंडलिक फार कमी लिहितात. वर्षांतून दोनअडीच कथा–दोन पूर्ण व एखादी अर्धीमुर्धी लिहिलेली! 'विदुस्रावी लेखक' म्हणून त्यांची चेष्टा अनेकांनी केली आहे. 'काय बुवा तुमचे ते दोस्त– कुंथत लिहीत असतात' असे उद्गार एक ज्येष्ठ कथालेखक नेहमी माझ्यापाशी काढतात! आपली प्रत्येक कथा मराठीतील 'उल्लेखनीय कथा' ठरली पाहिजे असा पुंडलिकांचा हट्ट असतो आणि ती मना-सारखी उतरेपर्यंत ते ती पुन्हा पुन्हा लिहीत असतात. क्वचित ते आपल्या कथांची प्रुफं मागवून घेतात. त्यांना नीट न ओळखणारा एखादा भावडा संपादक त्यांच्या-कडे बेसावधपणे प्रुफं पाठवून देतो आणि पश्चात्ताप पावतो! कारण पुंडलिक प्रुफं इतकी चिताडून ठेवतात, मजकुरात इतके बदल करतात की दिवाळी अंकाच्या घाईत असलेला संपादक त्यांनी तपासून पाठवलेलं प्रूफ पाहून हतबुद्ध होतो!

हेही खरं की नवखा संपादक त्यांच्या वाट्याला येत नाही. काही वर्षांपूर्वी त्यांचं कथालेखन नियमितपणे चालू होतं, 'त्यावेळी लिहून आलेल्या दोनअडीच कथांपैकी एक कथा 'सत्यकथे'साठी असायची. दिवाळी तोंडावर आली की, पुंडलिक कथेचं हस्तलिखित घेऊन एक दिवस पुण्याहून मुंबईला मुक्कामाला यायचे.

अनुक्रमणिका

कधी माझ्या घरी उतरत असत. दुपारी खटाववाडीकडे फेरी मारून येत. संध्याकाळी जेवण आटोपलं की म्हणत, 'तुम्ही झोपा — मला थोडं लेखन करायचं आहे—'

मी त्यांना एकदा गंभीरपणे विचारलं, 'चाकू आणून देऊ का ?'

गोंधळून जाऊन त्यांना प्रश्न केला, 'चाकू ? कशासाठी ?'

'कथेला टोकविक करायचं असेल तर करून टाका— मी झोपतो !'

कधी कधी रात्री दोन वाजेपर्यंत त्यांची कथेशी झटापट चाले. सकाळी उठल्यावर अस्वस्थ असत. 'शेवट जमलाय का हो ?' असं पुन्हा पुन्हा विचारीत.

'माझं सोडा हो— मला बरा वाटतो— पण खटाववाडीला पटला पाहिजे !' मी हसत उत्तर देई.

कथा सहजपणे, उत्स्फूर्तपणे उमलत नसे. लेखन कष्टसाध्य होतं. एवढे परिश्रम घेऊन लिहिलेली कथा समीक्षकानं दिवाळी अंकांतील कथांचा परामर्श घेताना अनुल्लेखानं मारली की ते व्यथित होत. चारचौघांनी आपल्या कथेचा उल्लेख करावा; स. ह. देशपांडे, रमेश तेंडुलकर, गो. म. कुलकर्णी, हातकणंगलेकर यांसारख्या जवळच्या मित्रांनी ती आवर्जून वाचून आवडल्याचं सांगावं अशी त्यांची मनोमन इच्छा असे.

एकदा दिवाळीनंतर मुंबईत आले होते. दादरला आपल्या भावाकडे उतरले होते. तिथून त्यांचा फोन आला. इकडच्या तिकडच्या गप्पा झाल्या. माझी मुलगी वेला हिच्यापासून ठणठणपाळापर्यंत सर्वांचं क्षेमकुशल विचारून झालं.

'सुभाष— माझी 'माळ' कथा वाचली की नाही ?' त्यांनी प्रश्न केला.

'वाचली ना ?'

'कशी वाटली ?'

'उत्तम—'

'मघापासून तू काही बोलला नाहीस 'माळ' बद्दल— तेव्हा वाटलं तू कथा वाचलेली दिसत नाहीस !'

मी सावरून घेतलं. 'मी कथेविषयी बोलणार होतोच. घरी या—जेवायलाच या— मग सविस्तर बोलू—' याच 'माळ' कथेला कॅ. गो. गं. लिमये पारितोषिक मिळालं तेव्हा तात्काळ पत्र पाठवून त्यांचं अभिनंदन करण्याची दक्षता मी घेतली. नाहीतर 'तुझं पत्र काही नाही ?' असं त्यांनी मला दटावलं असतं !

पुंडलिकांची कथा चित्रमयी, घट्ट विणीची असते. त्यांच्या 'अखेरची रात्र' या कथेत कुंती कृष्णाविषयी विचार करताना तिच्या मनात येतं. 'त्याचे शब्दसुद्धा मंदिरातल्या चिऱ्यासारखे भक्कम पण रेखीव आहेत— आणि विचारामागची ती

तर्कधारा ! ती तर अखंड नितळ तैलधारेसारखी आहे–' पुंडलिक जणू स्वतः-बद्दल लिहितात असं वाटतं. पुंडलिकांच्या लेखनात्रं हे सामर्थ्य आहे आणि (त्यांच्या आवडत्या 'सत्यकथा' भाषेत बोलायचं म्हणजे) मर्यादाही ! त्यांनी दीर्घकथा लिहिलेल्या असल्या तरी प्रदीर्घ कादंबरी लेखन, व्यावसायिक रंगभूमीवर हमखास यशस्वी होईल असं नाटचलेखन त्यांच्या लेखनीला पेलवणार नाही हे मी त्यांना अनेकदा सांगत असे. 'चक्र' ही त्यांची एकांकिका नितांतसुंदर आहे. पण त्या विषयाचा विस्तार करून त्यानी लिहिलेलं 'माता द्रौपदी' म्हणजे एक शब्द-बंबाळ नाटक. त्या नाटकामधील बौद्धिक संघर्ष, लखलखता त्वेष आणि भळभळती वेदना सर्वसामान्य प्रेक्षकांच्या डोक्यावरून जाणारी. तरी पुंडलिकांचा आग्रह.– हे नाटक व्यावसायिक रंगभूमीवर खात्रीनं लोकप्रिय होईल.... या नाटकाच्या वाचनाचे पंचवीस–तीस प्रयोग त्यांनी केले ! त्यातला एक प्रयोग आमच्या 'धी गोवा हिंदू असोसिएशन'साठी मी त्यांना करायला लावला. दामू केंकरे, रामकृष्ण नाईक, भिकू पै आंगले आदी मंडळी नाटचवाचनाला उपस्थित होती. नाटचवाचन संपल्यावर दामू केंकरेंनी स्पष्ट सांगितलं, 'नाटकात काही घडतच नाही, पुंडलिक. नुसतीच चर्चा आहे.'

हे पुंडलिकांना मान्य नव्हतं. 'रायगडाला जेव्हा जाग येते' यशस्वी होतं तर 'माता द्रौपदी' का होऊ नये ? असा त्यांचा सवाल. आपला मुद्दा ते अतिशय तर्कशुद्ध पद्धतीनं मांडत होते– पण अनुभवी नाटकवाल्यांना ते मान्य नव्हतं.

शेवटी 'माता द्रौपदी' राजाराम शिंदे यांच्या 'नाटचमंदार' संस्थेनं बस-वलं. विजया मेहता दिग्दर्शिका होत्या आणि द्रौपदीची भूमिकाही त्यांनीच केली होती. पहिला प्रयोग 'शिवाजी मंदिर' मध्ये होता. त्या दिवशी पुंडलिक फार खुषीत होते. सौ. रागिणीवैनी मुद्दाम पुण्याहून आल्या होत्या. संध्याकाळी दोघं आमच्या घरी येऊन गेली. 'बघा भेंडे. माझं नाटक विजयाबाईंनी उत्तम बसवलंय्. तुफान चालणार .' ते म्हणाले.

'माझ्या शुभेच्छा आहेत–' मी म्हणालो. मात्र 'धी गोवा हिंदू असोसिए-शन'च्या नाटच विभागात अनेक वर्षं असल्यामुळे 'नाटकाची कुंडली कुणीही मांडू नये' एवढा धडा मी शिकलो होतो.

नाटकाचा पहिला प्रयोग दृष्ट लागल्यासारखा झाला. पण हे नाटक मुळीच चाललं नाही. त्यांना अर्थलाभही झाला नाही. काही वर्षांनी त्यांनी 'चार्वाक' नाटक लिहिलं. बौद्धिक संघर्ष, शाब्दिक चर्चा त्या नाटकातही होती. म्हणजे व्याव-सायिक रंगभूमीवर त्या नाटकाला वाव नव्हताच. शेवटी भालबा केळकरांनी आपल्या 'भाविक' रंगभूमीवर ते आणलं. 'छबिलदास'मध्ये त्या नाटकाचे एक-

दोन प्रयोग झाले. नाट्यक्षेत्रात भरघोस यश मिळविण्याची त्यांची इच्छा अपुरी राहिली. या बाबतीत मी केलेली गणितं दुर्दैवानं खरी ठरली.

एकदा त्यांचा फोन आला.

'तुझं 'मार्ग सुखाचा' नाटक मी काल दीनानाथमध्ये पाहिलं– मला खूप आवडलं– मला जे जमलं नाही ते तुला निश्चित जमेल–' त्यांनी मोकळेपणानं दाद दिली.

माझ्या 'पैलतीर' कादंबरीचं हस्तलिखित त्यांनी बारकाईनं वाचलं आणि खूप उपयुक्त सूचना केल्या. त्या कादंबरीवर आधारलेली दूरदर्शनमालिका त्यांनी उत्सुकतेनं पाहिली. पुण्याला गेलो होतो तेव्हा भेटल्यावर माझे दोन्ही हात हातात घेऊन ते म्हणाले– 'पैलतीर उत्तम ! या माध्यमावरची तुझी मांड पक्की !'

'गड्या आपुला गाव बरा' या माझ्या अमेरिका भेटीवरल्या प्रवासकथांचा संग्रह मी त्यांना अर्पण केला आहे. त्यांचं लगेच पत्र आलं, 'अर्पणपत्रिका वाचली. गोमंतकीय माणसाच्या सौजन्यशीलतेचा, अगत्याचा सुखद प्रत्यय आला–' एवढाच मजकूर पत्रात होता. पण त्यांनी त्यात काय सांगायचं आहे ते सांगितलं होतं.

गेल्या दोनतीन वर्षांत प्रकृतिअस्वास्थ्यामुळे त्यांचं मुंबईला येणं थांबलं आणि माझ्या अन्य व्यवधानामुळे पुण्याच्या भेटी कमी झाल्या. परंतु त्यापूर्वी अनेक वर्षं ते मुंबईला आले की माझ्याकडे एक फेरी ठरलेली. सिद्धार्थ कॉलेजात असताना पुंडलिक चांगले सुदृढ होते, ते क्रिकेट उत्तम खेळत असे त्यांचे त्यावेळचे सहकारी काणेकर, रमेश तेंडुलकर, स. गं. मालशे मला सांगत. त्यानंतर त्यांच्या पोटात अल्सर झाला आणि शस्त्रक्रियेनंतर त्यांच्या खाण्यावर खूपच निर्बंध आले. मी त्यांना भेटलो शस्त्रक्रियेनंतरच्या काळात. घरी आले की माझ्या पत्नीला बजावून सांगायचे– 'वैनी– मला आम्लेट हवं– मात्र मिरच्या नकोत ! जेवणात मसाले कमी वापरा ! तुम्हाला शिक्षा आहे– पण इलाज नाही !'

पुण्याला मी एकदोन दिवस जरी राहिलो तरी त्यांच्याकडे एक जेवण ठरलेलं. जेवण झाल्यावर कधी 'चंदा–भेंडेकाकांना सतार वाजवून दाखव बघू–' असा मुलीला आग्रह मुलांचं आणि रागिणीवैनीचं भारी कौतुक. पुंडलिक रागिणी-वैनींच्या नजरेच्या टप्प्याबाहेर जाऊ शकत नाहीत– कारण 'रिमोट कंट्रोल' रागिणीवैनींच्या हातात ! पुंडलिकांचे सर्व आर्थिक व्यवहार, त्यांचं खाणंपिणं, त्यांचं लेखन या सर्व गोष्टींवर त्यांचं बारकाईनं लक्ष असतं.

त्यांचा धाकटा मुलगा आश्विन अपघातात गेला असं कळलं आणि मी तात्काळ पुण्याला गेलो त्यांना कसं भेटावं हेच कळेना ! मी घरी पोचलो तेव्हा त्यांच्या चार विद्यार्थिनी हॉलमध्ये वाट पाहात होत्या. पुंडलिक आतून आले आणि



अनुक्रमणिका






मला मिठी मारून ओक्साबोक्शी रडू लागले. 'मला नेहमीच भीती वाटायची इतका हुपार मुलगा आम्हाला लाभायचा नाही!' ते पुन्हा पुन्हा सांगत होते. आणि आपला शोक आवरून पुंडलिकांना सावरायची जबाबदारी रागिणीवैनींवर येऊन पडली होती...

मी चार दिवस पुण्यात राहिलो. रोज त्यांच्यापाशी जाऊन बसत असे. हा घाव त्यांच्या जिव्हारी लागला; त्यातून ते पुरते कधी सावरले नाहीत... त्यांचं टेनिस, त्यांच्या बोलण्यातील मिष्किलपणा, वागण्यातील मोकळेपणा सर्वांवर त्या दुःखद घटनेचं सावट पडलं. उन्हाळयाच्या सुट्टीत ते आणि वसंत मिरासदार सपत्नीक कुठं दूरचा प्रवास करत असत. परंतु पुत्रशोकाचं दुःख विसरणं फार कठीण होतं. त्याच्या स्मृतीसाठी काही तरी केलं पाहिजे असं त्यांच्याप्रमाणं मलाही वाटत होतं. आशू खो-खोचा उत्तम खेळाडू होता; महाराष्ट्र राज्य खो खो संघातून तो खेळे. त्याच्या नावानं निधी गोळा करून दरवर्षी खो खो सामने भरवावेत अशी त्यांची योजना होती. मुंबईहून निधी गोळा करण्याचं काम त्यांनी माझ्यावर सोप-वलं. त्यांची ती योजना सुदैवानं फलद्रूप झाली.

पुंडलिक समाजशास्त्राचे प्राध्यापक. धर्म हा त्यांचा खास आवडीचा विषय. विविध धर्मांचा त्यांनी तौलनिक अभ्यास केला आहे, त्यामुळे त्यांची जीवनविषयक जाणीव सखोल आहे. जीवनातल्या सुखदुःखांकडे स्थितप्रज्ञाप्रमाणं पाहिलं पाहिजे याची समज त्यांना आहे. बोलताना ते असं एखादं चमकदार विधान करून जातात की त्यांच्या चिंतनशीलतेचा, प्रगाढ प्रज्ञेचा प्रत्यय सरळपणे येतो- असं असलं तरी मनानं ते कमालीचे हळवे आहेत.

मला एक प्रसंग आठवतो. मी, राजेंद्र बनहट्टी आणि फर्ग्युसन महाविद्यालया-तील इतिहासाचे प्राध्यापक जोशी सदाशिव पेठेतून चाललो होतो. समोरून पुंडलिक आणि सौ. रागिणीवैनी आल्या. पुंडलिक फार अस्वस्थ होते. वैनींना सोडून ते आमच्याबरोबर आले. आम्ही प्रा. जोशींच्या घरी गेलो. मग कळलं की पुंडलिक डॉ. विजया चिटणीस यांना हॉस्पिटलमध्ये भेटून आले होते. डॉ. विजया चिटणीस कर्करोगानं आजारी होत्या. केमोथेरपीचा त्यांच्या केसावर, चेहऱ्यावर फार विपरीत परिणाम झाला होता. एखादं भीषण दृश्य पाहिल्यावर अजाण, भाबडं मूल गडबडून जावं तसं पुंडलिकांचं झालं होतं. पुन्हा पुन्हा ते आम्हाला त्याबद्दल सांगत होते.

मध्येच ते जोशींना म्हणाले, 'तुमच्याकडे मद्य आहे?'

'पुंडलिक मद्याचे शौकीन नाहीत. मित्रमंडळीत असले तर उगाच एखादा पेग 'बदनामी' पुरता घेतात हे मला ठाऊक होतं. त्यांनी त्या दिवशी आपण होऊन मद्याची मागणी केली.

दोन तीन तास आमची बैठक चालली. निघाले तेव्हा पुंडलिक बरेच शांत झाले होते. त्यांच्या बसलेल्या दुःखाच्या धक्क्याचा निचरा झाला होता. त्यांना मोकळं, सुटल्यासारखं वाटलं. एक दिवस अचानक समजलं की पुंडलिक निवृत्त झाले ! खरंच वाटेना ! आपले मित्र साठी ओलांडू लागले की आपणही वृद्ध झालो की काय अशी भीती वाटू लागते ! त्यानंतर बऱ्याच दिवसांनी मी पुण्याला गेलो होतो. त्यांच्या घरी गेलो. चहा झाल्यावर आम्ही बाहेर पडलो. पुंडलिक मला एस्. पी. महाविद्यालयाच्या मागच्या मैदानात घेऊन गेले. आम्ही थोडा वेळ फिरलो; मग एका कठड्यावर जाऊन बसलो. 'मॅजेस्टिक'चे रमाकांत मोदी, स. शि. भावे, आणि मी असे तिघं एकत्र जेवणार होतो. अर्ध्या तासानं मला निघायचं होतं. पुंडलिकांना मी तशी कल्पना दिली होती. पुंडलिक खूप बोलत होते. आशूचा अपघाती मृत्यू, 'सत्यकथा' बंद होणं, मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालयात 'सत्यकथे'च्या निरोप सभेत राम पटवर्धनांनी त्यांच्याबद्दल काढलेले उद्‌गार, निवृत्तिवेतन मिळण्यात होणारा अक्षम्य विलंब—अनेक विषयांवर ते बोलत होते. मी त्यांना धीर देत होतो. 'आर्थिक अडचणींचा निष्कारण बाऊ करू नका' म्हणून बजावत होतो. मुद्दाम विषयांतर करून त्यांच्या छोट्या नातवाबद्दल, चंदाच्या सतारवादनातील कौशल्याबद्दल बोलत होतो. तासभर झाला. मी घड्याळाकडे पहात होतो.

'जाशील रे – थांबतील भावे – बसू आणखी थोडा वेळ !' ते म्हणत होते.

मग ते आपल्या प्रकृतीविषयी बोलू लागले. हात किंचित् थरथरत होते. 'दिवाळी अंकात काहीतरी मस्त, वेगळं लिहा' असं मी म्हटल्यावर 'बघू—हातानं साथ तर दिली पाहिजे—' असं म्लान हसत ते म्हणाले.

खूप वेळानंतर आम्ही उठलो.

'पुण्याला आल्यानंतर भेटल्याशिवाय जायचं नाही—' त्यांनी निरोप घेताना बजावलं. 'बेलाच्या लग्नाला आलं पाहिजे—' मीही त्यांना आग्रह केला.

प्रकृती बरी नव्हती तरी ते मुंबईला माझ्या मुलीच्या विवाहाला आवर्जून उपस्थित राहिले.

पुंडलिकांचा आणि माझा सतरा—अठरा वर्षांचा ऋणानुबंध. त्यांची मैत्री माझ्या लेखनाला, अभिरूची संवर्धनाला नेहमीच उपकारक ठरली. माझ्या कादंबऱ्या, अन्य लेखन वाचून ते नेमक्या शब्दात आपलं मत व्यक्त करतात आणि त्यांच्या कथा, नाटकं वाचून मी परखडपणे माझं मत त्यांना सांगतो. (माझ्या मतांचा त्यांना कितपत उपयोग होतो हे मी कधी जाणून घेण्याचा प्रयत्न केला नाही !) समकालीन लेखनावर त्यांच्याशी तासन् तास चर्चा केल्यावर साहित्याकडे पाहण्याची एक नवी दृष्टी लाभल्याचा मला प्रत्यय येतो. मन ताजंतवानं, टवटवीत होतं.



अनुक्रमणिका

आजचं त्यांचं चमत्कारिक आजारपण पाहिल्यावर वाटतं की या माझ्या मित्राला नियतीनं नीट न्याय दिलेला नाही... या जगात माणसाच्या वाट्याला जे भलेबुरे अनुभव येतात, जी विपरीत दुःखं त्याला निमूटपणे सहन करावी लागतात त्याचं चित्रण स्वतः पुंडलिकांनी आपल्या कथांतून समर्थपणे केलं आहे. मानवी दुःखाला आकार देणारी नियतीची गती, माणसाच्या वाट्याला येणारं एकाकीपण त्यांनी चाणाक्षपणे जाणलं आहे. माझ्या या प्रिय मित्राच्या वाट्याला हे सर्व का यावं याचा उलगडा मला झालेला नाही. मात्र पुन्हा पुंडलिक जिद्दीनं उभे राहतील, साहित्य प्रांतात आगळावेगळा, लखलखीत साक्षात्कार घडवतील याविषयी माझ्या मनात शंका नाही...

५, ज्ञानदेवी, साहित्य सहवास
वांद्रा (पूर्व), मुंबई ५१



अनुक्रमणिका

# आमचं 'चौकूट'

डॉ. यू. म. पठाण

---

आयुष्यातले योग मोठे विलक्षण असतात. त्यातून काही रक्ताच्या नात्यां-पेक्षाही अधिक जिव्हाळ्याची नाती निर्माण होतात. ही नाती आपण पुढे आयुष्यभर जपत असतो. कारण आपल्या आयुष्यातला तो फार फार मोलाचा ठेवा असतो. शंकर पाटील, डॉ. फडकुले, नि प्रा. पंडित शेटे यांच्याशी माझ्या आयुष्याचं असंच नातं जुळणार होतं. नि म्हणूनच की काय आम्ही चौघेजण स्नेहाच्या ऋजू पाशांनी बांधले गेलो आयुष्यभर. जात-धर्माचाच विचार करायचा झाला तर आम्ही सारे वेगवेगळ्या जाती-धर्मांचे. एक मुसलमान, एक लिंगायत, एक जैन नि एक ब्राह्मण. पण या साऱ्या गोष्टी आम्ही सारे एकत्र आल्यावर नि आमची जिवाभावाची मैत्री झाल्यावर कितीतरी दिसामासांनी आम्हाला कळल्या नि त्यांनी आमच्या आयुष्यात कसलाच व्यत्यय आणला नाही. आमच्यापैकी पंडित शेटे फार वर्षांपूर्वीच आम्हाला सोडून गेले. शंकरराव पाटील एकदोन वर्षांपूर्वी निवृत्त झाले. निर्मलकुमार या ऑक्टोबरमध्ये निवृत्त होताहेत. (पण याचा अर्थ असा नव्हे की, ते खरोखरीच साठ वर्षांचे झाले आहेत. त्यांची जन्मतारीखच मुळात चुकीची लावली गेली नि ती दुरुस्त करून घेण्याचे भानही त्यांना कधी झाले नाही.)

निर्मलकुमार नि मी एकाच शाळेत-सोलापूरच्या हरिभाई देवकरण हायस्कूलमध्ये होतो. पण त्यावेळी त्यांची नि माझी मैत्री अशी नव्हती. त्यांना मी ओळखू लागलो ते सोलापूरच्या दयानंद महाविद्यालयात आल्यावर. आमच्या महाविद्यालयाच्या स्नेहसंमेलनात त्या काळात आचार्य अत्र्यांची नाटके होत असत नि त्यात निर्मलकुमार उत्कृष्ट भूमिका करीत. बहुधा ते विनोदी भूमिका करीत. त्यांच्या संवादांची फेक नि त्यांचा अभिनय मन वेधून घेई. खरं तर त्यांच्या या भूमिकां-मुळेच मी त्यांच्याकडे आकृष्ट झालो. माझे दुसरे जीवनकंठश्च मित्र होते, प्रा. पंडित शेटे. ते त्या काळातही विद्यार्थिदशेपासून 'सत्यकथे'त नि 'छंद'मध्ये लिहीत असत. पंडितरावांची नि माझी मैत्री फार जुनी. साताऱ्याच्या न्यू इंग्लिश स्कूलमध्ये आम्ही

१९४५–४६ साली एकाच वर्गात होतो. वर्गाच्या हस्तलिखिताचा मी संपादक होतो. तर पंडितराव उपसंपादक होते. तिथपासून आमचा स्नेह जुळला तो पंडितरावांच्या आयुष्याच्या दुःखद अखेरीपर्यंत. शंकर पाटलांची नि माझी मैत्रीही पंडितरावांमुळेच जुळली. पंडितराव कोल्हापूरचे नि शंकररावही कोल्हापूरचेच. शंकरराव त्या काळात खूप गाजू लागले होते– 'सत्यकथे'त त्यांच्या अस्सल ग्रामीण कथा प्रसिद्ध होऊ लागल्या होत्या. रणजित देसाई, विजया राजाध्यक्ष (त्या वळच्या विजया आपटे), पंडितराव आवळीकर, प्रल्हाद वडेर नि पंडितराव शेटे हे त्या वेळचे कोल्हापूरचे विनीचे तरुण साहित्यिक होते नि ते सारे एकमकांचे त्या वेळेपासूनचे जिवाभावाचे घनिष्ठ स्नेही होते. एक पंडित शेटे सोडले तर हे सारे 'राजारामियन' (कोल्हापूरच्या राजाराम कॉलेजचे विद्यार्थी) होते. पंडितराव शेट्यांमुळे माझा या सर्वांशी परिचय झाला नि माझही कोल्हापूरला येणे–जाणे सुरू झाले. गाठीभेटी होऊ लागल्या. मी हायस्कूलमध्ये असताना प्रारंभी साप्ताहिकातून लिहीत असे. महाविद्यालयात आल्यावर साप्ताहिकांप्रमाणेच मासिकांतून कथा लिहू लागलो. रविवार सकाळ, लोकसत्तेपासून वाङ्मयशोभा, प्रसाद, यशवंत, हंसपर्यंत मजल गाठली. याच काळात पंडितराव शेटे यांच्या वर्गात असलेल्या निर्मलकुमारांची नि माझी मैत्री पंडितरावांमुळे जुळू लागली. प्रतिकूल परिस्थितीमुळे पंडितराव वर्षभर शिक्षण घेऊ शकले नाहीत, त्यामुळे ते वर्षभर मागे राहिले. ते नि निर्मलकुमार दोघेही एक वर्ष माझ्या मागील वर्षात होते.) या काळात निर्मलकुमारही थोडेफार ललित लेखन करीत होते. ते कथा लिहीत असत. नागपूरच्या 'सुषमे'तून त्यांपैकी काही कथा प्रसिद्ध झाल्याचे मला आठवते. पण त्यांचा खरा ओढा होता नाटकांकडे.

पंडितरावांचे एक वैशिष्ट्य होते. ते सतत वाचत असत नि दर्जेदार साहित्यच वाचत असत. नवकथा, नवकाव्य, मर्ढेकरांची समीक्षा, श्री. पु. भागवतांचा वाङ्मयविषयक दृष्टिकोण, त्यांनी केलेले सत्यकथेचे चोखंदळ नि साक्षेपी संपादन यांचे त्यांना विलक्षण आकर्षण वाटे. त्यांच्यामुळे ते मलाही वाटू लागले. त्यांच्यामुळे मी नि निर्मलकुमारही हे नवसाहित्य आवर्जून वाचू लागलो. त्या काळात आम्हा साऱ्यांनाच 'सत्यकथे'प्रमाणेच 'मौजे'चेही विलक्षण आकर्षण वाटे. मी ज्या मासिकांतून कथा लिहीत असे त्यांहीपेक्षा उच्च दर्जाच्या मासिकांतून – विशेषतः "सत्यकथे'तून माझं लेखन यावं, असा लकडा पंडितराव नि निर्मलकुमार लावीत. त्यांच्याप्रमाणेच मला तसे वाटे पण श्री. पुं. चे कडक निकष पाहता, तसं ते येणं फार अवघड होतं.

याच काळात मिरासदारांची नि पंडितरावांची मैत्री झाली. मिरासदार त्यावेळी पंढरपूरला होते. माझीही मिरासदारांशी मैत्री झाली. पुढं मी, शंकर वैद्य

नि मिरासदार या त्रिकुटानं एम. ए. चा अभ्यास परीक्षेच्या वेळी पुण्यात एकत्रच, साहित्य परिषदेसमोरच्या मिरासदारांच्या खोलीत केला. मिरासदार त्यावेळी नुकतेच 'सत्यकथे'त लिहू लागले होते. शंकररावांच्या एकामागून एक उत्तम 'वळीव'सारख्या कथा 'सत्यकथे'त येऊ लागल्या होत्या. त्यांना येणाऱ्या श्री. पुं. च्या पत्रातल्या (खोली, टोकदारपणा इत्यादीविषयीच्या) शेरेवजा सूचनाही आम्ही वाचत असू. अनेक कथांची बीजं सुचली की, शंकरराव गाठीभेटीत ती रंगवून आम्हाला सांगायचे. मिरासदारांच्या बरोबरही कधी कधी अशा प्रकारच्या गप्पागोष्टी व्हायच्या.

मी एम. ए. झालो, दयानंद महाविद्यालयात प्राध्यापक झालो. खूप वाचू लागलो, लिहू लागलो. पंडितराव नि निर्मलकुमार रोज सायंकाळी माझ्या घरी यायचे नि तिथून आम्ही हिंडत हिंडत पार्कवर जायचो. जेव्हा जेव्हा आम्ही भेटत असू त्या-त्या वेळी विषय एकच असायचा– मराठी साहित्यातले नवनवीन प्रवाह– विशेषत: नवकथा नि नवकाव्य. त्यांचाच ध्यास आम्हा सर्वांना लागलेला होता. गंगाधर गाडगीळ, अरविंद गोखले, भावे, माडगूळकर, मर्ढेकर, पु. शि. रेगे, विंदा करंदीकर यांच्या लेखनाची सातत्यानं आम्ही चर्चा करीत असू. नवसाहित्याबद्दलच्या आमच्या कल्पना स्पष्ट व्हायला या चर्चेचा खूप उपयोग होई. वर्षानुवर्षे हा क्रम अखंड चालू होता. मला सुचलेल्या नवनवीन कथांची बीजं मी आमच्या या दोन्ही मित्रांना सांगायचो. त्यांच्याविषयी आमची चर्चाही व्हायची. कधी कधी दोघंही कडाडून टीका करायचे, तर कधी खूप भलावणही करायचे. माझ्या कथांचे पहिले वाचक (किंवा श्रोते म्हणा) हे दोघेजण असायचे. हळूहळू माझे लेखनही 'सत्यकथे'त येऊ लागले. 'सत्यकथे'प्रमाणेच अभिरुची नि हंसमध्येदेखील. त्यावेळी सहज प्रसिद्धी देणारी मासिकेही बरीच होती, त्यातही मी लिहीत असे पण आमचे हे दोघे टीकाकार त्यावर प्रखर टीका करून मला 'नीट' करीत असत.

याचवेळी मी भाषाशास्त्रीय संशोधनासारख्या रूक्ष क्षेत्राकडे वळलो. फार्सीच्या मराठीवरील प्रभावाचा मी अभ्यास केला. पण पंडितरावांनी नि निर्मलकुमारांनी त्याबद्दल नाराजी न दाखवता रोज चर्चा करून माझी पाठराखणच केली. खरं तर त्या दोघांना या विषयात मुळीच रस नव्हता. पण माझ्या हातून एक महत्त्वाचा संशोधन-प्रकल्प पार पडतो आहे, याचंच त्यांना मोठं भूषण वाटे. याच पाच–सहा वर्षांच्या काळातही आमची रोजची नवसाहित्यविषयक चर्चा अबाधितपणे चालू असे. एक तारखेला 'सत्यकथे'चा अंक स्टॉलवर आला नाही की, आम्ही तिघेही अस्वस्थ होत असू. ते पाहून प्रा. मा. ग. बुद्धिसागर कधी कधी आमची थट्टादेखील करायचे.

याच काळात निर्मलकुमारांनी आणखी एक कला जोपासली नि ती म्हणजे वक्तृत्वकला. ठिकठिकाणी त्यांची व्याख्याने होऊ लागली नि ती गाजूदेखील लागली. आज ते महाराष्ट्रातील अग्रगण्य वक्त्यांपैकी एक आहेत. मी महाविद्यालयात १९५३ साली प्राध्यापक झालो तरी सार्वजनिक ठिकाणी फारसे बोलत नसे. किंबहुना बोलण्याचे टाळत असे. शैलीदार वक्तृत्व आपल्याला जमेलसे मला वाटत नसे. निर्मलकुमारांच्या वक्तृत्वाचा मला मनोमन फार हेवा वाटत असे. वर्गातली माझी व्याख्याने चांगली होत पण त्यांना वर्गाची नि अभ्यासक्रमाची मर्यादा नि चौकट होती. त्या बंदिस्त चौकटीत मी चांगली मुलुखगिरी केली पण त्या चौकटी-बाहेर जाण्याचे साहस माझ्या मनात निर्मलकुमारांच्या व्याख्यानांनी पेरले. त्यांची शब्दांची चोखंदळ निवड नि त्यांची फेक, लांबलचक पल्लेदार नि प्रभावी वाक्यं उच्चारण्याची घाटणी, भाषणातलं प्रवाहीत्व नि त्यातला आवेग–आवेश, तर्कशुद्ध मांडणी, मुद्देसूदपणा, पुरोगामी विचारांचा त्या भाषणातून होणारा पाठपुरावा, त्यातील मनापासून हसविणारा–सुखविणारा हलकाफुलका विनोद, शाब्दिक कोटयांचा त्यांनी केलेला सुयोग्य वापर, परिणामकारक प्रारंभ नि शेवट, व्याख्यानात मध्येमध्ये पेरलेली विविध भाषांतील अवतरणं– यामुळं त्यांचं व्याख्यान एखाद्या सुघड, सुढाळ शिल्पासारखं 'देखणं 'ही होई नि आजही ते तसं होतं. या व्याख्यानांकडे मी फार आकर्षित झालो. या क्षेत्रात मी जी काही थोडीफार वाटचाल केली असेल ती निर्मलकुमारांच्या या शैलीदार व्याख्यानांपासून. पण त्यांच्यासारखी शैली मला कधी साधली नाही नि साधणारही नाही.

याच काळात जशी मी निर्मलकुमारांची त्यांच्या व्याख्यानांबद्दल स्तुती करीत असे त्याचप्रमाणं लेखन–संशोधनाविषयीच्या त्यांच्या उदासीनतेचा प्रखर विरोधही करीत असे. त्यांचा लोकहितवादीविषयक संशोधनाचा विषय आम्ही तिघांनी मिळूनच ठरविला नि मग रोज आम्हा तिघांना एकमेकांच्या लेखनाचा हिशेब सायंकाळच्या हिंडण्यात द्यावा लागू लागला. सोलापूरचं 'कॅफे स्माइल' हे आमचं रोजचं चर्चेचं ठिकाण. निर्मलकुमार त्यावेळी सोलापूरच्या संगमेश्वर महाविद्यालयात प्राध्यापक झाले होते. (नि आता ते या महाविद्यालयातूनच निवृत्त होत आहेत.) आम्हा दोघांना आमच्या दोघांच्या महाविद्यालयांत 'कॅफे स्माइल' हे आपलं घर आहे का ?' असे फिशपाँडस् विद्यार्थ्यांनी दिल्याचं आजही मला आठवतं.

त्यानंतर निर्मलकुमारांनी खूप मोठी झेप घेतली. माझ्या मागोमाग त्यांनीही पीएच. डी. मिळवली. माझ्या प्रबंधाला उत्कृष्ट प्रबंधाचे डॉ. परांजपे पारितोपिक नि पुढे राज्यपुरस्कार मिळाला. निर्मलकुमारांचं 'लोकहितवादी : काळ आणि कर्तृत्व' हे पुस्तकही खूप गाजलं. दरम्यानच्या काळात मी 'भाऊसाहेबांच्या बखरी'चं नि त्यांनी 'ज्ञानेश्वरी'च्या पहिल्या अध्यायाचं संपादन केलं. त्या दोन्ही पुस्तकांच्या सोलापूरच्या आमच्या प्रकाशकानं आम्हा उभयतांना विरक्तीची दीक्षा दिली !

मी औरंगाबादेला मराठवाडा विद्यापीठात आलो, त्यावेळी आमच्या त्रिकुटाची फाटाफूट झाली– म्हणजे आम्ही तिघे तीन वेगवेगळ्या ठिकाणी गेलो. फडकुले सोलापूरला, पंडितराव पुण्याला, तर मी औरंगाबादेला. पण पत्रव्यवहार नि गाठीभेटी सतत होत होत्या. माझ्या मध्ययुगीन साहित्य संशोधनाला मराठवाड्यात चांगली गती मिळाली होती. नवरस–नारायणाचं शल्यपर्व, नागेशसंप्रदाय, अज्ञानसिद्धाचं वरदनागेश, सभासद– भाऊसाहेबांच्या बखरीचं पुनर्संपादन, मराठवाड्यातील लोककथा, शोधणी, महानुभाव साहित्य संशोधन, डिंभाचं ऋद्धिपुरमाहात्म्य, एकांक–दृष्टान्तपाठ– स्मृतिस्थळाचं पुनर्संपादन, चोंभा कवीचं उखाहरण इत्यादी कितीतरी ग्रंथांच्या लेखन–संपादनाचं माझं काम मी वेगानं हातावेगळं केलं. या साऱ्यांच्या मागं माझ्या या दोन जिवलग मित्रांच्या नि शंकर पाटलांच्या प्रेरणा होत्या. त्यांच्या पत्रातून नि त्यांच्या भेटीतून या साऱ्या प्रकल्पांची आस्थेनं जी वास्तपुस्त नि भलावण होई त्यामुळं नवनवीन प्रकल्प हाती घ्यायला मोठा उत्साह वाटे. ' तुम्ही आता पोथ्यापुराणांच्या नादी लागलात ' म्हणून निर्मलकुमार कधी कधी माझी खोटी थट्टाही करीत. पण पुन्हा पुढच्या पत्रात नागेश संप्रदायाच्या पुस्तकाचं किंवा उखाहरणाचं संपादन कुठपर्यंत आलंय, याची आस्थेवाईक चौकशीही करीत असत. आपल्या हातून असं काही लिहून होत नाही याबद्दलची अस्वस्थताही निर्मलकुमार अधेमधे व्यक्त करीत पण त्यांचं मन याच काळात ललित निबंधात रमू लागलं होतं. त्यांचं हे ललितलेखन नियतकालिकांतून प्रसिद्धही होऊ लागलं होतं. त्याचे तीन-चार सुंदर संग्रह प्रसिद्धही झाले आहेत. खरं तर याबाबतीत ते माझ्यापुढं गेले. मी माझ्या कथांचा वा ललित लेखांचा संग्रह अद्यापि प्रकाशित करू शकलो नाही. पण त्यामुळेच हे करायला हवं, याची रुखरुख मनात सुरू झाली. दरम्यान पंडितराव औरंगाबादेला प्राध्यापक म्हणून आले नि दुर्दैवानं त्यांचा एका अपघातामुळे दुःखद अंत झाला. श्री. पु. भागवतांमधला नि आमच्यामधला एक दुवा यामुळे निखळला. पंडितराव गेल्यावर साधना प्रकाशनने त्यांचा ' दुपार ' हा कथासंग्रह प्रसिद्ध केला.

यानंतर कितीतरी वर्षे उलटून गेली. मला हिंदी साहित्याची पीएच. डी. मिळाली नि पुढं रांची विश्वविद्यालयाची डी. लिट्. मिळाली. असे संशोधनप्रकल्प घ्यायचा माझ्या मनात विचार आला की, निर्मलकुमार त्याची खूप भलावण करायचे. त्यामुळं अत्यंत उत्साहानं हे प्रकल्प मी घेतले नि ते वेगानं पूर्णही केले.

निर्मलकुमारांनी या काळात तुकारामाविषयी नवा विचार मांडणारे एक पुस्तक लिहिले नि त्याला फार चांगला प्रतिसाद मिळाला. खरे तर तुकारामाविषयी मी महाराष्ट्रातून किती व्याख्याने दिली, अनेक लेख लिहिले पण निर्मलकुमारांनी जे विचार नि जे विश्लेषण केले तसे मला करता आले नव्हते, याची मला जशी

रुखरुख वाटली तसाच निर्मलकुमारांच्या चिकित्सक प्रवृत्तीबद्दल नि नवीन विचार करण्याच्या त्यांच्या प्रज्ञेबद्दल आदरही वाटला. तो त्यांच्यासमोर बोलून दाखवता आला नाही म्हणून या लेखात शब्दबद्ध केला आहे. ' प्रबोधनाच्या पाऊलखुणा ' या पुस्तकाचं त्यांनी केलेलं संपादनही अत्यंत साक्षेपी वाटतं.

निर्मलकुमारांच्या समाजप्रबोधनविषयक विचारांचाही माझ्या मनावर खूप प्रभाव पडला. संतसाहित्याचं मूल्यमापन करण्याचा मी जो थोडाफार प्रयत्न केला तो यामुळेच. मी अलीकडे काही वर्षांत पुन्हा माझ्या आवडीचे ललितलेखन करू लागलो. व्यक्तिचित्रे, प्रवासवर्णने, ललितलेख लिहिण्यात माझे मन पुन्हा रमू लागले. निर्मलकुमारांनी या आवर्ताचे मन:पूर्वक स्वागत केले. माझे जे जे लेखन आवडले, त्याबद्दल त्यांनी मला तातडीने लिहिले. आमच्या गाठीभेटीतही काही लेखांचे वाचन होई नि या लेखांचे पहिले श्रोते निर्मलकुमार असत. माझ्या लेखनाचा प्रारंभ जिथून झाला, तिथे मी पुन्हा या उत्तरआयुष्यात वळलो, याचा पंडित-रावांना जितका आनंद झाला असता, तितकाच निर्मलकुमारांनाही झाला. या साऱ्या वाटचालीत शंकर पाटीलही आमच्या सोबत होतेच. ते लेखनात आमची पाठराखण करीत होते. पाठ्यपुस्तक मंडळात येण्यापूर्वी नि आल्यानंतर आम्हा साऱ्यांच्याच मैत्रीला उजाळा मिळाला. शंकररावांनी तर फार मोठी मजल गाठली, प्रचंड झेप घेतली. कथाकथन, चित्रपटकथालेखन, ग्रामीण कथांचे लेखन, अनेक राज्यपुरस्कार नि सन्मान, अ. भा. मराठी साहित्य संमेलनाचं अध्यक्षपद ही सारी शंकररावांची ' मुशाफरी ' आपणा सर्वांनाच ज्ञात आहे. पंडितरावांमुळे खरे तर आम्ही तिघे एकत्र आलो. आम्हा तिघांच्या हातात हात घालून देऊन पंडितराव मात्र कुठल्या कुठे अदृश्य झाले. आजही त्यांची आठवण झाली की, आम्हा तिघांच्या मनाचे काठ ओलेचिंब होतात.

२, आनंदनगर, टाऊन हॉल,
औरंगाबाद– ४३१ ००१.

▱

# आनंदाचे डोही

डॉ. निर्मलकुमार फडकुले

डॉ. यू. म. पठाण आणि मी गेली पस्तीस, चाळीस वर्षं मित्र आहोत. ही मैत्री गाढ आहे. उत्कट आहे. या मैत्रीला प्रारंभ केव्हा झाला हे आता नीटसं आठवत नाही. पण सोलापूरच्या दयानंद कॉलेजात केव्हा तरी आमची भेट झाली. त्यावेळी पठाणांचं लेखन सुरू झालं होतं. एक उत्तम कथालेखक व्हावं असं त्यांचं त्यावेळचं स्वप्न होतं. मी देखील त्याचवेळी कथालेखनाचे धडे गिरवायला सुरुवात केली होती. पठाणांच्या कथा साप्ताहिकातून आणि मासिकांतून प्रसिद्ध होत असत. आमच्यातल्या मैत्रीतला हा समान धागा होता. कथा लिहून झाली की तिचं पहिलं वाचन मी आणि पंडित शेटे करीत होतो. आम्हा दोघांनाही पठाणांच्या लेखनचातुर्याचा हेवा वाटायचा. पठाणांमुळंच पंडितराव आणि मी कथालेखनाकडं वेगानं वळलो. कॉलेजातली ती तीनचार वर्षं फार आनंदात गेली. दररोज संध्याकाळी आम्ही तिघं एकत्र येत असू आणि मराठी कथासाहित्यावद्दल चर्चा करीत असू. पंडितराव आणि पठाण 'सत्यकथा' मासिकाचे विलक्षण चाहते होते. मलाही ते नियतकालिक आवडायचे. पण त्यातून प्रसिद्ध होणाऱ्या काही नव्या धर्तीच्या कथा मला तितक्याशा रुचत नसत. एखादा नवकथाकार मनोविश्लेषणाच्या नावाखाली जी रटाळ पिंजण करीत बसायचा तिच्यामुळं कथेतलं कथातत्त्वच नाहीसं होतं असं माझं मत होतं. पण एकंदरीत मराठी कथेत एक नवा प्रवाह जोमानं मिसळला आणि त्याचं श्रेय 'सत्यकथेलाच' मुख्यतः आहे. यावद्दल आमच्या मनात शंका नव्हती. पण 'सत्यकथा' म्हणजे नवलेखकांची 'भगवत्-गीता' असं मानणाऱ्या कित्येकांची मी थोडीफार थट्टाही करीत असे. एके दिवशी संध्याकाळी आम्ही तिघे फिरत फिरत नेहमीप्रमाणं पार्क ग्राऊंडवर जाऊन बसलो. गप्पांना चव यावी म्हणून भाजलेल्या शेंगांचे पुडे विकत घेतले. पंडित शेटे यांनी त्या महिन्यांच्या 'सत्यकथेत' आलेल्या कुठल्याशा कथेवद्दल म्हटलं,

'ही कथा खरोखरच फार चांगली आहे. अशी कथा पूर्वी वाचली नव्हती.

खांडेकर अन् फडके यांना असली कथा जन्मात लिहिणं शक्य नाही.'

पठाणांनी या विधानाला विरोध केला नाही. त्यांची हीच भूमिका आहे अस मला वाटलं आणि मग अर्धा पाऊण तास माझी आणि पंडितरावांची खडाजंगी झाली. खांडेकर आणि फडके यांच्याविषयी मला आदर होता. या दोन्ही लेखकांच्या शैलीचं कळत न कळत मी अनुकरण करीत होतो. केवळ 'सत्यकथेत' प्रसिद्ध झाली म्हणून पंडितरावांना एखादी कथा श्रेष्ठ वाटावी आणि त्यांनी खांडेकर–फडक्यांचा अधिक्षेप करावा हे मला सहन झालं नाही. मी 'सत्यकथेतली' ती कथा कशी सामान्य आहे, हे माझ्या आक्रमक पद्धतीनं सांगत होतो. पंडितरावही त्याचं पवित्र्यात माझ्याशी बोलत होते. काही कडवट शब्दांची देवाण घेवाण झाली आणि दुसऱ्या दिवसापासून या 'वाङ्मयीन' वादाचे परिणाम आम्हाला जाणवू लागले. मी आणि पंडितराव यांपैकी कुणाची बाजू घ्यावी हा प्रश्न पठाण सोडवू शकले नाहीत. या वादामुळं खरं तर त्यांचीच पंचाईत अधिक झाली. पुढं मी आणि पंडित शेटे यांनी 'मौज' साप्ताहिकातून परस्परांवर टीका–टिप्पणी करणारी पत्रं लिहिली होती. आम्ही दोघांनी एकमेकांना 'साहित्यिक चिमटे' काढण्याचे पराक्रम केले होते. कॉलेजात येताना दोघेही 'मौज'चे अंक घेऊन येत असू. पण कॉलेज कँटिनमधे बसून मी, शेटे व पठाण तिघेही गरम भज्यांचा आस्वाद न चुकता घेत असू.

यू. म. पठाण हा हाडाचा सज्जन माणूस. 'पठाणी' वृत्तीचा लवलेशही नाही. मराठी साहित्यातला हा अहिंसक माणूस आपल्या प्रेमळ वाणीनं मी आणि पंडितराव यांच्यातले वादविवाद मिटवण्याचा प्रयत्न करीत असे. आम्हा दोघांनाही पठाणांविषयी विशेष आत्मीयता वाटायची. त्यांनी आदेश दिला की आमचे वाद थांबत असत. आज काळानं पंडित शेटे यांना आमच्यातून फार दूर नेलं. नाही तर आजच्या आघाडीच्या लेखकांत त्यांचा समावेश निश्चित झाला असता. परिस्थितीशी दोन हात करीत साहित्यक्षेत्रात धडपडत राहिलेल्या या तरुणाच्या मनात माझ्याविषयी आणि पठाणांविषयी स्वच्छ प्रेमाचा झरा झुळझुळत होता. एकदा पुराणिक नावाच्या एका मित्रानं माझ्यावर बोचरी टीका केल्याचं कानी आल्यावर पंडित शेटे भडकून त्याच्याकडे गेले आणि त्याची कॉलर पकडून ते म्हणाले,

'फडकुल्यांवर बोलण्याचा तुझा काय अधिकार? त्यांच्याबद्दल एक वाईट शब्द बोलशील तर तुला लोळवल्याशिवाय राहणार नाही.' ही हकीकत पुराणिकच्याच तोंडून मला समजली. पठाण, पंडितराव आणि मी नुसते एकत्र आलो असं नव्हे तर परस्परांत मिसळून गेलो. मधूनमधून आमच्यात होणाऱ्या वादविवादांनी मैत्रीत मात्र कधीच अंतराय निर्माण झाला नाही. एम. ए. होईपर्यंत आम्ही तिघे

पाच–सहा वर्षं तरी नियमानं दररोज संध्याकाळी स्वैर भटकत असू. साहित्य या विषयानं आम्हाला एकत्र जोडलं. आज इतक्या वर्षांनंतरही ते दिवस व त्या दिवसांतले ते मनमोकळे वाद–संवाद, वितंडवाद ते हास्यविनोद, एखाद्या गाजलेल्या नाटक–चित्रपटाविषयी केलेली रंगतदार चर्चा हे सारं अजूनही माझ्या आणि पठाणांच्या मनात ताजं टवटवीत आहे. कॉलेजातले ते दिवस साहित्यप्रेमानं झपाटलेले होते. एखाद्या कवीचं काव्यवाचन ऐकलं की संध्याकाळी किंवा रात्री पार्क मैदानावर आम्हा तिघांची एक मैफल रंगायची. पंडितरावांचा खोडकर विनोद, मी त्या काव्यवाचनाचं केलेलं वात्रट विडंबन आणि त्यावर पठाणांनी एखाद्या जन्मजात प्राध्यापकाच्या गांभीर्याला शोभेल अशा रीतीनं केलेला चर्चेचा समारोप मला अजून आठवतो. वार्षिक परीक्षेच्या आदल्या दिवशीही आमची ही बैठक चुकली नाही. परीक्षेत कोणते प्रश्न येतील, त्यांची उत्तरं कशी लिहावीत यावर बोलण्याचा अधिकार अर्थातच पठाणांचा असायचा. एकदा तर त्यांनी पार्कवर मला आणि पंडितरावांना भाषाशास्त्र आणि व्याकरण या महान विषयावर परीक्षेत काय लिहायचं ? याचं मार्गदर्शन केलं होतं. आज पंडित शेटे नाहीत. 'दुपार' हा त्यांचा कथासंग्रह त्यांच्या मृत्यूनंतर प्रसिद्ध झाला. काळाच्या प्रवाहात पंडित शेटे कुठे वाहात गेले कुणास ठाऊक ? पण प्रत्येक सुखदुःखाच्या प्रसंगी मात्र पठाण आणि मी व्यथित मनानं त्यांची आठवण करतो.

एम. ए. झाल्यानंतर यू. म. पठाण सोलापूरच्या दयानंद महाविद्यालयात मराठीचे लेक्चरर झाले. त्यांच्या कथालेखनालाही आता कलात्मक आकार आला होता त्यांच्यासारखं आपणही लिहिलंच पाहिजे या ईर्षेनं माझंही लेखन काहीशा वेगानं सुरू झालं. 'सुषमा', 'वाङ्मयशोभा', 'वसुधा', 'रोहिणी' या मासिकातून आणि ना. सी. फडक्यांच्या 'झंकार' मधून माझ्या काही कथा प्रसिद्ध झाल्या आहेत. एकदा प्रत्यक्ष भेटीत फडक्यांनी माझ्या पाठीवर शाबासकीची थाप मारून म्हटलं होतं, 'लिहीत चला. जे आपल्याला वाटतं ते निःसंकोचपणानं लिहीत जा.' पण माझ्या आळसामुळं आणि मराठी कथेच्या सुदैवानं मी पुढं फारसं लिहिलं नाही.

पठाणांनी मात्र आपल्या लेखनाचा सांधा बदलला. ते एक भाषाशास्त्रीय विषय घेऊन पीएच्. डी. साठी प्रबंध लेखन करू लागले. दररोज संध्याकाळी फिरायला जाताना त्यांनी तयार केलेली कार्डे, त्यावर लिहिलेले फार्सी–मराठी शब्द आणि त्यांची व्युत्पत्ती वगैरेंची ते मला माहिती देत असत. प्रबंधलेखन करीत असतानाही त्यांनी आपल्यातली कथालेखकाची उर्मी दाबून ठेवू नये या मताचा मी होतो. खरं तर ललित लेखन हा त्यांचा 'स्वधर्म' आहे असं अजूनही मला वाटतं; पण आता प्राचीन साहित्याचे संशोधक आणि संत वाङ्मयाचे समीक्षक म्हणून त्यांची प्रतिमा समाजमनात सिद्ध झाली आहे. संतांच्या साहित्यावर महाराष्ट्रात

सर्वत्र आणि परदेशातही काही चर्चासत्रांतून त्यांनी व्याख्यानं दिली. निबंध वाचले. जुन्या संत साहित्यावर पठाण नावाच्या माणसानं अकृत्रिम प्रेम करावं आणि रसाळ व्याख्यानं द्यावीत याचा मला खरोखरच अभिमान वाटतो. संत साहित्याचं हे प्रेम त्यांना त्यांच्या चिंतनशील वृत्तीच्या वडिलांकडून मिळालं आहे. मी तर पठाणांना 'आधुनिक मराठी साहित्यातला संत' असंच संबोधतो. त्यांच्या प्रकृतीतच हे संतत्व मुरलं आहे. गेल्या चाळीस वर्षांत पठाण कुणावर तीव्रतेनं रागावले आणि रागाच्या भरात त्यांनी एखाद-दुसरा 'संत तुकाराम छापाचा' शब्द उच्चारला असा प्रसंग घडलेला नाही. त्यांच्या सात्त्विकतेचाच मला राग येतो आणि मग संत वाङ्मयाच्या अभ्यासाचा हा एक 'दुष्परिणाम' म्हणून मी त्यांच्याकडं बोट दाखवतो. केव्हाही त्यांची भेट झाली की नवं लेखन, संशोधन, व्याख्यानं या विषयांवर आम्ही मनसोक्त गप्पा मारतो. आमच्या बोलण्यात आर्थिक आणि राजकीय विषय चुकूनदेखील निघत नाही. त्यांना नेमका किती पगार मिळतो हे मलाच काय पण त्यांना तरी माहीत असेल का हा प्रश्नच आहे. बेहिशेबी वृत्त त्यांच्यात आणि माझ्यात सारखीच असावी.

पठाणांनी प्रत्येक भेटीत माझ्या आळसावर सौम्य टीका करावी आणि मला लेखनाला प्रवृत्त करावं असं घडतं. केव्हातरी मी लिहिलेल्या एखाद्या लेखाचा ते गौरवानं उल्लेख करतात. माझ्या लेखणीवर माझ्यापेक्षा त्यांचा अधिक विश्वास. कधी कधी मनासारखं लेखन होत नाही म्हणून मी स्वत:वर रागावलेला असतो. माझं दुःख ओळखून त्यावर हळुवार फुंकर घालण्याचं पठाणांचं चातुर्य विलक्षण आहे. पीएच्. डी.चे दोन तीन विषय आणि मार्गदर्शक मी बदलले. एका मार्गदर्शकानं मध्ययुगातल्या एका संतचरित्रकाराचं मी मूल्यमापन करणारा प्रबंध लिहावा असं सुचवलं. काही भाबडी चरित्रं त्या कवीनं लिहिली आहेत. या सुमार दर्जाच्या लेखनाचं महत्त्व-मापन मी काय करणार? तो नाद सोडून दिला आणि स्वस्थ बसलो. लोकहितवादींसारख्या समाजनिष्ठ, पुरोगामी लेखकाच्या वाङ्मयाची चिकित्सक दृष्टीनं छाननी व्हावी ही माझी इच्छा होती. डॉ. वि. म. कुलकर्णी यांनी प्रोत्साहन दिलं आणि माझा हा अभ्यास व्यवस्थित चालू राहावा म्हणून पठाणांचा लकडा सुरू झाला. प्रबंध पूर्ण केल्यानंतर पठाणांना माझ्यापेक्षाही जास्त आनंद वाटला. औरंगाबादहून ते मधून मधून सोलापूरला येत आणि मी लिहिलेला मजकूर अगत्यानं वाचून सूचना करीत. याच काळात एक वक्ता म्हणून माझा उल्लेख होऊ लागला होता. याही क्षेत्रात पठाण माझ्या बरोबर होते आणि आहेत.

आज मी मागं वळून पाहतो तेव्हा साहित्याच्या क्षेत्रात, सभा, व्याख्यानं, चर्चासत्रं वगैरे दालनात मुशाफिरी करताना पठाण आणि मी एकत्र आहोत याचा आनंद वाटतो. मराठवाडा विद्यापीठाच्या मराठी विभागाची वा. ल. कुलकर्णी

नंतर डॉ. पठाण यांनी केलेली चौफेर प्रगती ही त्यांच्या सांस्कृतिक आणि साहित्यिक कर्तृत्वाची द्योतक आहे यात शंका नाही. एखाद्या दिवशी संध्याकाळी गप्पा मारताना पठाण आपली मनोराज्यं उत्कटतेनं बोलून दाखवतात. तेव्हा लक्षात येतं की हा लेखक संपूर्णतया साहित्यात आणि संशोधनात अंतर्बाह्य बुडालेला आहे. एकाच आठवड्यात मराठवाड्यातल्या एखाद्या शिलालेखाविषयी संशोधनपर लेखन करण्यात ते जितका रस घेतात तितक्याच उत्साहाने एक-प्रसन्न ललित लेख त्याच आठवड्यात ते लिहून जातात. लालित्य आणि संशोधन यात परस्परविरोध नसला तरी विशेष सख्यही नाही. पण असल्या भिन्न प्रकृतीच्या लेखनात आणि चिंतनात ते रस घेतात.

साहित्याच्या प्रेमानं आम्ही जवळ आलो; पण हा स्नेह आता साहित्यापुरता मर्यादित राहिलेला नाही. एका असाध्य समजल्या जाणाऱ्या रोगाच्या शंकेनं काही दिवस मी अस्वस्थ होतो. त्या काळात पठाणांच्या पत्रातली भाषा किती हळुवार, किती उत्कट आणि किती व्याकुळ बनली होती याची आठवण झाली की मनाला समाधान वाटतं. त्या काळात माझी प्रकृती बरी व्हावी म्हणून पठाण दररोज ईश्वराची प्रार्थना करीत असत. याचा अर्थ इतकाच की वाङ्मयातून पाऊले टाकीत आम्ही दोघेही प्रत्यक्ष जीवनाच्या सुखदुःखात्मक अवस्थांत बरोबरच राहिलो. एका संस्कृत सुभाषिताची मला आठवण होते. त्याचा आशय असा आहे, 'समारंभात, संकटात, दुःखात आणि सुखात, राजद्वारात आणि स्मशानयात्रेतही जो आपल्या सन्निध असतो तो आपला बांधव मानावा.'

आयुष्याच्या वाटचालीत पठाण आणि पंडित शेटे यांच्यामुळं -आणखीही काही मित्र मिळाले. शंकर पाटील यांची मैत्री फारशी घनिष्ठ नसली तरी त्यांची भेट नेहमीच आनंद देऊन जाते. पाटलांचा मिस्किलपणा, मनमोकळेपणा यांचा प्रत्यय येतो आणि गप्पा रंगत जातात. कधी कधी पुण्याला पठाण आणि मी त्यांच्याकडे गेलो की मग तीनचार तास तरी स्वैर-संवादाचा आनंद मिळायला प्रत्यवाय नसतो. पुण्यात ज्यांच्याकडं आवर्जून जातो त्यात डॉ. मा. प. मंगुडकर हेही आहेत. भारतीय समाजकारण, समाजसुधारकांचं लेखन आणि कार्य या विषयीचा त्यांचा व्यासंग खोल आहे. त्यांची भेट झाली की एखाद्या सामाजिक प्रश्नाची चर्चा सुरू होते. या विषयावर मंगुडकरांचं चिंतन ऐकणं हा एक आनंदाचा अनुभव असतो. केव्हातरी पठाण-मंगुडकर आणि मी एकत्र आलो की एखाद्या सामाजिक विषयावर मंगुडकर आवेगाने बोलू लागतात. वेळेचं भान त्यांना आणि आम्हालाही राहात नाही. आमच्या या मित्रानं वैचारिक साहित्यात चांगली भर टाकली आहे. मंगुडकरांनी एकेकाळी झपाटून वाचन केलं आहे. अनेक विचारवंतांच्या विचारांचं ते जेव्हा बारकाईनं विश्लेषण करू लागतात, त्यांचं निराळेपण

पटवून देऊ लागतात तेव्हा त्यांच्या बुद्धिवादी प्रवृत्तीचा आमच्यावर प्रभाव पडल्याशिवाय राहात नाही. परिसंवाद, चर्चासत्रं, वैचारिक शिबिरं यांच्यात ते सारखे गुरफटलेले असतात. मानवेन्द्रनाथ रॉय यांच्या विचारांचाही त्यांच्यावर खोल परिणाम झाला आहे, बुद्धीचं क्षेत्र उजळून टाकणारा हा मित्र मनानं मृदू, हळवा आहे. माझा उल्लेख ते 'बाबुराव' या नावानं अत्यंत जवळिकीनं करतात. माझी भाषणं ऐकून अनेक प्रसंगी त्यांनी मौलिक सूचना केल्या आहेत. सोलापुरातूनच मंगुडकर ग्रॅज्युएट झाले. कॉलेजच्या त्या दिवसांत त्यांचा एक लहानसा ग्रुप असायचा आणि त्यांच्या काही ना काही वैचारिक चळवळी चालायच्या, मी मात्र या ग्रूपकडं फारसा फिरकत नव्हतो. पुढं पुण्याला गेल्यावर मंगुडकरांनी त्यांच्या अभ्यासमंडळात मला ओढून घेतलं. तिथल्या एकदोन वर्षांत त्यांच्याबरोबर मी अनेक ठिकाणी वावरलो. अनेक अभ्यासकांची व्याख्यानं ऐकली. पुस्तकं वाचली. पुण्याच्या अनेक आकर्षणांपैकी मंगुडकर हे एक आकर्षण आहे.

पठाण आणि मंगुडकर यांनी साहित्यात आपल्या संशोधनानं लक्षणीय भर टाकली. या दोघांच्या वाङ्मयप्रेमामुळं माझ्यातही सुप्त असलेला झरा झुळझुळू लागला. त्यांच्या सहवासात असंख्य आनंदाचे क्षण माझ्या पदरात पडले. एखाद्या अटळ दुःखानं कधी आम्ही अश्रूही गाळले. या सुसंस्कृत रसिक मित्रांच्या सहवासात जीवनाचा अर्थ थोडाफार कळला. जो कळला तो आनंददायक आहे. या आनंदातूनच मी साहित्यनिर्मितीकडं वळलो आणि जे जे लिहिलं ते इतर कोणताही हेतू न ठेवता केवळ माझ्या आनंदासाठी लिहिलं. या मित्रांनी अभिनंदनाची थाप पाठीवर मारली की माझ्यापुढे आयुष्याच्या आणि साहित्याच्या हिरव्या वाटा दिसायला लागतात. एखादी आनंदाची डहाळी मनाच्या भूमीत रुजते आणि मग साहित्याचा वेध घेताना संत तुकारामाच्या व्यक्तित्वाला माझ्या शब्दांनी स्पर्श करण्याचा मी प्रयत्न करू लागतो. साहित्य हे 'स्वान्तः सुखाय' असतं असं म्हटलं जातं त्याचा खरा अर्थ अशावेळी ध्यानात येतो. जीवनाचे आणि साहित्याचे काही रंग व काही रेषा यांचं प्रसन्न आकलन मित्रांबरोबर केलेल्या वाटचालीतून, थोडंफार होऊ लागतं. साहित्याचं प्रेम आम्हाला जगवीत आहे. कधी कधी मला ही काव्यात्म वाट चालताना तुकोबांच्या शब्दांत गुणगुणावंसं वाटतं. 'आनंदाचे डोही। आनंद तरंग ।।'

विवेक

१० विद्यानगर,
उत्तर सदर बाजार
सोलापूर ४१३००३






# मी आणि श्री. के. क्षी.

रवींद्र पिंगे

थोरोनं लिहिलं आहे, थेट चंद्रापर्यंत पूल वांधण्याचा खटाटोप करण्यात तारुण्य मग्न असतं. दरम्यान, काळ निघून जातो. प्रौढ वय प्राप्त होतं. तेही टळतं, नि मग आपल्यापुरतं एक छोटंसं छप्पर वांधण्याकडे माणूस वळतो.

लेखनात आनंद गवसलेल्या माझ्यासारख्या माणसाचं हे छायाचित्र आहे !

माझं पोरवय चालू होतं. तेव्हाचा एकमेव छंद म्हणजे वेकार कवनं रचणं. सुदैवाने, साहित्यसम्राट तात्यासाहेव केळकरांनी स्वहस्ते लिहून कळवलं, 'मुला, तू अगोदर वृत्तदर्पण वाच. अभ्यास कर. व्यासंग वाढव. नंतर कविता लिहायला हरकत नाही.'

मी तो हितोपदेश शिरसावंद्य मानला. नवं कोरं 'वृत्तदर्पण' अवघ्या सहा आण्यांना मिळालं. त्याचा पिट्टया पाडला. हे, ते, असं खंडीभर वाचलं. त्यामुळे कुठे तरी ठिणगी प्रज्वलित झाली असणार. मी लेखणी जवळ केली, ती अगदी ह्या क्षणापर्यंत.

अनंत हरि गद्रयांपासून अनंत अंतरकरांपर्यंत आणि अनंत काकवा प्रियोळकरांपासून अनंत काणेकरांपर्यंतचे लेखणीवहाद्दर त्याकाळी जीवाचा आटापीटा करताना दिसत.

अदृश्य अशा लौकिकापलीकडे त्यांना काय वरं सुटत होतं ? आपण लेखक आहोत हेच त्या थोरांचं भूषण होतं. माझा जीव तुळशीपत्राइतका चिमुकला होता. पण तो जीवंत होता आणि डोळयांसमोर उदाहरणं ठेवण्याचा तो काळही होता. मी दोन सुयांनी माझ्या अवतारकृत्याचं भरतकाम सुरू केलं. लिहायचं नि स्वतःचा खाजगी पुस्तकसंग्रह करायचा. माझं सलामीचं लिहिणं विलकूल वायफळ होतं. त्यात काही अर्थच नव्हता. ते सोडा. मात्र माझं पुस्तकप्रेम निवळशंख उत्कट होतं. जगण्याची धकाधकी चालूच होती. पैसा क्वचित दृष्टिभेट घडवून जाई. तरीसुद्धा

पदरमोड करून ग्रंथसंग्रह करायचं मी पक्क केलं आणि स्वकमाईतून पहिलं पुस्तक विकत घेतलं ते 'व्यक्ती आणि वाङ्मय' लेखक : श्री. के. क्षीरसागर.

इथून श्री. के. क्षीं. बरोबरची माझी एकतर्फी प्रेमयात्रा सुरू झाली. 'व्यक्ती आणि वाङ्मय'मध्ये मला अनेक टपोरे लेखनगुण दिसले. व्यासंगाचं लखलखीत प्रतिबिंब दिसलं. नेमकेपण आणि ठोसपण दिसलं. अनलंकृत अशी विचारांची मांडणावळ दिसली. सुबोध शैली दिसली. औचित्याचं भान दिसलं आणि लेखकाचं एक 'डेडिकेशन' दिसलं. आणखी काय हवं ? त्यानंतर मी क्षीरसागरांचं अक्षर न अक्षर वाचून काढलं. ते सर्वच जरी नाही, तरी 'सुवर्णतुला', 'उमरखय्यामची फिर्याद', 'तसवीर आणि तकदीर' फार आवडलं आणि 'टीकाविवेक' अप्रतिम वाटलं. त्यांचं स्तंभलेखन अजिबातच आवडलं नाही, कारण ते पवित्रेबाज वाटलं. कुलशील सांगणाऱ्या साहित्यिकांनी कधीही पवित्रा घ्यायचा नसतो, अवसान आणायचं नसतं, कुणाचाही कदापिही न्याय करायचा नसतो आणि स्तंभ लेखक श्री. के. क्षी. तर उठसूठ माणसांचा नि त्यांच्या कृतींचा निवाडा करण्यात गुंग माझ्यासारखा त्या वाटेलाच फिरकू शकत नाही. अट्टहासयुक्त सदर लेखन वगळता त्यांचं इतर सैद्धांतिक आणि स्फुट लेखन मला अतिप्रिय झालं. मी त्यांची उजळणी केली. सांगतात की श्री. के. क्षीं. चे सुमारे पाचशे सुटे लेख अजूनही संग्रहांच्य बाहेर मासिकपत्रांमधून उपेक्षित अवस्थेत निपचित पडून आहेत. हे प्रथम कळल तेव्हा मी व्याकुळ झालो. नंतर वाचनात आलं की सर्वश्रेष्ठ इंग्रज लेखक ई. एम. फॉर्स्टर यांचेही पाचशेहून अधिक लेख असंग्रहित अवस्थेत आहेत, तेव्हा थोर ग्रंथ-कारांच्या ललाटी अशीही एक रेषा असू शकते हे कळलं. दुःख वाटायचं बंद झालं. मात्र विषण्ण वाटतं हे तर खरंच.

अशा ह्या प्रिय क्षीरसागरांचा नि माझा आयुष्यभरात कधीही धड परिचय होऊ शकला नाही.

मी हजारदा पुण्यात वस्त्या केल्या. श्री. के. क्षीं. चा 'तुकाराम आश्रम' बाहेरून शंभरदा पाहिला. त्यांना सभासंमेलनात वारंवार पाहिलं. पण पुढे होऊन त्यांच्याशी चार शब्द बोलावेत असे कधीच वाटलं नाही. ते नेहमीच आजारी-आजारी वाटायचे. वरं, माझं म्हणून तेव्हाचं जे समाजवादी मित्रमंडळ होतं. त्यांचा 'मफलरवाले क्षीरसागर' ह्या चेष्टेचा नि उपेक्षेचा विषय होता. व्यक्तिगत गाठीभेटीत नेहमी प्रकृतीची किरकिर सांगणारा पुस्तकी माणूस अशी त्यांची काहीशी चम-त्कारिक प्रतिमा माझ्या मित्रमंडळींत तयारी झाली होती. मला दुरून वाटे की हा माणूस प्रत्येक गोष्टीचा निष्कारण बाऊ करत असतो. एका बाजूने त्यांचे सदरा-व्यतिरिक्त अन्य लेखन फार फार प्रिय असे, नि दुसऱ्या बाजूने त्यांच्याशी व्यक्तिगत संपर्क साधण्याची गरज भासत नसे. शिवाय आमच्यात एका पिढीचं अंतर होतंच.

फक्त एकच माणूस मला असा भेटला, की जो क्षीरसागरांबद्दल अती जिव्हाळ्याने बोले, क्षीरसागरांच्या आत आत दडून बसलेल्या प्रेमाच्या भुकेल्या जीवाबद्दल फार आदरपूर्वक बोले. तो म्हणजे, आकाशवाणीचे तेव्हाचे अधिकारी श्री. मधुकर बांकर. पुण्यात क्षीरसागरांना आकाशवाणीवरल्या भाषणांसाठी मोटर पाठविण्याचा उमदा पायंडा ह्या बांकरसाहेबांनी पाडला. त्यांचं मानधन वाढावं म्हणजेच पंचविसाचं चाळीस व्हावं, म्हणून बांकरांनीच वर्षानुवर्षं खटपट केली. हे बांकर साहित्यातले कुणीही नव्हेत आणि श्री. के. क्षीं. च्या शेजारच्या आसनावर बसण्याची ज्यांची छदाम लायकी नाही त्या कुडमुड्या लेखकांनी मात्र त्यांची सतत हेटाळणी केली ! हेच क्षीरसागर 'मौज–सत्यकथा 'कडे वळते तर त्यांची कुचेष्टा करण्याची कुणाची प्राज्ञाच झाली नसती. क्षीरसागरांच्या नि भागवत बंधूंच्या पत्रिका का जुळल्या नाहीत देव जाणे.

दरम्यानच्या काळात मी आकाशवाणीच्या मुंबई केंद्रावर वाङ्मयविभागाचा सादरकर्ता झालो, तेव्हा किल्ल्या माझ्याच कनवटीला आल्या. मग मी खास आमच्या मुंबई केंद्रासाठी त्यांच्या भाषणांची ध्वनिमुद्रिते पुणे केंद्राकडून अगत्याने मागवू लागलो. त्यानिमित्ताने श्री. के. क्षीं. च्या सुवाच्य अक्षरातल्या कार्डांची ये–जा झाली. मी संतोष पावलो. एकदा त्यांना लिहिले, 'तुम्ही आमच्यासाठी इक्बालवर किंवा राजकवी तांब्यांवर बोला.' त्यांनी तयारी केली. माझ्याशी फोनवर प्रेमाने बोलले. म्हणाले, 'भाषण तयार आहे.' मी विचारलं, कुठून बोलता आपण ? तर उत्तरले, 'मुंबईत आलो आहे. घाटकोपरला पुतण्याकडे उतरलो आहे.' मला फार आनंद झाला. म्हटलं, 'मग तावडतोब निघून या. मीच तुमचं ध्वनिमुद्रण करेन. वाट बघतो.' तर उत्तरले, 'रेडिओची गाडी पाठवा. रेडिओच्या कामासाठी रेडिओचंच वाहन वापरायचं अशी माझी रीत आहे. पुण्याला माझ्यासाठी नेहमी गाडी येते.'

बांधा आला. पुण्यात अंतरं कमी असतात. मुंबईत अंतर अवाढव्य नि वाहनं कमी. तेव्हा इतक्या लांब गाडी पाठवता येणार नाही असं सांगितलं. त्यांनी थोडंसं आर्ग्युमेन्ट वगैरे केलं. पण घाटकोपरपर्यंत गाडी पिटाळणं मला शक्य झालंच नाही. तो एक येऊ घातलेला भेटीचा सुंदर योगही हुकला. मी हळहळलो.

नंतर बातमीच कोसळली : श्री. के. क्षी. अकस्मात गेले !

आता विचार करताना वाटतं की एकदाही भेट न झालेल्या क्षीरसागरांनी पडद्याआड उभं राहून मला लेखनविद्येच्या बैठकीसाठी खूप काही दिलं आहे. हे 'खूप काही' खुद्द त्यांच्या जीवनविहारातच दिसतं.

क्षीरसागरांनी लेखन, वाचन, मनन, चिंतन यांना अवघा जन्म अर्पण केला. शंभरात एखाद्याच कुलवंताला जमू जाणे अशी पंडिती परंपरेतली गुणी ग्रंथसंपदा

मागे ठेवली, त्यांनी अनेकांकडून अपमान सोसले. मात्र कुणालाही कधीही अपमानित केलं नाही. उच्च मल्यांचा सन्मान केला. औदार्याची पाठराखण केली. पुण्यात हयात काढली. पुण्याला जिव्हाळ्याचे प्रेम दिलं आणि असं करताना इंदूर, ग्वाल्हेर भोपाळ, हैदराबाद वगैरे दूरदेशी पसरलेल्या मराठी बांधवांबद्दल सतत जागरूक कळवळा वाळगला. त्यांची अखेरपर्यंत आठवण ठेवली. सुख, समाधान आणि आनंद ह्यांतला सूक्ष्म फरक क्षीरसागरांनी जाणला. मरणोत्तर जीवनाची आकांक्षा धरली. त्या दिशेने लेखणी चालवली. पूर्णत्वाची ओढ धरली. कायम आशावादच सांगितला तसाच तो आचरणातही आणला आणि ज्यांनी आपल्यावर प्रेम केलं त्यांच्या प्रेमाला आपण अपात्र ठरलो नाही, असं कृतज्ञतापूर्वक लिहून ठेवलं. दैवाची शक्ती जन्मभर मानली आणि न कुरकुरता दैवगतीला नम्रपणे सामोरे गेले. आणखी काय हवं ?

माझ्या उमेदवारीच्या काळात, थोरो म्हणतो त्याप्रमाणे, माझ्या अंतरी लेखनविषयक खूप स्वप्नाळू कल्पना होत्या, भयंकर भ्रम होते. ते सगळं गंगेला मिळालं. आता मी भानावर आलो आहे. लेखनप्रवास निर्वेध चालू आहे. हा नाही तर तो किनारा मला दिसणारच. आता माझ्या विचारसृष्टीत शिष्ट समीक्षकांना तीळमात्र जागा नाही. कुणाच्याही खुपीकरणाला थारा नाही. आता मी आनंदासाठी वाचतो, जमेल तेवढं आनंदासाठी लिहितो आणि आनंदासाठीच भटकत भटकत जगतो. ह्या शांत वाटचालीत मला अचानक क्षीरसागरांचं अखंड अध्ययन आठवतं. त्यांच प्रवळ लेखन सातत्य आठवतं. त्यांनी लेखनात ओतलेला जीव आठवतो. त्यांचा मूल्यविवेक आठवतो. लेखणीच्या बळावर त्यांना लाभलेलं चहात्यांचं प्रेम आठवतं. अर्पणोत्सुक प्रियजनांचा त्यांना झालेला दैवी लाभ आठवतो आणि मला धीर येतो. डॉ. केतकरांकडून त्यांच्याकडे वळलेला त्यांचा अखंड आशावाद आठवतो. आशावादाचा तो झुळझुळ झरा माझं चित्त टवटवीत ठेवतो. त्यामुळे लेखन करताना मला निर्मळ नि प्रसन्न वाटतं.

श्री. के. क्षीं. चे माझ्यावर अनंत उपकार आहेत.

जयविजय सोसायटी (६)
हनुमान लेन, विलेपार्ले पूर्व
मुंबई ४०० ०५७

# माझा हरवलेला कविमित्र–अरुण नाईक

श्रीरंग विष्णू जोशी

---

सुमारे तीस वर्षांपूर्वी नोकरीच्या निमित्ताने अन्नोदकाचा ऋणानुबंध काही काळ मुंबई बेटाशी जोडला गेला. भविष्याविषयीचे अपार कुतूहल आणि कविते-विषयीचा उदंड उत्साह यांनी मनाची शिडे तुडुंब भरलेली. खेडेगावातली जागी होणारी प्रसन्न सकाळ, राऊळातल्या घंटांचा मंदावत जाणारा पहाटनाद, शेजारून पाझरत येणारी मडकी थापटणाऱ्या कुंभारांच्या भसाड्या आवाजातील पुरंदर-दासांची विठ्ठलगाणी, आणि भल्या सकाळी 'पत्री तगोरी' म्हणून बेल घेऊन येणाऱ्या वीरय्या स्वामीची साखरझोपेत जाणवणारी महादेवचाहूल, अशा अनेक संस्कारांच्या पाणंद वाटेवरची आईची आभाळमाया आणि वडिलांचे संत आणि पंत कवींविषयीचे अपार प्रेम यांची शिदोरी सांगाती असूनही मी मुंबईच्या गर्दीत काही काळ गुदमरून गेलो. कदाचित या संस्कारामुळेच वाळूत पडलेल्या मासोळी-सारखी माझी अवस्था झाली असावी. वर्षभराच्या अगोचर वास्तव्यानंतर मुंबईची विनचेहऱ्याची गर्दी, मनस्वी उकाडा, धो धो पाऊस, ट्रामचा खडखडाट यांना मी चांगलाच सरावलो आणि डोळे उघडून आजूबाजूला पाहू लागलो. हळूहळू ठाकूरद्वारचे मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालय, वीणा व दीपलक्ष्मी मासिकांची कार्यालये इकडेही अधूनमधून जाऊ लागलो. आचार्य अत्र्यांचा दै. 'मराठा' गर्जना करू लागला की, मंत्रिमंडळाच्या काळजाचासुद्धा थरकाप उडावा असे ते मंतरलेले दिवस. अत्र्यांच्या लेखणीमधून जणू महाराष्ट्राची अस्मिताच बोलत होती असा तो काळ. पण अशा रणधुमाळीच्या दिवसांतही, युद्धक्षेत्राच्या दग्ध भूमीवर पक्षिणीने संसार थाटावा त्याप्रमाणे, रविवारच्या 'मराठा' मधून कवितांचे सदर प्रसिद्ध होत असे. त्या सदरामधूनही क्वचित कधी कविता लिहिल्याचे स्मरते. त्याच सुमारास पुण्याच्या 'साधना', 'तरुण भारत' वगैरे नियतकालिकांमधूनही माझ्या कविता प्रसिद्ध होऊ लागल्या.



अनुक्रमणिका

तथापि मुंबईच्या तीन वर्षांच्या वास्तव्यात कुठल्याही कवीशी किंवा साहित्यिकाशी प्रत्यक्ष परिचय होण्याचा योग मात्र जुळून आला नाही. एकदा तर आचार्य अत्रे यांना भेटण्यासाठी अगदी शिवशक्तीपर्यंत गेलो. पण आत जाण्याचे धाडसच झाले नाही. दरवाज्यासमोरूनच मी माघारी वळलो. 'वीणा' मासिकाच्या उमाकान्त ठोमरे व श्रीकृष्ण घोटगे या संपादकद्वयांशी मात्र अंतरीच्या काही खुणा पटल्या. आणि टेकीला आलेल्या लाकडी जिन्याच्या पायऱ्या सांभाळून चढत गिरगाव रोडवरील त्या मासिकाच्या कार्यालयात एखाद्या शनिवारच्या दुपारी किंवा रविवारच्या सकाळी मी जाऊ लागलो. त्या ठिकाणीच एकदा मधु मंगेश कर्णिक यांना पाहिल्याचे स्मरते. 'माझ्या मनाच्या पाकळ्या मोजून घे' किंवा "रोज आपोआप मी झंकारतो' या कवी सुरेश भटांच्या वेगळ्या वाणाच्या ओळी कविमित्र श्रीकांत पुरोहित यांजकडून ऐकताना अंगावर सरसरून रोमांच उभे राहत. गोखले कॉलेजमधील सहाध्यायी कविमित्र श्याम कुकर्णी याच्याशी होणाऱ्या पत्रव्यवहाराच्या माध्यमातून अनेकदा 'ओव्हन, फ्रेश' कवितांची देवाण-घेवाण होत असे. त्याच्या पत्रातील एका विफल प्रेमकवितेच्या काही ओळी सरातील ओघळणाऱ्या पाणीदार मोत्यांप्रमाणे अजूनही आठवणीत घरंगळत राहतात.

> आज अचानक आले कसे डवरून मेघ
> वर उसळून आला माझा चातकी आवेग,
> ...गप्पा रंगल्या अंधारी, वातावरण भारले
> तुझ्या शब्द-किरणांनी माझे काळीज चिरले,
> मी न ओळखिले गीत तुझ्या ओठी दडलेले
> झटलो ना काढायाला शल्य तुझ्या उरातले,
> ...त्यात आता रात्र थोडी, किती लांबवावी स्वप्ने
> ज्यांची फलश्रुती आता फक्त भंगणे...विरणे !

गिरगाव चौपाटीवर उसळणाऱ्या आणि भंगून विरत जाणाऱ्या सागरलाटांच्या सहवासात या कवितेच्या ओळी आठवून मन अधिकच विकल, उद्ध्वस्त होत असे.

काय एकेक योग असतो बघा. मुंबापुरीच्या जगड्व्याळ यंत्रातून आता आपली सुटका होणे कठीण, म्हणून मी हताश झालो होतो. पण एखादे अनामिक नक्षत्र आयुष्याचा पट घडीभर उजळून जाते आणि साराच मोहरा फिरून जातो. कोल्हापुरास बदली मिळावी म्हणून मी अर्ज केला होता तेव्हा सांगलीस ऋणानुबंध जोडला जाण्याची शक्यता निर्माण झाली. म्हटलं ठीक आहे, सांगली तर सांगली. नाहीतरी कोल्हापूरची पंचगंगा पुढे सांगलीच्या कृष्णेलाच मिळते ना !

बासष्टच्या मे महिन्याच्या प्रारंभी मी सांगलीत पाऊल टाकले आणि एका विझत चाललेल्या संस्कृतीचे ओघळणारे उपरणे कसेवसे सावरणाऱ्या भूतपूर्व

संस्थानाचे रंगरूप बघून अंतरात मी कुठेतरी सुखावलो. विटलेल्या धावळच्या नेसणारे पुरुष आणि लाल आलवणावर शाल पांघरून देवदर्शनाला जाणाऱ्या स्त्रिया हे दृश्य माझ्या बालपणी कोल्हापूर संस्थानातील कापशी जहागिरीत मी जवळून न्याहाळले होते. त्यामुळे सांगलीत आल्या दिवसापासूनच या नगरीविषयी एक अनामिक आत्मीयता वाटू लागली.

सांगलीत येऊन दोन आठवडे झाले असतील, नसतील, सकाळी हरभट रोडवरून जाताना भावे नाट्यमंदिराजवळ 'कविसंमेलना'चा फलक लावलेला दिसला. हे संमेलन आचार्य अत्रे यांच्या उपस्थितीत होणार असल्याचे वाचून तर मन थरारून गेले. म्हणजे जे मुंबईत असतानासुद्धा जमले नाही ते इथे सांगलीत जुळून येणार तर. कदाचित अत्र्यांच्या ओळखीचा योग जुळून येणे शक्य होते. पण एक मन म्हणत होते की आचार्य अत्र्यांसारख्या साहित्यसम्राटाची ओळख झाली तरी त्याचा उपयोग काय ? साहित्यनिर्मितीची वाटचाल हा सर्वस्वी एकाकी आणि एकट्यानेच करावयाचा प्रवास असतो.

बहुधा रविवारची सकाळ असावी. नऊ वाजलेले. भावे नाट्य मंदिर श्रोत्यांनी फुलून गेलेले. अत्र्यांच्या उपस्थितीमुळे श्रोते कविसंमेलनाच्या आधीपासूनच जागा अडवून बसलेले. भावे नाट्यमंदिराचा रंगमंच म्हणजे साक्षात रंगदेवतेचे वरदान लाभलेली वास्तू आहे. या नाट्यमंदिरात अगदी अखेरच्या मागील श्रोत्यासही पाहणे आणि ऐकणे यातील ब्रह्मानंद सहजपणे लुटता येतो. एकेक कवी माईकजवळ येत होता आणि आपली कविता सादर करून जात होता. अत्र्यांचे तिकडे बहुधा लक्षच नसावे. रंगमंचावरच कुणाशीतरी हळू मोठ्या आवाजात गप्पा मारण्यात ते रंगून गेले होते. कविसंमेलनात अनेकदा मॉब सायकॉलॉजी काम करीत असते. त्यामुळे 'तशी' कविता सादर केल्याखेरीज प्रतिसाद मिळणे कठीण असते.

आता माईकवरून नाव पुकारले गेले, 'अरुण नाईक.' आणि पंचविशीतला, नेहरू शर्ट–पायजमा अशा परिवेषातला एक तरुण जणू रंगमंच केवळ आपल्यासाठीच आहे अशा थाटात रुबाबदार पावले टाकीत एखाद्या नटाच्या सहजतेने माईकजवळ आला आणि माईकशी योग्य अंतर राखून श्रोत्यांकडे आत्मविश्वासाने पाहत कविता वाचू लागला :

> ढगांच्या मेण्यातून उतरलीस टाकीत थेंबांची पावले
> तुडव तुडव माझे काळ्या मातीचे काळीज, किती पसरू तुजपुढे ?

गप्पात रंगलेल्या अत्र्यांनी चमकून त्या तरुण कवीकडे नजर टाकली. एखाद्या नानासाहेब फाटकांच्या जातकुळीतला घनगंभीर, नितळ, कमांडिंग व्हॉईस, किंचित वरच्या टिपेत बोलके दरबारी हातवारे करीत कविता सादर करीत होता.

"आणि विजेचे ओठ माझ्या ओठांना भिडवता
कुणी नेले तुला दरदर ओढीत,
कडाडला आणि पिचला तुझा चुडा
मनात माझ्या रुतल्या काचा...काचा !"

आणि घडीभर पॉज घेऊन थिएटरमधील शांततेवर आंतरिक उमाळयात न्हाऊन निघालेल्या अखेरच्या ओळी लेण्याप्रमाणे कोरल्या गेल्या :

'तुझ्या ढगांचा मेणा सोनेरी होऊ दे
माझ्या काळचा मातीवर त्याची सावली पडू दे !'

आणि श्रोत्यांमधून टाळयांची वीज कडाडली. कवीने दरबारी रीतीने श्रोत्यांना जणू लवून मुजरा केला आणि ऐटदार वळण घेऊन तो श्रोत्यांना पाठमोरा झाला.

मला राहवले नाही. कवितेच्या थेंबा–थेंबातला थरार अजून माझ्या तनमनाला रोमांचित करीत होता. मी सभागृहातून उठलो व धावतच रंगमंचामागे गेलो. कवीचा हात हातात घेत भारल्या आवाजात पुटपुटलो, "नाईक, अभिनंदन ! अरे, लाजवाब !" आणि तवकातल्या बहुमोल नजराण्यावर सहज तृप्त नजर टाकावी तसे मनापासून कवी हसत राहिला.

अरुण नाईकची आणि माझी पहिली भेट झाली ती अशी. त्या घडीपासून आमच्या आंतरिक स्नेहाचा मेणा सोनेरी झाला आहे !

आणि त्यानंतर आम्ही अधून मधून भेटू लागलो. नाईकच्या स्वप्नाळू वृत्तीत कविता जुन्या मधासारखी मुरलेली असली तरी रानावनातल्या आणि दऱ्याकपारीतल्या फुलांना शोधत भटकणाऱ्या मधमाश्यांच्या पंखातली वणवण त्याच्या शब्दाशब्दांतून जाणवते. जुन्या स्टेशनरोडवरून लगबगीने मी निघालो असताना आपल्या अतिथिगृहाच्या दरवाज्यातून नाईक मला हात हालवून खुणावत असे तर कधी तशा घाईतही जवळ येऊन भररस्त्यात कवितेतली एखादी चमकदार ओळ किंवा एखादी छोटीशी कविताच सुनवीत असे. एकदा असाच निघालो असताना उजव्या हाताच्या मधल्या बोटावर अर्धवट अंगठा ठेवून नाईक भारल्या आवाजात म्हणाला, "कविराज ऐका, फक्त चार ओळी :

"तुझे डोळे गायक आहेत
नजरेची एकतारी आहे
पापण्यांच्या चिपळया आहेत
स्रवणारा अश्रू अभंग आहे !"

भान हरपून मी ओरडलोच "अरे, क्या बात है !" माझ्या ओरडण्याने जवळून जाणारी माणसे टकमक बघत निघून गेली तर समोरासमोर उभे असलेले पुतळ्यातले गांधी आणि नेहरू आमच्याकडे बघून मिस्किल हसत असावेत ! नाईक पुढे उद्‌गारला. "आता आणखीन दोनच ओळी."

"काखेतल्या कळशीत
राधेच्या स्तनाचे प्रतिबिंब पडले
आणि
पाणी दूध झाले !"

आणि माझ्या तोंडून शब्दच फुटेना. असा शृंगाराचा उंच उंच झोका घेता घेतानाच दुसऱ्या दिशेने वात्सल्याच्या डहाळीला अमृतस्पर्श करणारी नाईकची कविता ऐकून मद्याची कटयार काळजात घुसावी तसा मी विव्हल झालो.

नाईक हा दिलदार मनाचा स्वप्नाळू कवी असला तरी स्वतःच्याच कौतुकात हरवून जाणे हे त्याच्या स्वभावात नाही. 'पिकलेल्या पानाचाही देठ कधी हिरवागार' वृद्ध राजा भाळला हो कोण्या मत्स्यगंधेवर' या माझ्या कवितेच्या आरंभीच्या ओळी जणू आपण प्रथमच ऐकल्या आहेत अशा थाटात तो मलाच पुनःपुन्हा ऐकवतो आणि खुषीच्या कैक मोहरा उधळीत राहतो.

एकदा कृष्णेच्या काठावरून भटकत असताना वाहत्या पाण्यावर लाटेची वेलांटी उमटावी तसे नाईक बोलून गेला :

"पाणी भरून
पाण्यातून चाललीस
उडवित पावलांनी
पाणी पाणी,
कटिवरल्या कळशीत
घुटमळते पाणी !"

वाहत्या पाण्याची आनंदलय अशी गात्रागात्रांत भरून पाणी उडवीत जाणारी एखादी नाचऱ्या पावलाची तरुणी कविता वाचताना घशाला कोरड पडू लागते यातील रहस्य काय बरे असावे ?

स्वप्नात वावरणाऱ्या एखाद्या मनस्वी माणसाने आपला स्वप्नाळूपणा गूढ मधुर स्वप्निल शब्दकळेच्या माध्यमातून व्यक्त करावा असेच काहीसे नाईकच्या कवितेचे स्वरूप वाटते. ही कविता एका अंगाने खलिल जिब्रानप्रमाणे स्वतःला बेबंदपणे उधळून टाकते तर दुसऱ्या अंगाने रवींद्रनाथ टागोरांच्या तत्वचिंतनाने गहनगूढ झालेल्या सौंदर्यसंप्रदायी कोवळचापणाला पालाण घालते. बुरख्यातले

सौंदर्य जिब्रानला कदाचित अधिक वेधक वाटत असेल, पण नाईकची धीट कविता बुरख्याचा परकेपणा ओघळून टाकते. चार रसीले तरुण डोळे विवस्त्र धिटाव्याने एकमेकांना भिडताना आव्हान–प्रतिआव्हानाची धुंद भाषा पेरीत जावेत त्याप्रमाणे त्याच्या प्रतिमात मागे फिरवून टाकण्याचे सामर्थ्य दडलेले जाणवते. गाठ सुटलेल्या काचोळीवर झिरझिरता गुलाबी पदर घालणारी पहाट, तुझ्या ओठांच्या लाल ज्वालात माझ्या जिव्हेने केलेला जोहार, मेलेल्या दुधावर कातडी थडगी उभारणारे कुंतीचे स्तनयुग्म, छातीतल्या तीव्र इच्छेच्या बेगुमान धडकांनी गोचर होणारे टचटचीत स्तन, सखीच्या कुरळया केसांना झोपाळे बांधून झोका घेणारे पहाटवारे, तुझ्या चुंबनाचे रंग आकाशात उधळून हसणारे क्षितिज, प्रेतावरच्या शुभ्र वस्त्राला चुंबणारा आकाशीचा चंद्र, डाळिंबीच्या डहाळीला पडू लागणारी–तुझ्या कोरीव स्तनांची स्वप्ने, जीवन हे आत्म्याचे संगीत आणि शरीर हे आत्म्यावरचे भाष्य, बुंध्याविना व फांद्याविना जलपुष्पांचा वर्षाव करणारा वृक्ष, आत्महत्येचे आमंत्रण देणारी चमकती धारदार चंद्रकोर अशा कैक प्रतिमांच्या विजा चांदण्या रात्रीच्या निरभ्र आकाशामधून त्याच्या कवितांत लखलखत राहतात.

कै. श्री. के. क्षीरसागर सांगलीच्या मुक्कामात अनेकदा नाईकच्या विजय लॉजमध्ये संध्याकाळी गप्पा मारायला येत. नाईकच्या कवितेसंदर्भात त्यांचा अभिप्राय नेमका वाटावा. ते लिहितात : नाईक ह्यांच्या वृत्तीत मुख्यतः स्वप्नाळूपणा आहे. एखादे गूढमधुर स्वप्न शब्दात व्यक्त करावे, अशी त्यांची धडपड असते. कित्येक स्वप्नरूप कविता या दृष्टीने नाजूक आणि सुंदर आहेत. विशेषतः तरुण मनाला तर त्या वेडावून टाकतील.

कवी म्हणून नाईकशी मित्रत्वाचे ऋणानुबंध दृढ होत असतानाच तो जीवनाला विविध अंगांनी आणि अनेक रंगांनी भिडत होता. नाईकचा पिंड कवीचा आहे. तो नाटककार आहे. पट्टीचा नट आहे. वादळ उठविणारा पत्रकार आहे. मराठी सिनेसृष्टीतला हीरो आहे. भालजी पेंढारकरांचे संस्कार झालेला कलावंत आहे. बैठक रंगविणारा, रसाळ गप्पिष्ट असला तरी अनेकदा बैठकींच्या केन्द्रस्थानी तो स्वतःच असतो. 'श्रीमंत' या नाटकांत तर त्याच्या भूमिकेने महाराष्ट्र शासनाचे रौप्यपदक पटकाविले आहे. भालजींच्या 'मराठा तितुका मेळवावा' या चित्रपटातील त्याची भूमिका वेधक ठरली. आणि नंतर 'रंगू बाजारला जाते' या चित्रपटात, मला वाटते तो हीरो म्हणून चमकला. नाईकच्या अंगात अभिनय जन्मजात आहे. साध्या लोखंडी खुर्चीवर बसतानादेखील तो राजसिंहासनावर बसल्याचा रुबाब दाखवील. बोलण्यातली आदब, विचारातून जाणवणारा फ्लॅश आणि आवाजातील खणखणीत रेखीवपणा यांनी त्याच्या संभाषणाला एक वेगळेच लालित्य प्राप्त होते. 'कृष्णाकाठ' म्हणून साप्ताहिक काढणारा नाईक जीवनाच्या

कुठल्याच मार्गावर स्थिरपद होऊ नये याचे आश्चर्य वाटते. एखादी गोष्ट जीव ओतून मनापासून करीत असतानाच त्या गोष्टीविषयीच्या दुस्वासाची बीजे वाऱ्यावरून वाहत येत त्याच्या मनात सांडत राहतात.

तथापि कविता लिहिणें त्याने सुमारे दीड तपापूर्वीच सोडले असले तरी त्याचे कवितेशी नाते अतूट आहे 'आईची कविता' या माझ्या पुस्तकाचे त्याने उदंड कौतुक केले. पण शब्द देऊनही तो प्रकाशन समारंभास उपस्थित राहिला नाही याबद्दल मी त्याच्यावर खूप रागावलो. पण ते तेवढ्यापुरतेच. "द्या की राव सणसणीत चार शिव्या आणि काढा मोडीत आता राग!" तो हसत म्हणाला. आता यावर म्या पामरे काय बोलावे?

१९६० च्या आसपास बेबंदशाही नाटकाचा प्रयोग भावे नाट्यमंदिरात होता. पहिल्या प्रवेशात चित्तरंजन कोल्हटकरांनी बाजी मारलेली. पडद्यामागे चिरूट ओढीत बसलेल्या नानासाहेब फाटकांना नाईक बोलून गेला, 'साहेब आपल्या कामात रंग नाही भरला!' नानासाहेबांनी धुराचा ढग बाहेर सोडला आणि ते प्रसन्न चित्ताने म्हणाले, "अरे, तुझा आवाज चांगला आहे हं. आता पुढचा प्रवेश बघ!" नंतर आणखी एक ढग!

पुरुषी ढंगदार आवाजाचे हे खणखणीत लेणे नाईकच्या व्यक्तिमत्त्वाचे विलोभनीय वैशिष्टय आहे. सांप्रत त्याने एक नवाच उद्योग सुरू केला आहे सधन बागाईतदार, साखर कारखानदार, बडी व्यापारी मंडळी, जिल्ह्यात येणारे मंत्री यांच्याकडे काही कार्यक्रम, लग्नसमारंभ असला की कार्यक्रमाचे संपूर्ण आयोजन माईकवरून नाईकच्या आवाजात सादर केले जाते. सादरीकरणाची केवळ बिदागी दोन-अडीचशेच्या घरात जाते!

भावे नाट्यमंदिराच्या निवांत मोकळ्या परिसरात चंद्रप्रकाशात किंवा कृष्ण पक्षातील चांदण्यांच्या सोबतीने आमच्या गप्पा मस्त रंगतात. नाईक एकदा भावविवश होऊन बोलला, 'कविराज, नानासाहेबांच्या आवाजाची जातकुळी सांगायला शरम वाटते बघा. गणिका शील विकतात आणि मी विकतोय आवाज. केवळ चांदीच्या चार तुकड्यांसाठी! शरम वाटते राजे, शरम वाटते!' नाईक अधिकच हळवा झाला होता. त्याने आपला चेहरा माझ्यापासून थोडा तिरपा केला. रंगभूमीवर सम्राटाच्या आविर्भावात मिरविणारा नाईक कविमित्रापासून लक्तरे सावरून घेताना भरून आल्यागत वाटत होता. पुढे एक शब्द न बोलता आम्ही उठलो. नाईकच्या पाठमोऱ्या आकृतीकडे मी वळून पाहिले. दग्ध भूमीवरून परतणाऱ्या पराभूत राजाची मिणमिणती आठव मला अधिकच अस्वस्थ करीत होती.

C/o एल. आय. सी. ऑफ. इंडिया
ब्रँच ऑफिस सांगली.



अनुक्रमणिका






# ल्युसी

## डॉ. स. ग. यादव

---

ल्युसी !

बरोबर सहा वर्षांपूर्वी भेटली ब्लड कॅन्सरसारखी साऱ्या आयुष्यात पसरून राहिली ! आता जमाखर्च मांडताना हिशेबच जमत नाही. कुणाचं चुकलं तेच कळत नाही. येणारा दिवस आणि प्रसंग फक्त 'झेलत राहायचं' असंच मनोमन ठरवलंय !

परत परत आठवत राहातो तिची आणि माझी पहिली भेट !!

१९८२ साली मी जतच्या माळावरून बदलून कोल्हापुरास आलो होतो. कोल्हापूर–सांगलीची लेखन करणारी मंडळी भवताली होती. पण एकत्र यायला त्यांना व्यासपीठ नव्हतं. शाहूचरित्रकार कृ. गो. सूर्यवंशी, प्रा. नलगे, शंकर खंड पाटील वगैरे आम्ही एकत्र आलो. कोल्हापूर शहरासाठी, कोल्हापूर जिल्हा साहित्य सभा व चार जिल्हयांसाठी दक्षिण महाराष्ट्र साहित्य सभा, स्थापन केली. सभांची दखल चार-पाच जिल्ह्यांतील नव्या-जुन्या साहित्यिकांनीच घेतली असे नाही तर सोबतकार ग. वा. बेहरे, राजेंद्र बनहट्टी, श्री. ज. जोशी यांनी अप्रत्यक्ष हजर राहून आशीर्वाद दिले.

याच काळात दक्षिण महाराष्ट्राचे वेगळे साहित्य संमेलन घ्यायचे ठरले. आम्हा चौघांपैकी प्रत्येकजण जाईल तेथे या वेगळया चळवळीसंदर्भात बोलत राहायचा.

सांगली जिल्ह्यातील एका तालुक्याच्या ठिकाणी चिमुकले साहित्य संमेलन, एक दिवसाचे भरले होते. त्याच्या शेजारील एका खेडयात माझे व्याख्यान होते. जाता जाता या संमेलनात थांबावे आणि पुढे व्याख्यानास निघून जावे म्हणून मी

बाहेर पडलो. संमेलनाची गर्दी ओसंडत होती. एवढ्यात कुणीतरी सोनचाफ्याचं फूल देऊन माझं स्वागत केलं. ती ल्युसी होती.

संयोजकांनी तिची ओळख करून दिली व मी एका प्रकाशित होणाऱ्या पुस्तकावर बोलावं असं त्यांनी सुचविलं. माझं व्याख्यान ५–६ मैलांवर होतं. त्याची वेळ झाली होती, म्हणून मी दहा मिनिटंच बोललो, सारे विसरून व्याख्यानास गेलो.

दुसऱ्या दिवसापासून परत शिकवणं सुरू झालं. चार दिवसांनी मोत्यांच्या अक्षराचं एक पत्र आलं. त्यात मी करून दिलेल्या पुस्तकाच्या परिचयाची स्तुती होती. सोबत ल्युसीनं स्वतः काढलेलं एक चित्र होतं.

पण मी ते पत्र, ते चित्र कधीच विसरून गेलो. गावोगावी व्याख्यानांसाठी भटकत राहिलो. दरम्यान आंबेडकरांच्या जीवनावर तिच्याच गावी माझं व्याख्यान ठेवलं गेलं.

दुपारी दोन वाजता सुरू होणारं व्याख्यान रात्री ११ वाजता सुरू झालं. मी तर खूप कंटाळलो होतो. त्यामुळे वीस मिनिटांत मी काहीतरी बोललो आणि कोल्हापुरास निघून गेलो. त्या व्याख्यानास ल्युसी आणि तिच्या घरची सर्व मंडळी हजर होती.

परत पाच-सहा दिवसांनी तिचं पत्र आलं, "तुम्ही एवढं भंकस बोलाल हे माहीत नव्हतं !" अशी संभावना होती.

मी हा अपमान पेलू शकत नव्हतो. पुढच्या व्याख्यानात हिचं मन जिंकायचं ही ईर्षा होती. त्यातच दक्षिण महाराष्ट्र साहित्य संमेलन भरलं. संयोजकांपैकी मी एक होतो. कार्यवाह होतो. ल्युसी–एक कवयित्री म्हणून या संमेलनास हजर होती ग्रामीण कथाकार ग. ल. ठोकळ अध्यक्ष होते. कविसंमेलनाच्या प्रमुख सरोजिनी बाबर होत्या. उद्घाटक यशवंतराव चव्हाण होते. मराठीत प्रमुख साहित्यिकांची उपस्थिती या पहिल्याच संमेलनात होती. याच काळात परत ल्युसी भेटली. अर्धा तास बोलत राहिली. माझी कादंबरी 'बाभळीची फुलं' कशी वेगळ्या पद्धतीनं लिहिता येईल ते सुचवून गेली. या अर्ध्या तासात कळून गेलं की, ती इंग्रजी घेऊन एम. ए. झाली आहे. तालुक्याच्या कॉलेजात लेक्चरर आहे. एम. पी. एस. सी., यू. पी. एस. सी. परीक्षेस बसणार आहे. मी तिला मराठी शिकवावं (परीक्षेपुरतं) ही तिची इच्छा !

या संमेलनाने मला एक मैत्रीण दिली त्यापेक्षा तिसरी सावली दिली.

मे महिना संपत आला. पुण्यात ती क्लास जॉइन करणार होती. मी तिथे भेटावं असं ठरलं. माझी ४–५ पुस्तकं प्रसिद्ध झाली होती. एका पुस्तकास शिवाजी

विद्यापीठाचा पुरस्कार मिळाला होता. तिच्या काही फुटकळ कविता स्त्री, किर्लोस्कर, प्रतिष्ठान इ. मासिकांत आल्या होत्या. तर काही मासिकांत तिची चित्रं प्रसिद्ध झाली होती. आकाशवाणीनं स्वतंत्रपणं तिचं काव्यवाचन आयोजित केलं होतं.

सुट्टीत मी पुण्याला गेलो. बालगंधर्वच्या बाहेर कट्टयावर परीक्षेस येणाऱ्या प्रश्नांची चर्चा केली. लक्षात आलं, हिला मायेची गरज आहे. ती दिली तर तिची कविता फुलेल– चित्रं आकार घेतील; एक स्त्री जिल्हाधिकारी होईल ! मी परिषदेच्या खोलीवर थांबलो, ती भावाकडे गेली, दुसऱ्या दिवशी भेटायचं ठरवून !

दुसऱ्या दिवशी काही बोलणं झालंच नाही. यू. पी. एस. सी. साठी तिनं पणजी केंद्र निवडलं होतं. मी बरोबर असावं अशी इच्छा होती. यावेळी आम्ही बरोबर प्रवास केला. प्रवासात ' पावसाची गाणी ' लिहिली. ती पुढे आकाशवाणी-वर दोघांनी वेगवेगळया वेळी सादर केली.

मनानं हळवी असणारी माणसं पटकन हसतात आणि मोडून जातात. ल्युसी त्यांपैकी ! सुवर्णपंखी राजहंसी असून स्वतःस न उमगलेली.

परीक्षा संपली, पुण्यातली एम. पी. एस. सी. चौही परीक्षा संपली. अजून आम्ही एकमेकांना भेटत होतो. हे कुणास माहीत नव्हतं.

दरम्यान मी एका खेड्यात प्राचार्य व्हायचं निश्चित केलं. ल्युसीला ; निर्णय आवडला नाही. माझ्यातला साहित्यिक प्रशासकीय खुर्चीत संपेल ही तिचं. भीती होती. पण मला प्राचार्य व्हायची खुमखुमी होती. मी स्वतः निर्णय घेऊन हजर झालो. त्याच दिवाळीत (१९८३) एका स्थानिक दिवाळी अंकात मी, ' त्या तिघांची गोष्ट ' ही कथा लिहिली आणि गुप्त असणारी ही मैत्री दोघांच्या घरात, या परिसरात झाली. तिच्या एका मैत्रिणीनं नाव न घालता, " तू कमला फडके-सारखं लग्न कर " असा सल्ला दिला. त्या मैत्रिणीला मी विवाहित असून दोन मुलांचा बाप आहे हे माहीत होतं. गोव्यात मी ल्युसीला तशी कल्पना दिली होती. आपल्या दोघांच्या वयात आठ वर्षे अंतर आहे. पण आपण मराठा या एकाच जातीचे आहोत !

आता मात्र तिला लिहिण्याचं वेड लागलं. तिनं कविता लिहावी, कवितेस योग्य चित्र काढावं, दोघांनी चर्चा करावी, कविता छापून यावी, एकत्र परत वाचावी. व. पु. काळे, श्रीराम बेडेकर, पुरुषोत्तम पाटील, इंदिरा संत यांची पत्रं यायची. ल्युसी परत नेटानं लिहायला लागायची.

एका नटीच्या जीवनावर माझी ' रिकामी घागर ' ही कादंबरी प्रसिद्ध झाली. ' तू डॉक्टर आहेस ! असलं फालतू लिहू नकोस !' अशी ल्युसीनं मल्ली-नाथी केली. ही कादंबरी मी तिलाच अर्पण केली होती.



अनुक्रमणिका

वाऱ्यासारखी तीन वर्षं निघून गेली. तीन-चार नवीन समीक्षा-ग्रंथ माझ्या नावावर आले. माझे नातेवाईक मला व तिला शिव्या घालत होते. मित्र निनावी पत्रे लिहीत होते.

अडीच वर्षं पूर्ण होताच मी प्राचार्यपदाचा राजीनामा दिला. पेण कॉलेजवर प्राचार्य म्हणून गेलो. याच काळात तिचा कवितासंग्रह तिच्या चित्र-मुखपृष्ठासह काढला. पण टीकेसाठी प्रकाशक म्हणून दुसऱ्याचं नाव घातलं.

आता निनावी पत्रं तिच्या घरी येऊ लागली. त्यांची भाषा घाणेरडी होती. एक पत्र तिच्याच एका सहकाऱ्यानं लिहिलं होतं. मी ते वाचले. दारू पिऊन तिच्या कॉलेजवर गेलो. माझी ती अवस्था पाहून आपण भेटायचं नाही, असा निर्णय घेतला! मीही चिडून भेटणार नाही, असं बोलून गेलो. तेव्हा ती म्हणाली, " तुम्ही माया दिली म्हणून मी राहिले. जिल्हाधिकारी म्हणून निवड होऊनही मी गेले नाही. कारण तुमचे प्रौढ हात समंजस होते. पण तुमच्या घराकडे येणारा पूल पाण्याचा होता."

या सहा वर्षांत हैद्राबाद, बंगलोर येथे प्रवास केला. तिनं लोकप्रभेतून लेख लिहिले. मी स्थानिक वृत्तपत्रात! मी व्यायाम करावा म्हणून तिनं पुस्तकं घ्यावी, मी ती दुसऱ्यास द्यावी, तिनं वैतागावं. मला इंग्रजी बोलता यावं म्हणून प्रयत्न करावा, मी मराठीचा खाक्या न सोडावा!!

मला मराठी भाषेतील डॉक्टरेट, पण तिनं शुद्धलेखनाच्या चुका काढाव्या माझ्या कवितासंग्रहाची रेखाचित्रे-मुखपृष्ठ हट्टानं काढावीत, यात एक गुंतलेपण होतं. कळीचं फूल झालं होतं.

आज मी चाळिशीत जाईन. ती तिशीत येईल! काव्यासाठी एकमेकांस जपत राहिलो. ल्युसीच्या संस्थेनं मैत्री सोडण्याची समज दिली. मी पुरता व्यसनी झालो. ती म्हणाली, " तुझा अनिल बर्वे होणार! ..."

तळमावले,<br>ता. पाटण, (जि. सातारा)



# ऋणानुबंध : जयवंत दळवी

**—रमेश मंत्री**

---

जयवंत दळवी यांचा आणि माझा परिचय २ फेब्रुवारी १९५८ पासून आहे. आपल्या अनेक मित्रांचा प्रथम परिचय केव्हा आणि कसा झाला याविषयी आपल्या स्मृती धूसर असतात, पण दळवींच्या बाबतीत सारे तारीखवार मला स्वच्छ आठवते. २ फेब्रुवारी १९५८ रोजी मी ' युसिस 'च्या मराठी विभागात नोकरीला लागलो. आमच्या विभागाचे प्रमुख श्री. शं. के. पेंडसे यांनी ' युसिस 'च्या प्रथे-प्रमाणे मला आपल्या बरोबर घेतले आणि कचेरीतल्या इतर कर्मचाऱ्यांचा परिचय करून दिला, त्यात दळवी होते. पूर्वी दळवीही मराठी विभागातच होते. पण नंतर ते पुस्तक विभागात गेले. त्यावेळी दळवी सकेशा होते. निळ्या डोळ्यांचा, गोरा-पान, गुबगुबीत असणारा हा तरुण खरोखरच कुणालाही आवडावा असाच होता. प्रथमदर्शनीच माझे त्यांच्याबद्दल फार चांगले मत झाले.

त्यानंतर दोन–चार दिवसांनी पेंडसे यांनी मला बाजूला नेऊन सांगितले, "" या जयवंत दळवीपासून तुम्ही जपून राहा. तो फार लबाड आणि कारस्थानी आहे. तो गोड बोलतो. पण ' मधु तिष्ठते जिव्हाग्रे हृदये तु हलाहलम् ' अशी त्याची वस्तुस्थिती आहे. तुमच्या नकळत तो कधी तुमचा पाय ओढून तुम्हाला खतम करील याचा तुम्हाला पत्ताही लागणार नाही." मला दळवींची काहीच माहिती नव्हती. ते थोडेफार लिहितात एवढेच माहीत होते. मलाही साहित्यात खूप रस असल्यामुळे ' युसिस 'मध्ये दळवींची मैत्री सुखद होईल अशा विचारात मी असतानाच पेंडसे यांनी हा बाँब टाकला. मी कोल्हापूरसारख्या लहान गावातून आलो होतो आणि थेट अमेरिकन सरकारसारख्या जागतिक बलवान कचेरीत नुकताच लागलो होतो. मुंबईसारख्या अफाट शहरातल्या डावपेचांना मी सर्वस्वी अनभिज्ञ होतो. मुंबईतील वरच्या वर्गातील लोकांशी माझा अजिबात कधी संबंध आला नव्हता. इतका, की ' युसिस 'च्या नोकरीसाठी केलेल्या अर्जात मला ओळखणाऱ्या तीन प्रतिष्ठित

व्यक्तींची नावे लिहायची होती, त्यांत मला मुंबईच्या एकाचेही नाव लिहिता आले नाही. अशा परिस्थितीत मला साहजिकच वाटले की, दळवींसारख्या कथित भयंकर माणसाशी आपण शक्यतो संबंध ठेवू नये.

अर्थात मी आणि पेंडसे यांच्यात जे संभाषण झाले, त्याची दळवींना काहीच कल्पना असणे शक्य नव्हते. ते आपल्या नेहमीच्या सहजपणे वागत होते. ते आमच्याच कचेरीत असले तरी मी सहाव्या आणि ते पाचव्या अशा वेगवेगळ्या मजल्यांवर होतो. त्यामुळे रोज भेट होत असेच असे नाही. चार–सहा दिवसांनी आम्ही समोरासमोर येत असू. तेव्हा ते सहज व मी जपून असे वागत असू.

पण कालांतराने मला पेंडसे यांच्याविषयी अधिक माहिती कळली आणि रोज सात तास सहवासात असल्याने त्यांच्या स्वभावातील खाचाखोचाही कळल्या. तेव्हा मला उमजले की पेंडसे हे संशयी, मत्सरी आणि असुरक्षित असे आहेत. असुरक्षित या शब्दाला दीर्घ इतिहास आहे, तो थोडक्यात सांगतो. पेंडसे हे पूर्वी ' लोकसत्ता ' दैनिकाचे संपादक होते आणि ह. रा. महाजनी हे त्यांचे साहाय्यक होते. एका दिवशी सकाळी अचानक पेंडसे यांचे नाव 'लोकसत्ता'चे संपादक म्हणून काढले गेले आणि त्या जागी ह. रा. महाजनी हे नाव आले. इतकेच नव्हे, तर त्याच दिवशी सकाळी ' इंडियन एक्स्प्रेस 'चे जनरल मॅनेजर हे पेंडसे यांच्या घरी गेले आणि त्यांना पगार व सर्व देणी देऊन नोकरीतून मुक्त केल्याची नोटीसही दिली. या घटनेचा पेंडसे यांच्यावर इतका दीर्घकालीन परिणाम झाला की, ते नंतर ' युसिस 'मध्ये नोकरीस लागले तरी त्यांना सतत असा संशय येत असे की, आपले साहाय्यक आपल्या विरुद्ध कारस्थान करून आपली जागा घेण्याचे कारस्थान करीत आहेत. या भयाने ते संभाव्य चढाओढ करणाऱ्यांना एकमेकांविरुद्ध काहीबाही सांगून त्यांची मने कलुषित करीत असत. त्यातूनच माझे दळवींच्या विरुद्ध मत व्हावे असा त्यांनी प्रयत्न केला.

पुढे मॅजिस्टिकचे केशव कोठावळे यांच्या गिरगावच्या कचेरीत आमचा साहित्यिक अड्डा जमू लागला. त्यात जयवंत दळवी, ज्ञानेश्वर नाडकर्णी, वसंत सरवटे, उमाकांत ठोंबरे, मधु मंगेश कर्णिक इत्यादी नवे लेखक– त्यावेळचे म्हणजे १९५९ च्या सुमाराचे–नवे लेखक–होते. त्यातूनच पुढे ' ललित ' मासिकाचा जन्म झाला. आम्ही अधून मधून परगावी सहलीही काढीत असू. श्री. ज. जोशी हे पुण्याचे असले तरी नोकरीच्या निमित्ताने तेव्हा मुंबईत होते, तेही आमच्या बरोबर असत. दळवींचा माझा जसजसा परिचय वाढू लागला, तसतसे त्यांचे निर्मळ व प्रसन्न व्यक्तिमत्त्व माझ्या अधिक जवळचे आणि आवडीचे होऊ लागले. विशेषतः सहलीत आम्ही दोघेही एकमेकांची छान खिल्ली उडवून मौज निर्माण करीत होतो. लेखक म्हणूनमात्र दळवी तेव्हा प्राथमिक अवस्थेत होते. ' एदिन ' हा त्यांचा कथासंग्रह किंवा ' उभा जन्म उन्हात ' हे नाटक त्याची उदाहरणे आहेत. अर्थात हे साहजिकच

होते. सुरुवातीस बहुधा प्रत्येक लेखक कच्चा व निश्चित मार्ग शोधण्याची धडपड करणाराच असतो. हळूहळू त्याचा विकास होतो, त्याला आपला सूर सापडतो आणि एकदा का साहित्यवारूवर त्याची मांड पक्की झाली की, त्याच्या प्रगतीची घोडदौड सुरू होते. वाचन, चिंतन, प्रतिभावंतांचा सहवास, स्वतंत्र प्रज्ञेचा विकास इत्यादीमुळे ही परिपक्वता येते. जयवंत दळवींच्या जीवनात माझ्या अंदाजाप्रमाणे 'चक्र' या कादंबरीबरोबर या परिपक्वतेच्या दिशेने जाण्याला सुरुवात झाली. पु. ल. देशपांडे यांची अशीच गोष्ट सांगता येईल. १९५० साली मी आणि पु. ल. एकदमच एम. ए. ला बसलो. काही काळ आम्ही एकत्र अभ्यासही केला. पण तेव्हा ते धडपडीच्याच अवस्थेत होते. पु. ल. इंग्लंडला गेले, तेथील नाट्यसृष्टी आणि विशेषत: एकपात्री प्रयोग त्यांनी पाहिले तेव्हा त्यांच्या जीवनाला वेगळे परिमाण येण्यास प्रारंभ झाला.

'चक्र' कादंबरीने दळवींना प्रसिद्धी व दर्जा दिला पण त्यातच समाधान न मानता ही आपल्यावरची अधिक जबाबदारीची संधी आहे म्हणून त्यांनी साहित्यात अधिक सखोल कार्य केले. या काळात त्यांचे व माझे स्नेहसंबंध सतत वर्धिष्णू होते. पण मध्येच काहीतरी बिनसले– काय ते मला आत्ता नक्की आठवत नाही आणि आम्ही इतके दुरावलो की, आमचा अबोला सुरू झाला. आम्हा उभयतांचे मित्र उमाकांत ठोमरे हे त्यामुळे आमच्यापेक्षाही अस्वस्थ झाले. आम्ही पुन्हा एकत्र यावे म्हणून प्रयत्न करू लागले. पण पाच-सहा महिने मी, दळवी एकाच कचेरीत असून एकमेकांशी बोलत नव्हतो. एकदा असे झाले की, एका नाटकाची निमंत्रणे आम्हाला आली. आम्हा दहा-बारा मित्रांच्या जागा जवळजवळच होत्या. त्यातही योगायोग असा की, माझी व दळवींची जागा अगदी एकमेकाला खेटून होती. त्यातही आणखी योगायोग म्हणजे दळवींचा क्रमांक ३७ होता आणि माझा होता ३६ ! मी त्या चमत्कारिक योगायोगाला उद्देशून ठोमरेंना म्हटले, "पाहा ! इथेही छत्तिसाचा आकडा !" त्यावर दळवी नेहमीच्या सहजतेने हसून म्हणाले, "छत्तिसाचा आकडा माझा नाही, तुमचा आहे !" तेव्हापासून आमचा अबोला संपला आणि पुन्हा आम्ही पूर्ववत् एकत्र येऊ लागलो.

एकदा आम्ही चार-सहा मित्र गप्पा मारीत असताना कोणीतरी म्हणाले, "अमुक एक लेखक फार प्रसिद्धिलोलुप आहे." दुसरा म्हणाला, "तो तमुक ना ? तो सारखा बायकांच्या सहवासाला हपापलेला असतो !" मात्र दळवींनी या निंदामय 'गॉसिप'ला आळा घालीत म्हटले, "आपण अशी लेबले चिकटवून त्या लोकांवर अन्याय करीत असतो. एखादा माणूस स्त्रियांच्या सहवासात जादा रस घेणारा असेलही. पण त्याचबरोबर तो सखोल अभ्यास करणाराही असतो. किंवा एखादा प्रसिद्धिलोलुप माणूस केवळ तसा नसतो तर त्याने खूपच समाजकार्यही केलेले असते. पण आपण मानवी जीवनाच्या या गुंतागुंतीच्या अवघड क्षेत्रात न शिरता

प्रत्येकाच्या कपाळावर काहीतरी लेबल चिकटवून जीवनाचे अतिसुलभीकरण करतो आणि स्वतःचा त्रास वाचवतो."

दळवी हे अतिशय वक्तशीर, सच्चे आणि शब्दाचे पक्के आहेत. त्यांचे जीवन शिस्तबद्ध आहे. रोज पहाटे उठून ते योगासने करतात. सकाळी फिरायला जातात. समुद्रकिनाऱ्याच्या वाळूत उघड्या पायाने चालतात, मासळीबाजारात जाऊन स्वतः मासळी खरेदी करतात. त्यांच्या काही ठराविक कोळणीही आहेत. त्यावरून आम्ही त्यांची नेहमी थट्टा करतो. एकदा ते म्हणाले, "मासा ताजा आहे ते कसे ओळखायचे ते सांगतो. डोळा वर करून पाहायचे, त्यातून रक्त येत असले तर ताजी मासळी म्हणून ओळखायचे." मी विचारले, "कुणाचा डोळा वर करायचा ? माशाचा की कोळणीचा ?" ते चवीने मद्यपान करतात. पार्टी रंगवतात. ओल्या पार्टर्या देण्यात त्यांना मनापासून रस आहे. मी त्यांच्याकडे अनेकदा जेवलो आहे. त्यांच्या पत्नी सौ. उमाबाई या कोकणी पद्धतीचे आदर्श चवदार जेवण करतात. मला जवळ जवळ अशी एकही संध्याकाळ आठवत नाही की मी दळवींकडे गेलो आहे आणि त्यांनी मला समद्य जेवण दिले नाही. मग आमच्या गप्पा रात्री दहा-साडेदहापर्यंत रंगतात. त्यात कोणताही विषय किंवा व्यक्ती वर्ज्य नसते.

दळवींच्या नाटकात वेड्या पात्रांचे प्रमाण फार असते. त्यावरून मी माझ्या स्तंभलेखनात आणि खाजगी गप्पांत त्यांची भरपूर थट्टामस्करी केली आहे. दळवींची नाटके आणि कथा-कादंबऱ्या यात 'सेक्स'च्या वर्णनांची चंगळ असते. पण विशेष आश्चर्याची गोष्ट म्हणजे दळवींनी मैत्रिणी केल्या नाहीत. त्याबाबतीत ते विरक्त नसले तरी तटस्थ आहेत मात्र इतरांच्या भानगडी आणि लफडी ऐकण्यात त्यांना विलक्षण रस आहे. अर्थात त्या भानगडींचा साहित्यासाठी कसा उपयोग करता येईल हा एकमेव विचार तेव्हा त्यांच्या मनात असतो. इतरांची निंदा-नालस्ती करण्यात दळवी रस घेत नाहीत. याबाबतीत आदर्श म्हणजे कुसुमाग्रज. त्यांच्याइतके दळवी शुचिर्भूत नसले तरी इतर बहुतेक लेखकांच्या तुलनेने दळवी हे परनिंदेपासून खूपच अलिप्त असतात. माणसांचे दुर्गुण शोधून त्यांचे चर्वित-चर्वण करण्यापासून ते दूर असतात. मात्र माणसांचे गुण शोधून त्यांचा मोठेपणा कशात आहे हे समजावून घेण्यास दळवी नेहमीच उत्सुक असतात. ते वृत्तीने मूलतःच ऋजू आहेत. आणि तरीही, मनात आकस न धरता मोठ्या माणसांच्या टोप्या उडविण्याचा खट्याळपणा ते करतात. जी. ए. कुलकर्णी यांच्या निधनानंतर त्यांनी लिहिलेला जी. एं. वरील लेख याची उत्तम साक्ष आहे. दळवींच्या एकंदर गंभीर व परिपक्व व्यक्तिमत्त्वातली ही मिस्किलतेची झाक लक्षणीय आहे. हिचेच परिणत रूप आपल्याला 'ठणठणपाळ' या सदरात दिसते.

मात्र शुद्ध विनोदी लेखनाच्या क्षेत्रात दळवी फारसे यशस्वी झाले नाहीत. वाचकांना या अपयशाची चाहूल लागण्यापूर्वीच दळवींनी आपले बलस्थान ओळखले आणि ते समस्याप्रधान, सामाजिक जाणिवेच्या नाटकांकडे वळले. त्या क्षेत्रात त्यांनी अनन्यसाधारण यश कमावले. माझ्या मते आज कुसुमाग्रजांच्या खालोखाल दळवी हेच मराठीतील श्रेष्ठ दर्जाचे नाटककार आहेत. वसंत कानेटकरांची नाटके हिशोबाने घेतलेली, प्रेक्षकांवर परिणाम करणाऱ्या कृत्यांचा भरपूर वापर करणारी आणि 'कर्मशियल' दृष्टिकोणातून आलेली आहेत. व्यावसायिक यश हेच त्यांचे ध्येय आहे. मधुसूदन कालेलकरांची नाटकेही याच जातीची पण खूपच हिणकस प्रतीची होती. कानेटकरांना फार तर 'सॉफेस्टिकेटेड कालेलकर' म्हणता येईल. पण दळवी मात्र अव्वल दर्जाचे, विषयाच्या आशयघनतेला हात घालणारे समर्थ नाटककार आहेत. वि. वा. शिरवाडकर यांच्या 'वीज म्हणाली धरतीला' या नाटकात झाशीच्या राणीच्या तोंडी फार अर्थगर्भ अशी काही वाक्ये आहेत, ती अशी : "दुनियेतली सारी सिंहासनं बंडाच्या यज्ञातूनच वर येतात. लोक बंडाचं निशाण उभारतात आणि सर्वस्वाची राखरांगोळी करायला पुढे सरसावतात ते वायकापोरांच्या गोटात त्यांना करमत नाही म्हणून नव्हे. हजारो माणसाचे जीव ज्यासाठी कस्पटासारखे फेकून द्यावेत असा काही दिव्य भावार्थ त्यांना घराबाहेर खेचीत असतो. यशाचा मुद्दा ईश्वराच्या स्वाधीन ठेवून बंडवाले बंड करीत असतात. केवळ त्या भावार्थावर नजर बांधून !" दळवी हे असेच यशाचा मुद्दा ईश्वराच्या स्वाधीन ठेवून जीवनाच्या भावार्थावर नाटके लिहितात. यश त्यांना धुंद करीत नाही की अपयश निराश करीत नाही. चिल्लर यशाने गर्विष्ठ झालेले अनेक लेखक दिसतात. पण नाटक व कादंबरी या दोन्ही क्षेत्रांत अव्वल यश मिळूनही दळवी शांतपणे आपली साधना चालूच ठेवीत आहेत—कधी गोव्यातल्या एखाद्या निवांत गावी एकटेच जाऊन किंवा गोव्यात गेलो आहोत असे भासवून मुंबईतच एकांतवासात राहून !

दळवींचे वाचन भरपूर आहे. पण आपण काय काय वाचले ते इतरांना सविस्तरपणे सांगून श्रोत्यांवर छाप पाडण्याचा प्रयत्न करणारी उथळ दाखवेगिरी त्यांच्यात नाही. ते प्रसिद्धिपराङ्मुख आहेत असे मी म्हणणार नाही. कारण ज्यांना प्रसिद्धीची अतिशय हौस असते असे अनेकजण आपण प्रसिद्धिपराङ्मुख आहोत याचीच अमाप प्रसिद्धी करीत असतात. पण दळवींना प्रसिद्धीचा हव्यास नाही हे खरे. सभा-संमेलनात ते भाषणे करीत नाहीत. आणि तरीही त्यांचा व माझा स्नेह इतका आहे की माझ्या दोन पुस्तकांचे प्रकाशन दळवींच्या हस्ते झाले आहे—'मुंबई ते वांडुंग' ही कादंबरी आणि 'वाळवंटातील वैभव' हे राजस्थानचे प्रवासवर्णन. दळवी हे संसारी आहेत, ते खऱ्या अर्थाने संसारात रमलेले असतात.

मुलांच्याहून त्यांच्या कौतुकाचा लाभ आता नातवंडांना अधिक होऊ लागला आहे. एक मुलगा, एक मुलगी आणि पत्नी एवढा त्यांचा आटोपशीर संसार. आपण होऊन कोणाकडे जावे हे दळवींच्या रक्तात नाही. त्यांचे असे अनेक स्नेही आहेत. की वीस वीस वर्षे दळवींची मैत्री असूनही दळवींनी त्यांचे घर पाहिलेले नाही. पूर्वी 'युसिस'च्या कचेरीत त्यांच्या मित्रांची गर्दी असे, आता घरी. ही गर्दी कधी कधी इतकी अंगावर येते की मित्रांच्यावर प्रेम असूनही दळवींना लेखनासाठी भूमिगत व्हावे लागते. नोकरीत असताना आणि नंतरही दळवींनी अनेकांना अनेकपरीनी उपकृत केले आहे. पण दळवींनी त्याची कधीही वाच्यता केलेली नाही. त्यांचे एकंदर व्यक्तिमत्त्व संयमी, चिंतनशील आणि सुखद आहे. मनोव्यापारात आणि व्यक्ती-व्यक्तींच्या मधील गुंतागुंतीच्या संबंधात त्यांना अपार औत्सुक्य आहे. त्यातूनच 'बॅरिस्टर'सारखे दर्जेदार नाटक निर्माण होते. अनेक मोठमोठ्या लोकांची निकटची मैत्री असूनही दळवी कधी त्या मैत्रीची वढाई मारीत नाहीत पण तशी आपली व त्यांची मैत्री असल्याचे ते कधी आपण होऊन बोलूनही दाखवीत नाहीत. असा ऋजू, विचारी मित्र मिळणे ही एक भाग्याची गोष्ट आहे. दळवींच्या आणि माझ्या तीस वर्षांच्या स्नेहाविषयी खूप काही लिहिता येईल. पण तूर्त इतकेच पुरे.

श्रीधर, हनुमान रस्ता, विलेपार्ले पूर्व, मुंबई ५७

---

## सामार स्वीकार

नीतिबंध आणि नीतिभंग : सुभाषचंद्र ए. भेलके, निमित्त प्रकाशन, सिद्धेश्वर तगवाले, ४२८, मंगळवार पेठ, पुणे ११, १९८८, रु. २५
स्मृति ठेवुनि जाती : शरश्चंद्र गोखले, श्रीविद्या प्रकाशन, पुणे ३०, १९८८, रु. ३५
चौफेर : माधव गडकरी, श्रीविद्या प्रकाशन, पुणे ३०, १९८८, रु. ६०
अवला होई प्रवला : चंपा लिमये, श्रीविद्या प्रकाशन, पुणे ३०, १९८८, रु. ४०
पाणिनीय व्याकरणाचे अंतरंग : वा. वा. भागवत, टिळक महाराष्ट्र विद्यापीठ, पुणे ३७, १९८८, रु. ८

भुताची ज्योत : डॉ. शरद राणे, डॉ. सरोजिनी बाबर, २०९५ सदाशिव पेठ, पुणे ३०, १९८८, रु. १.५०
मराठी लावणी निर्मिती आणि स्वरूप : डॉ. मि. जि. गायकवाड, संबोधि प्रकाशन गोरेगाव, मुंबई ४०० १०४, १९८८, रु. ३५

---

# एक शापित यक्ष : डॉक्टर वसंत अवसरे

मधु मंगेश कर्णिक

---

सत्तावन्न सालच्या निवडणुकीच्या धामधुमीत सांताक्रूझच्या चुनाभट्टी-खोतवाडी येथील झोपडपट्टीत मी राहत होतो. तेथे एका सकाळी डॉक्टर वसंत अवसरे मला प्रथम भेटले. तेव्हा मालवणी मुलुखावरील माझ्या कथा साप्ताहिक 'आलमगीर'मध्ये दर आठवड्याला येत. डॉक्टर त्या कथा वाचीत हे माहीत नव्हते. पण त्यांचे मालवणचे प्रेम उमाळ्याने जागे झाले आणि त्यांनी आपण होऊन मला माझ्या मकाणात गाठले. त्यांच्याबरोबर तेव्हा सांताक्रूझमधून मुंबई महापालिकेत नगरसेवक म्हणून निवडून आलेले श्री. वागळे वकील होते. दोघेही समाजवादी. पहिल्याच भेटीत डॉक्टर अवसऱ्यांनी मला अरेतुरे करायला सुरुवात केली नि मी ओळखले, हा झुळझुळीत कपडे घालणारा, गळ्यात सोन्याची चेन असलेला, सिग्रेट ओढणारा, नि मोटारीतून फिरणारा समाजवादी, आतून खरा कोकणी, मालवणी आहे. त्याशिवाय तो पहिल्याच बैठकीत आपल्याला 'अरेतुरे करणार नाही ! हा तर आपलाच माणूस.

कोकणी माणूस तेरमी. 'तेरम' हा पुन्हा मालवणी शब्द. जिद्दी या अर्थाचा डॉक्टर वसंत अवसरे विलक्षण जिद्दी होते. तेव्हा संयुक्त महाराष्ट्राची चळवळ ऐन भरात होती. गुजराती वर्तमानपत्रातून एक खोटा प्रचार सुरू झाला होता. 'मराठी लोकांनी गुजराती महिलांची अब्रू लुटली' अशा अर्थाचा ! आणि एका उच्चपदस्थ राजकारणी गुजराती गृहस्थाने तो उचलून धरला होता. त्या भयानक प्रचाराने सांताक्रूझ, विलेपार्ले भागातील गुर्जर समाजात अक्षरशः खळबळ माजली होती. मराठी माणसे खवळली होती.

डॉक्टर वसंत अवसरे आणि डॉ. काशीबाई या दांपत्याचे भलेमोठे इस्पितळ सांताक्रूझच्या ऐन घोडबंदर रस्त्यावर उभे होते. तेथे मराठी पेशंटांच्या बरोबरीने, किंबहुना थोडे अधिकच उच्चभ्रू गुजराती पेशंट यायचे. वसंतराव आणि काशीबाई

यांचे गुजराती समाजात मोठे घनिष्ठ दळणवळण. वसंतरावांनी तो अपप्रचार ऐकला आणि ते काशीबाईंना म्हणाले,

" तू पुढे हो ! हा अपप्रचार आपणच खोडून काढला पाहिजे. तू गुजराती बायकांच्या मुलाखती घे; आपण त्या छापून प्रसिद्ध करूया." वसंतरावांतली जिद्द उसळी घेत होती. त्यांना अशा वेळी स्वस्थ बसणे माहीत नव्हते.

मग डॉक्टर काशीबाई अवसरे यांचे पुराव्यानिशी प्रसिद्ध झालेले लेखन वाचताच आणि भल्या भल्या गुजराती कुटुंबांनी ' हे सारे खोटे आहे ' असे निक्षून सांगताच अपप्रचार कोसळून पडला.

वसंतराव सिग्रेट शिलगावीत डोळे मिचकावीत एवढेच म्हणाले, " मजा आला झालं ! साले उगाचच खोटं छापतात. मराठी माणूस म्हणजे वाटलं काय त्यांना ! "

तेव्हा शिवसेना नव्हती. परप्रांतीयांबद्दल नंतरच्या काळात उफाळलेला द्वेषही तेंव्हा नव्हता. वसंतराव पुन्हा सलगीने गुजराती समाजात मिसळले आणि दूध-साखरेसारखे त्यात विरघळून गेले.

गुर्जर समाजाचें नि वसंत अवसऱ्यांचे पूर्वजन्मीचेच ऋणानुबंध असले पाहिजेत. त्यांच्या हॉस्पितलात गुजराती मंडळींचाच राबता अधिक असे. पण मराठी माणसांना तेथे मज्जाव नव्हता. चुनाभट्टी झोपडपट्टीतले कित्येकजण हक्काने तेथे दवा पाण्या-साठी जात. बहुतेकजण मालवण-सावंतवाडीकडचे असत. डॉक्टर त्यांना तपासता-तपासता अस्सल माणवणीत विचारीत,

" मेल्या, खावक घालूक झेपत नाय तर इतकी पोरां होयी कित्याक ? ऑप्रेशन घे करून... शिरां पडली मेल्याच्या तोंडार ती."

आणि अशीच रसवंती गरबी गुजराती समाजाच्या सेवेला सादर केली जायची... " बेन, बापा, बा " याशिवाय कुणाला संबोधणे नाही. सगळ्या कुटुंबाची निकटची ओळख. " कम बेन, प्रवीणभायना जोयवो नथी आयणा."

प्रवीणभायची वायडी गारेगार व्हायची. वसंतरावांना लक्ष्मी वश होती आणि सरस्वती धार्जिण होती. त्यांची रसवंती विलक्षण प्रभावी होती. संस्कृत, मराठी, गुजराती काव्याची अवतरणे त्यांना मुखोद्गत असत. कुणी सुसंस्कृत, उच्चभ्रू गुजराती पेशंट असला की, त्याला 'सरस्वतीचंद्र' कथेचे सौंदर्य उलगडून दाखवण्यात किंवा कन्हैयालाल मुनशींनी लिहिलेल्या एखाद्या ग्रंथाचा परिचय करून देण्यात डॉक्टर हातातला स्टेथास्कोप विसरून जात आणि त्यांचे रसमधुर बोलणे गुंग होऊन ऐकताना त्यांच्या हातचे इंजेक्शन रुग्णाला मुंगीच्या चाव्याएवढेही टोचत नसे !



अनुक्रमणिका

डॉक्टरांचा हातगुण फार मानला जाई.

माईंच्या हॉस्पिटलात दाखल झालेली गर्भार स्त्री माईंच्यावर आईसारखी भरिभार टाकून निश्चित राही आणि डॉक्टरांनी तपासलेला पेशंट दुनियेतल्या कोणत्याही स्पेशालिस्टकडे गेला, तरी त्याला डॉक्टरांनी केलेले निदानच तेथेही ऐकायला मिळे...

अवसऱ्यांच्या हॉस्पिटलची ख्याती त्या दांपत्याच्या हातगुणामुळे असो, किंवा चांगुलपणामुळे असो, सर्वत्र पसरलेली असायची. साहित्य–संगीत–कलेमध्ये मनापासून रमणारे वसंतराव आणि काशीबाई यांच्या स्नेह्यांचे वर्तुळही मोठे. गुजराती साहित्यिक उमाशंकर जोशी, गुलाबराव ब्रोकर आणि इतर कितीतरीजण त्यांच्याकडे नेहमीच ये–जा करीत. मराठीतले बाकीबाव बोरकर, पाडगावकर यांचे माहेरघर म्हणजे डॉक्टर अवसऱ्यांचा बंगला. वसंत बापट, लीलाधर हेगडे, मृणालिनी देसाई ही मंडळी तर जणू कुटुंबीयच. पण साहित्याच्या प्रेमामुळेच चि. त्र्यं. खानोलकरांपासून भाऊ पाध्यांपर्यंत विविध प्रकृतीच्या तरुण साहित्यिकांनाही त्यांनी जवळ केले होते. मधुसूदन कालेलकर, शांता शेळके हेसुद्धा त्यांच्या अंतःपुरातील मैतर.

मी ' माहीमची खाडी ' लिहिली आणि त्यांना एक संदर्भ दुरुस्त करण्यासाठी काही शंका विचारल्या. अशिक्षित लोकांमध्ये गुप्तरोग बरा व्हावा म्हणून कोवळ्या कुमारी मुलीशी संभोग करावा, अशी समजूत आहे. ती कितपत खरी हे मला डॉक्टरांकडून हवे होते. डॉक्टरांनी यासाठी मला किती ग्रंथ वाचायला लावावे ? किती उदाहरणें सांगावी ?

त्या निमित्ताने त्यांनी ' माहीमच्या खाडी 'चे हस्तलिखित वाचले. म्हणाले " विलक्षण आहे सारं ! मीही हे सारं पाहिलंय... पण असं लिहिणं कठीण रे बाबा."

' ललित ' मासिक सुरू झाले आणि ' ललित ' ग्रंथप्रेमी मंडळाच्या नैमित्तिक सहली सुरू झाल्या. खंडाळा, लोणावळा, सातपाटी अशी ठिकाणे आम्ही हेरत असू. डॉक्टर अवसऱ्यांना त्याचा सुगावा लागला. ते मला म्हणाले–" आमच्या तारापूरला घेऊन ये तुझ्या मित्रांना. धमाल करू या सगळे. माझा तिथे बंगला आहे–"

पडत्या फळाची आज्ञा मानून आम्ही सारे तारापूरला हजर झालो. डॉक्टरांनी समुद्रकिनाऱ्यावर सुरेख बंगला बांधला होता. झाडे लावली होती. खाण्यापिण्याचा उत्तम सरंजाम ठेवला होता. जयवंत दळवी तेव्हा नाटककार बनले नव्हते. त्यांना डॉक्टरांनी पकडले नि त्यांच्या कानात म्हणाले,

"जयवंत, तुका म्हणून सांगतंय मी येक नाटक लिवलसय ! तां वाचू या ?"

दळवी आमचे म्होरके. त्यांनी होकार देताच आम्ही माडाच्या सावलीत, खाण्यापिण्याची जय्यत तयारी करून डॉक्टरांचे नाटक ऐकायला बसलो नि हां हां

म्हणता आमच्यातले बहुतेकजण पेंगू लागले... (रात्रीचे जागरण ! डॉक्टरांचेच नको तेवढे आतिथ्य !) ज्ञानेश्वर नाडकर्णी तर थेट भूमीशी समांतर होऊन षड्जात घोरू लागलेले. बापडे डॉक्टर एकाग्रपणें खाली मान घालून नाटकाचे प्रवेशामागून प्रवेश वाचताहेत आणि एकटे जयवंत दळवी गंभीरपणे ऐकत आहेत !

थोड्या वेळाने दोघांनाही वास्तवाची जाणीव झाली. डॉक्टर आम्हा सर्वांकडे पाहत मिस्किलपणे म्हणाले– "अरसिकेषु कवित्व निवेदनम्."

पण त्यांना आमचा राग आला नाही. आमच्यात ते पोराहून पोर होऊन खेळले, वागडले. आपल्या हातांनी आम्हाला पापलेट तळून वाढले. आम्हाला म्हणाले – "लेको, तुमच्यातला कोणीही नाटककार होऊ शकणार नाही ! झाला तर हा दळवी... कारण माझ्या नाटकाचे तीनही अंक त्यानंच इंटरेस्ट घेऊन ऐकले आणि सहन केले !"

डॉक्टरांना नाटक लिहिणे जमले नाही. (पण त्यांचा आशीर्वाद दळवींना लाभला. कारण तो खरोखरच पुण्यवंताचा आशीर्वाद होता.) पण डॉक्टरांनी सुरेख प्रवासवर्णने लिहिली. आसाम पाहायला सर्वांत प्रथम गेलेला मराठी लेखक म्हणजे डॉक्टर वसंत अवसरे ! आसामवर त्यांनी प्रवासवर्णन लिहिले ते विलक्षण सुंदर...मग ते काशीबाईंसह जपानला गेले. खरे म्हणजे त्यांना विमानाचे तिकिट काही महाग नव्हते, पंण ते गेले ते बोटीने–सांताक्रूझला त्यांना आम्ही निरोपादाखल एक छोटी पार्टी दिली तेव्हा ते म्हणाले, "काशी आणि मी नवराबायको म्हणून इतकी वर्षे एकत्र आहो. पण शेजारी शेजारी असलेल्या दोन डोळयांना एकमेकांचे दर्शन घडत नाही, तसे आमचे झालेले आहे. हॉस्पिटलचे नाक आम्हा दोघांमध्ये उभे असते. तेव्हा हा आमचा प्रौढ वयातला दुसरा मधुचंद्र म्हणा वाटल्यास ! बोटीतल्या प्रवासामुळे आम्ही दोन आठवडे सतत एकमेकांच्या सहवासात राहू !"

डॉक्टर असे आंबटगोड, चहाटळ बोलण्यात कुणाला हार जायचे नाहीत. फटकळपणा, पोरकटपणा, खोडकरपणा हा त्यांच्या पाचवीला पुजलेला. पण आतून ते अगदी वेगळे होते. त्यांचा जीव समाजात गुंतलेला होता. गोरगरिबांचे दुःख त्यांना बघवत नसे. कितीजणांना त्यांनी दोन्ही खिसे उलटे करून पैसे दिले ते कुठेही लिहिलेले नाही. उदारपणे खूप गुप्तदान त्यांनी केले. स्वतः चुनाभट्टी-खोतवाडीच्या झोपडपट्टीवासीयांसाठी खस्ता खाल्ल्या. आज साने गुरुजी विद्यालयाची भव्य आणि परिपूर्ण वास्तू तेथे जी उभी राहिली आहे, तिचे पहिले रोपटे वसंतराव आणि काशीबाईंनी लावले आणि त्याला खतपाणी घालून वाढवले. त्यांच्याच तालमीत तयार झालेल्या नलूताई बापट, वसंत बापट, लीलाधर हेगडे, रतन डिसोजा यांच्यासारख्या गुरुजींच्या धडपडणाऱ्या मुलांनी. आजही तो सर्वांगी विक-



अनुक्रमणिका






सित झालेला परिसर पाहताना सर्वांत प्रथम आठवते ती डॉक्टर अवसऱ्यांची ठेंगणी, हसरी, मिस्किल मूर्ती !

समाजासाठी स्वतःला जे करता येत नाही, ते दुसऱ्या कोणी करताना दिसले की डॉक्टरांना प्रेमाचे भरते यायचे. मग त्या माणसाला कुठे ठेवू नि कुठे नको असे त्यांना व्हायचे. मदतीचा ओघही अस्खलित चालू व्हायचा. असेच एके दिवशी संध्याकाळी ते माझ्या खोलीवर आले. त्रेसष्ट किंवा चौसष्ट सालची गोष्ट. बरोबर एक उंच, धिप्पाड, काळेसावळे, खादी पायजमा नि लांब बाह्यांचा शर्ट नि खादीचीच गांधी टोपी घातलेली खेडूत दिसणारे गृहस्थ.

" हे बाबा आमटे, विदर्भात वरोऱ्याला महारोग्यांसाठी फादर डेमियनसारखं काम करताहेत." मी बाबा आमट्यांना नमस्कार केला नि ते स्निग्धपणे हसले. दोन मनस्वी लोकविलक्षण व्यक्तिमत्त्वे जवळ आली होती. त्या दोघांनी मग आमच्या खोलीत खाटेवर शेजारी शेजारी बसून किती गप्पा मारल्या. माझ्या पत्नीने दिलेले साधे लिंबाचे सरबत दोघेही समाधानाने प्यायले. त्या घटकेपासून डॉक्टरांचा बाबा आमट्यांशी जो स्नेह जुळला, तो अखेरपर्यंत. उत्तरायुष्यात डॉक्टरांच्या जीवनात जे अकल्पित परिवर्तन घडून आले, तेव्हाही माझ्या समजुती-प्रमाणे ते बाबांनाच सल्ला विचारीत असत.

जी आस्था बाबा आमट्यांच्या समाजकार्याबद्दल तीच देवरूखच्या मातृ-मंदिर चालवणाऱ्या मावशीबाई हळव्यांबद्दल. कुठेही हात आखडता नाही, शब्दां-मध्ये काटकसर नाही, प्रेमामध्ये उधारी नाही.

डॉक्टरांनी सर्वत्र प्रेमाचा व्यवहार रोखीनेच केला. मग ते प्रेम घरातल्या माणसांवर असो, पाळलेल्या अल्सेशियन कुत्र्यावर, पामेरियनवर किंवा गोंडस मांजरीच्या पिल्लांवर आणि साने गुरुजी विद्यालयाशेजारच्या शेंबड्या, नागड्या, पोरांवर असो. बोरकर, कुसुमाग्रजांच्या कवितांवर, नाथ पैंच्या वक्तृत्वावर, नाना-साहेब गोरे आणि एस. एम. यांच्या बावनकशी समाजवादी निष्ठेवर, पु. ल. देशपांड्यांच्या काकाजींवर, प्रभाकर पाध्ये, दुर्गा भागवत यांच्या ललित लेखनावर, मुरलीधर आचरेकरांच्या चित्रांवर, भीमसेन, कुमार गंधर्व यांच्या गळ्यावर, लताच्या गाण्यावर, शांता शेळक्यांच्या गीतरचनेवर, ग्रेटा गार्बोवर, मेरिलीन मन्रोवर, ग्रेगरी पेकवर, जपानातल्या उगवत्या सूर्यावर आणि मालवणच्या किनाऱ्यावरील सूर्यास्ता-वर, माणकूर–हापूस आंब्यावर, रसाळ फणसावर, आमसोलाच्या कढीवर, बांगडे–पेडवे नि पापलेटे यांच्या स्वादावर, जुन्या अत्तरांवर, अभिजात वाङ्मयावर, उंची कपड्यांवर, सुंदर मैत्रिणींवर आणि रसील्या, कलाप्रेमी मित्रांवर डॉक्टर वसंत अवसरे या मानवी देहाच्या यक्षाने भरभरून, रोखीने प्रेम केले.

तरीही त्यांचे प्रेम ओंजळीत शिल्लक उरलेच होते.

त्या प्रेमाची कहाणी नंतर —

पण त्याआधीचा डॉक्टरांच्या जीवनाचा प्रवास पाहिला म्हणजे वाटते, हा माणूस कुठे होता नि कुठे पोचला.

मालवणजवळच्या नेवाळी या खाडीकाठच्या निसर्गरमणीय चिमुकल्या गावात एका सारस्वताच्या गरीब कुटुंबात जन्मलेल्या वसंताने स्वतःच्या बुद्धिमत्तेच्या आणि हिमतीच्या जोरावर मेडिकल कॉलेजपर्यंत पल्ला गाठला. तिथे उत्तम पदवी मिळावली. पदवीबरोबरच काशीबाईसारखी आदर्श सहधर्मचारिणी, तरुण वयातील प्रेमप्रकरणातील आशानिराशेचे सारे लपंडाव खेळत हस्तगत केली. दोघांनी मिळून संसार थाटला. हौसेने दांपत्यजीवन सुरू केले. त्याला रसिकतेची जोड दिली. पैसा, प्रतिष्ठा, कीर्ती उदंड प्राप्त केली आणि समाजाबद्दलचे, देशाबद्दलचे ऋणही यथाशक्य फेडले.

बेचाळीसच्या स्वातंत्र्ययुद्धात डॉक्टर बाँबगोळ्यांच्या निर्मितीमध्ये गुंतले होते आणि त्या झटापटीत त्यांनी ब्रिटिशांकडून देहदंडही सोसला होता. एखादी गोष्ट डोक्यात भिनली की झपाटल्यासारखी तिच्यामागे धावायचे हा स्वभाव बेचाळीसच्या चळवळीतही प्रगट झाला. त्याच काळात साने गुरुजी, एस. एम., गोरे, मेहेरअल्ली यांसारख्या ज्येष्ठांचे नेतृत्व मिळाले. गांधींचेही आकर्षण वाटत होते. त्यांची करुणा हृदयाला भिडली होती. भेदभावविरहित समाजरचनेच्या स्वप्नाने डोळे काजळाने माखावे तसे माखले होते. स्वातंत्र्यप्राप्तीपर्यंत हा तरुण वेड्यासारखा वावरत होता.

त्या काळात जमिनीवर पाय घट्ट रोवलेल्या माईंनी सांसारिक व्यापताप सांभाळले. विलास आणि शशी या मुलांचे संगोपन केले. डॉक्टरांना त्यांच्या मनस्वी स्वभावानुसार वागू दिले. त्यांच्या व्यक्तिमत्त्वाचे वेगळेपण माईंनी मनोमन ओळखले होतें. वसंतरावांचा थरथरता स्वभाव. अष्टपैलू स्फटिकावर जसे शतरंग दिसतात, तसे या आपल्या नवऱ्याच्या व्यक्तिमत्त्वावर अनेक रंगांचे मिश्रण देवाने चित्रित केलेले आहे हे त्या बुद्धिमान सुशिक्षित स्त्रीने ओळखले नसेल असे कसे म्हणता येईल ? पण सारे जमेला धरून माई डॉक्टरांच्या सहजीवनात रममाण झाल्या होत्या स्त्री मासिकातून त्यांचे साहित्य प्रसिद्ध होई. तेव्हा 'स्त्रीमुक्ती'ची चळवळ आजच्या, सारखी नव्हती. पण नव्या युगातील सुशिक्षित स्त्रीला नव्या काळाचे भान जरूर आलेले होते. समाजवादी वृत्तीच्या महिलांची सोबत त्यांना होती. आपले हॉस्पिटल सांभाळून त्या स्त्रीजीवनाच्या विविध समस्या हाताळीत होत्या. कुटुंबनियोजन, स्त्रीशिक्षण, हुंडाबंदी यासारख्या विषयांवर हिरीरीने त्या कार्य करीत असत. वेळ

मिळेल तेव्हा लेखन करीत, त्यांच्या लेखनाचे विषयही महिलांच्या कल्याणाशी निगडित असत.

एका परीने ही दोन्ही अगदी भिन्न व्यक्तित्वे होती. वसंतराव सर्वश्री बहिर्मुख तर माई कमालीच्या अंतर्मुख. वसंतराव बडबडे तर माई मोजकेच पण मोलाचे बोलणाऱ्या. वसंतराव फुलपाखरासारखे वागणारे तर माई डहाळीवर बसून आपल्या घरट्याकडे एक नजर ठेवून दुसऱ्या डोळ्याने सारे जग कुतूहलाने न्याहाळणाऱ्या पक्षिणीसारख्या ! दोघांच्याही अंतःकरणात गरिबांबद्दलचा कळवळा; पण माईंची दृष्टी अधिक व्यवहारी, अधिक वास्तववादी. दान करावे, पण ते सत्पात्री असावे, ही त्यांची धारणा. वसंतराव अल्पशा देखाव्याने लुब्ध होऊन जात आणि हातात असेल नसेल तेवढे देऊन टाकीत–मागचा पुढचा विचार न करता !

पण तरीही आमच्यासारख्यांना हे दांपत्य विलक्षण आपले वाटे. डॉक्टर बरोबरीचे वाटत, तर माई वडीलधाऱ्या, कर्तबगार बहिणीसारख्या किंवा आईसारख्यासुद्धा.

कधी कधी डॉक्टर एखाद्या आजारी मित्राला किंवा त्याच्या गर्भार पत्नीला दोस्तान्याखातर आपल्या सुसज्ज हॉस्पिटलात हाताला धरून आणीत नि अॅडमिट करीत. दहा पंधरा दिवस त्या 'घरच्या' पेशंटची राजेशाही बडदास्त राखली जाई. त्याला बरे करून निरोप दिला जाई. जाताना तो मित्र एकही दिडकी बिलादाखल देत नसे–जणू हक्कच होता त्याचा तेथे. पण माईंनी एका शब्दाने अशा मंडळींना कधी विचारले नाही. कारण तो 'डॉक्टरांचा माणूस' होता त्यांना हे जरूर माहीत असायचे की हा माणूस इथे फुकट औषधोपचार करून घेत असला, तरी उद्या आपल्या फॅमिलीसह चायनीज रेस्टॉरंटमध्ये जेवताना कितीही भारी बिल आले तरी ते देऊ शकण्याची त्याची क्षमता आहे. कोटातले इंग्रजी सिनेमे पाहताना त्याला पैशाची चणचण भासत नाही.

पण माई हसून त्याला निरोप देत. तो आपल्या इस्पितळात येऊन बरा होऊन गेला. यातच कृतार्थता मानीत.

असा अव्यवहारीपणा डॉक्टरांनी केलेला असला तरी त्यांच्या व्यक्तिमत्त्वामध्ये इतर असे लोभसवाणे पैलू होते की त्यांचा क्वचित राग आला तरी तो क्षणार्धात वितळून जावा. लहान मुले दिसली की ते मुलाहूनही मूल होत. मूल कुणाचेही असो, ते त्यांनी जवळ घेतलेच. पोरट्यांनाही ते आपले वाटत. आमच्या शैला–तन्मयचा जन्म त्यांच्या इस्पितळात झाला. दोघेही आईबापांपेक्षा 'पपांना' अधिक बिलगायची.

समीर हा त्यांचा नातूच. मोठा लडिवाळ आणि खट्याळ होता लहानपणी. आजोबा वसंतराव त्याच्याहीपेक्षा लडिवाळ होऊन त्याला चित्रे काढून दाखवीत,

त्याला गाणी रचून गाऊन दाखवीत. त्याच काळात त्यांची हरवलेली चित्रकला त्यांना पुन्हा गवसली. नातवासाठी चित्रे काढता काढता ते वेगळी, सुंदर निसर्ग-चित्रे काढू लागले. हलक्या, नाजुक रेषांची आणि तरल रंगांची किती सुंदर चित्रे आम्ही त्या काळात डॉक्टरांनी काढलेली पाहिली. चित्रे काढली, तशाच कविता लिहिल्या.

वर्षातील एखादा ऋतू ते कविताच जगत. एकेका दिवसात दोन-दोन कविता. एक लांबट छोटेखानी वही होती, तिच्यात ते आपल्या डौलदार अक्षरात सुरेख कविता लिहीत. बोरकर, पाडगावकर, बापट यांनी त्यांच्या कविता वाखाणलेल्या. अभिजात संस्कृत काव्याचा व्यासंग आणि मुळातील काव्यशक्ती यांच्या संचितावर डॉक्टर रुबाया लिहीत, गझल लिहीत आणि चित्रपटासाठी गीतेही लिहीत. प्रसाद हा त्यांचा मोठा गुण होता. त्यांची शब्दकळा लावण्यमयी होती. त्यांची रचना चित्रदर्शी होती. 'मेघदूता'चा त्यांचा अनुवाद वाचला की त्यांची शब्दावरची, रचनेवरची हुकुमत ध्यानात येते.

प्रौढ वयात माईंनी त्यांना त्यांच्या सर्व व्यावहारिक जबाबदाऱ्यांतून जवळ-जवळ मुक्तच केलेले असावे; कारण डॉक्टर दवाखान्यात, हॉस्पिटलात फारसे दिसतच नसत... कविता, चित्रे, गप्पा, रसील्या मित्रांच्या मैफली आणि मनःपूत भ्रमंती यातच ते रममाण झाले. मग एक दिवशी अचानक त्यांना पहिला हार्ट अटॅक आला. तोही खूप जोराचा. माईंनी तातडी केली. अहोरात्र शुश्रूषा, शहरातले तज्ज्ञ डॉक्टर्स आणि डॉक्टरांचे मनोबल, यामुळे डॉक्टर त्यातून निभावले.

बरे झाले आणि पुन्हा त्यांचे मनःपूत वागणे सुरू झाले. आता फक्त सिग्रेट थांबली होती. आम्हाला म्हणायचे- "अरे, आता नरसोपंत केळकर म्हणत तशी टाइपरायटरची घंटा वाजली आहे. वयानेही साठी गाठली ! आता पर्वा कसली-मजेत जगायचे, जेवढे दिवस वाटणीला येतील तेवढे."

आणि त्यांचे जगणे अधिक मजेचे त्यांना वाटावे, अशीच नियतीचीही इच्छा असावी !

आयुष्यभर आपल्या पद्धतीने सर्वत्र प्रेमाची उधळण करणाऱ्या या स्वप्नांच्या सौदागराच्या ओंजळीत अजूनही मोहब्बतीचे गुलाबपाणी शिल्लक होते आणि डोळ्यांत स्वप्ने फुलत होती... प्रीतीची.

कुसुम त्यांना याच मोसमात भेटली.

डॉक्टर कुसुमच्या घरचे फॅमिली डॉक्टर... त्या श्रीमंत, खानदानी गुजराती कुटुंबाशी त्यांचा व माईंचाही जुना स्नेहसंबंध... कुसुम त्याच घरातली तरुण मुलगी. एम. ए. शिकलेली. तिशीच्या आतलीच. हळुवार मनाची. कविता, कला

यात रमणारी. संवेदनाक्षम. डॉक्टर आजारी पडले तेव्हा त्यांच्या घरी शुश्रूषेला ती स्वतः आली... माईंना वाटले, आपल्याला एखादी मुलगी असती, तर तीही पपांसाठी अशीच धावली असती.

त्यांनी निष्कपटी मनाने कुसुमला डॉक्टरांच्या खोलीत पाठवावे, डॉक्टरांनी पडल्या पडल्या तिला संस्कृत काव्य, गुजराती कथा, मराठी नाटके यांविषयी सांगावे.

आम्ही डॉक्टरांना पाहायला, भेटायला गेलो की, कुसुम त्यांच्या उशाला बसून त्यांच्या रुपेरी झुलपातून बोटे फिरवीत बसलेली दिसायची...

डॉक्टर बरे झाले नि त्यांना बरोबर हिंडताना कुसुमच सहेली म्हणून हवी झाली. तीही त्यांच्या तांबडया रंगाच्या ' जॉगर ' गाडीत बसून गावभर त्यांच्या-बरोबर भटकायची...

पुष्कळदा डॉक्टर कुसुमला घेऊन आमच्या घरी यायचे... घटकान् घटका तिच्याशी बोलत बसायचे. डॉक्टर विलक्षण संभाषणचतुर होते. बोलत ते असे लाघवी की, ऐकत राहावेसे वाटे. तरुण कुसुम हळूहळू पपांच्यात गुंतत होती. वयस्कर पपा तर कधीच गुंतले होते !

गुजराती समाज श्रीमंत असला तरी कर्मठ आणि जुन्या जमान्यात अडकलेला. कुसुम आणि डॉक्टर यांची वाढती सलगी जशी सार्वजनिक ठिकाणी प्रगट होउ लागली, तशी त्याची प्रतिकूल प्रतिक्रिया गुजरात्यांमध्ये दिसून येऊ लागली. प्रथम कुजबूज, मग अफवा, मग सांगोवांगीच्या कल्पकथा या क्रमाने कुसुम आणि डॉक्टर यांच्याबद्दल सांताक्रूझ, विलेपार्ले येथील उच्चभ्रू गुर्जर कुटुंबांतून चर्चा सुरू झाली आणि नंतर गुजराती वृत्तपत्रांतूनही तिला तोंड फुटले !

आचार्य अत्र्यांचा ' मराठा ' तेव्हा जोपात होता. अत्र्यांचे आणि डॉक्टर वसंतराव अवसरे यांचे संयुक्त महाराष्ट्र चळवळीत कशावरून तरी बिनसले होते. मग ' मराठा 'मध्येही गुजराती वृत्तपत्रातील खमंग मजकूर अधिकच खमंग होऊन प्रसिद्ध होऊ लागला आणि सर्वत्र खळबळ उडाली...

डॉक्टर पुन्हा सिग्रेट फुंकू लागले. कसली तोशीस न लागलेले त्यांचे राजस आयुष्य या भयंकर जनप्रवादाने दुभंग झाले. डॉक्टर सैरभैर झाले. अधिकच बेतालपणे त्यांची पावले पडू लागली आणि एका भन्नाट क्षणी त्यांनी व कुसुम यांनी आपापली घरे सोडली. दोघेही उघडया रस्त्यावर आले !

फक्त अंगावरचे कपडे आणि फुटकळ रक्कम याशिवाय दोघांपाशीही काही नव्हते. आम्ही डॉक्टरांपेक्षा सर्व परींनी लहान... भयचकित होऊन सारे पाहत होतो. आपण यात काय करावे, तेही कळत नव्हते.

एक दिवस डॉक्टरांचा मला ऑफिसमध्ये फोन आला– " मी बांद्र्याला अमुक-अमुक ठिकाणी आहे. अज्ञातवासात. मला कावीळ झाली आहे. अमुक-अमुक आयुर्वेदिक औषधे आणि शहाळी घेऊन ये."

बांद्रा टॉकीजजवळच्या एका गुजराती कुटुंबाने डॉक्टरांना गुपचूप आश्रय दिला होता. मी ती औषधे, दोन शहाळी बरोबर नेली होती. डॉक्टरांनी मला सांताक्रूझ, पार्ल्याचे दोन-तीन पत्ते दिले.

" इथे जाऊन अमुक-अमुक व्यक्तीला निरोप दे– मी इथं आहे म्हणून."

त्यांची आज्ञा मी बिनबोभाट पाळली...

त्या कठीण काळात डॉक्टरांना त्यांच्या स्नेह्यांनी सांभाळले. गुजराती आणि मराठी. डॉक्टरांनी भाषिक मर्यादा पाळल्या नव्हत्या; त्यांचे व त्यांच्यावर निस्सीम प्रेम करणाऱ्या मित्रांचे मला त्या काळात जवळून दर्शन झाले.

नंतर लगेचच मी गोव्यात नव्या नोकरीवर हजर होण्यासाठी निघून गेलो आणि डॉक्टर आपल्या प्राक्तनाशी मुंबईत झगडू लागले... त्यांच्या भेटीगाठी होईनाशा झाल्या...

त्यानंतर दीडएक वर्षाने डॉक्टर आणि कुसुम दोघेही अकस्मात गोव्यात आमच्या घरी येऊन दत्त म्हणून उभे राहिले.

" डॉक्टर, तुम्ही–"

" तुला काय वाटलं ? डॉक्टर मेला ?"

मी ओशाळलो–

" अरे, मी फिनिक्स पक्षी आहे. राखेतून पुन्हा सारी दुनिया उभी करीन." त्यांचे मिस्किल, चंचल डोळे आत्मविश्वासाने, स्थिरपणे पाहत होते. डॉक्टरांची तब्येत थोडी ढासळली होती. पण चेहऱ्यावर तरतरी होती. नजरेत जिद्द होती... मधुसूदन कालेलकरांच्या नाटक कंपनीतून हे जोडपे, त्यांच्या दौऱ्यावरील बसमधून गोव्याला पोचले होते...

ती दोघे मग आमच्याकडे आठवडाभर मजेत राहिली. समुद्रकिनारे, माडांच्या राया, मंदिरे, चर्चेस सारे पाहून ते परत फिरले. बाकीबाब बोरकरांकडे एक सुरेख मैफल झडली. डॉक्टर पुन्हा तरुण होऊ पाहत होते... वाढत्या वयाला पालाण घालून यौवनाला भिडू पाहत होते.

डॉक्टरांनी जिद्दीने पुन्हा सारा व्याप उभारायला सुरुवात केली होती. नाला-सोपाऱ्याला त्यांनी कुसुमसह स्थलांतर केले होते. तेथे एका चाळीत दोन खोल्यांच्या बिऱ्हाडात दवाखाना थाटला होता. पुन्हा स्टेथास्कोप गळ्यात अडकवला होता आणि दारावर पाटी लावून वयाच्या त्रेसष्टाव्या वर्षी पुन्हा डॉक्टरकी सुरू केली

(पान नं. १८० पहा)

विचार आणि चिंतनाचा प्राजक्तवृक्ष :

# नरहर कुरुंदकर

**बा. ह. कल्याणकर**

---

आमचे स्नेही श्री. शंकर सारडा यांनी 'महाराष्ट्र साहित्य पत्रिके'साठी 'माझा वाङ्मयीन ऋणानुबंध' या विषयावर लेख लिहिण्यासंबंधीचं पत्र पाठविलं. आणि मी त्यांना फारसा विचार न करता होकार कळविला. या विषयावर लिहिणं तसं अवघड आहे हे माझ्या नंतर लक्षात आलं. मराठी साहित्यात मी आता कुठं वावरू लागलो आहे. विद्यार्थिदशा अनेक चळवळींत गेली. त्यामुळं वाचन थोडं-फार थांबलं होतं. कारण चळवळच खूप शिकवत होती. मीही शिकत होतो. आणि मी जेव्हा लिहू लागलो तेव्हा प्रस्थापित मराठी साहित्याच्या वर्तुळात मी आणि माझ्या लेखनासंबंधी तसं नाक मुरडण्याचं काम सुरू झालं होतं. याचवेळी मला कळलं, मराठी साहित्याचं डवकं का झालं ते! मी आजही आजच्या मराठी साहित्याच्या कोणत्याच 'गटात' नाही की कुणाच्या 'गोटात' नाही. हल्ली असे 'गट' आणि 'गोट' पुढे येण्यासाठी लागतात म्हणे! या सर्वांचं 'चांगभलं होवो' ही शुभेच्छा देण्यापलीकडे आपण काय करू शकतो? प्रस्थापित मराठी साहित्या-संबंधी असलेल्या निकषाच्या वस्त्रात मी मावणं शक्य नव्हतं. आणि माझी तशी अपेक्षाही नव्हती. एकमेकांचा प्रचंड द्वेष आणि दुस्वास करणारी मंडळी आपल्या मराठी साहित्यात जागोजाग दवा धरून बसलेली आहेत. प्रत्येकजण कुणातरी मठाधिपतीचा अनुयायी आहे आणि तो दुसऱ्या मठातील मंडळींबद्दल असूया बाळगतो.

हल्ली मराठी साहित्याला खूपच वाईट दिवस आले आहेत. इतके की, एक साहित्यिक दुसऱ्या साहित्यिकाबद्दल चांगलं बोलणं हे अतिशय दुर्मिळ झालं आहे. प्रत्येकजण आपली टिमकी आणि आपल्या गटाचं तुणतुणं वाजविण्यात गर्क आहे. एका वर्षापूर्वी घोषित झालेले महाराष्ट्र सरकारचे उत्कृष्ट वाङ्मयाविषयीचे

पुरस्कार काय सांगतात ? 'मित्राचं वाङ्मय ते उत्कृष्ट वाङ्मय' असा हा नवा निकष या परीक्षक मंडळानं तंतोतंत अंमलात आणला आहे. अगदी वाटून आपल्या मित्रांच्या पदरात हे उत्कृष्ट वाङ्मयाविषयीचे पुरस्कार टाकण्यात आले. मराठी वाङ्मयाचा विशाल प्रवाह का झाला नाही ? याचं बोलकं कारण म्हणून या पुरस्कारांच्या खिरापतीकडे बोट दाखविता येईल. हे सारं मला यासाठी आठवतं की, या सर्व संकुचित भेदभावांना छेद देऊन त्यापलीकडे जाऊ पाहणारं एक व्यक्तिमत्त्व आपल्या मराठी साहित्यात होतं. ते होतं कै. नरहर कुरुंदकर. विचार आणि चिंतनाचा प्राजक्तवृक्ष. ज्या मराठी साहित्यात आज वाद थांबलेले आहेत. त्यामुळं विवादांना पूर्णविराम मिळाला आहे. संवाद आणि सुसंवाद पार कोसळलेले आहेत. विचार करणाऱ्या साहित्यिकांतच मेळ राहिलेला नाही. त्यांच्यात परस्परांच्या साहित्याविषयी देवाण-घेवाण वा कसलाच संवाद राहिलेला नाही. त्यामुळं एकमेकांचं साहित्य वाचणं या लेखक-कवींना कमीपणा वाटू लागला आहे. विचार देणारी माणसंच इतकी खुजी झाल्यावर समाज उत्तुंग कसा होईल ? याची कल्पनाच न केलेली बरी. आमचे लेखक, कवी आणि प्रतिभावंत माणसांसंबंधी खूप लिहितात, पण ते स्वतः माणूस म्हणून किती योग्य आहेत ? उंच आहेत ? 'मी कोणत्याच साहित्यिकाचं पुस्तक वाचत नाही' असं म्हणणारे साहित्यिक आपल्याकडे आज डझनांनी मिळतात. खरं म्हणजे वाचनानं लेखकातील कलावंताची मशागत होते. झाडाच्या पानातून जसा नवा कोंभ अंकुरावा आणि परत नवं पान उमलावं, मग झाडाची उंची त्यामुळं वाढावी तसंच सततच्या वाचनातून आणि चिंतनातून कलावंताची उंची वाढते. मनाची 'डेप्थ' वाढते. यामुळं कलावंत घडतो आणि कलाही उत्तुंग होते. पण आपल्याकडे लेखक म्हणजे रोजगार हमीवरील मजुरासारखे आपल्या लेखनात 'पाटचा' टाकीत असतात. लोकांना काही नवं सांगावं, आपणाला जे कळलं आहे ते हजारो माणसांच्या अंतःकरणांत ओतावं या ओढीनं आपले किती लेखक, कवी लिहितात ? हा ज्याचा त्यांनी स्वतःच्या मनाला प्रश्न विचारलेला बरा. इतरांवर टीका करण्यात मला तरी स्वारस्य वाटत नाही. आत्मटीका ही ज्याची त्यानं करावी हेच खरं. कारण आत्मटीका हीच माणसाच्या प्रगतीची जननी असते आणि जमीनही असते. टीका असो वा आत्मटीका असो या बाबतीत कै. नरहर कुरुंदकरांसारखा विचारवंत सापडणं आज तरी दुर्मिळ आहे. आज आपल्यात नसलेल्या माणसांच्या विषयीच चांगलं बोलण्याची आणि लिहायची वेळ आपल्यावर यावी ही खरी आजची शोकांतिका आहे. वैचारिक क्षेत्रातील नरहर कुरुंदकर असोत वा राजकारणातले यशवंतराव चव्हाण असोत, वटवृक्षाच्या तोडीची असली माणसं आपणाला आज फार कमी दिसतात. द्वेष, असूया, मत्सर आणि हेवेदावे यांचं कवच नाहीसं करून ही माणसं समाजभर वावरत होती. स्वतः घडत घडत समाजाला घडवीत होती.



अनुक्रमणिका






समाजाला घडविणाऱ्या साहित्याची आणि साहित्यिकांची ही माणसं पाठराखण करीत होती. एकमेकांचं साहित्य आपण न वाचल्याची फुशारकी मारणारे आमचे अनेक कलावंत खुरटे का राहातात हे इथं लक्षात येतं. ही मंडळी स्वत: खुरटी तर राहातातच राहातात आणि मराठी साहित्यालाही खुरटं बनवितात.

माझा ' उठाव ' हा कवितासंग्रह १९८० साली प्रकाशित झाला. हा माझा पहिला कवितासंग्रह होता. मराठी साहित्यात हा माझा पायप्रवास सुरू झाला होता. माझ्या प्रत्येक कवितासंग्रहासोबत मी आणि माझी जाणीव विकसित होत असल्याची पावती मला कायम मिळत आलेली आहे. लिहिण्याच्या प्रेरणा मला जाणवलेल्या माझ्या भोवतीच्या वास्तवातून मिळाल्या हे नाकबूल करता येणार नाही. मला भोवतीच्या घनघोर वास्तवाचा विचार करीत असताना ज्या सत्याचा शोध लागला ते मी उत्कटपणे सांगण्यासाठी लिहू लागलो. उगाच ' स्वान्त: सुखाय ' शब्दांचा खेळ खेळण्यात मला रस नव्हता. असं कुणाच्याच उपयोगाचं नसलेलं साहित्य नच लिहिलेलं बरं या मताचा मी आहे. हे सांगण्याचं कारण की– ' उठाव ' कवितासंग्रह मी लिहिला तो सांगण्यासारखं माझ्याजवळ काही आहे आणि मी ते लोकांपर्यंत पोचविलं पाहिजे या जाणिवेनं. कुणी मला विचारीलही तुम्हाला साहित्य लिहिण्यासंबंधी कुणी मार्गदर्शन केलं म्हणून ? खरं सांगायचं म्हणजे मला कुणाचं तसं मार्गदर्शन मिळालं नाही. स्वत:ची वाट स्वत:लाच विचारत विचारत उजेडाच्या गावाला जाऊ पाहाणारा मी एक वाटसरू आहे. नरहर कुरुंदकर आणि यशवंतराव चव्हाणांचा ' उठाव 'च्या निमित्तानं माझा स्नेह पक्का झाला. तोपर्यंत नरहर कुरुंदकर मला एक चळवळीतील विद्यार्थिनेता आणि ' युगकर्ता ' या नियतकालिकाचा संपादक म्हणून ओळखत होते. १ मे १९७८ ला ' युगकर्ता 'च्या पहिल्या अंकाचं प्रकाशन गुरुजींच्या हस्तेच झालेलं होतं. केवळ माझ्यासाठी ते बलभीम महाविद्यालय बीड येथील विद्यार्थ्यांसमोर राजर्षी शाहू व्याख्यानमालेत बोलण्यासाठी आले होते. मी नांदेडचा असल्यामुळं गुरुजी मला खूप परिचयाचे होते. मी यशवंत महाविद्यालयात शिकायला असल्यामुळं नरहर कुरुंदकरांचा विद्यार्थी होण्याची मला संधी मिळाली नाही. जर समजा मी गुरुजींचा विद्यार्थी असतो तर आज माझ्यात आजच्यापेक्षा काही वेगळा फरक झाला असता का ? मला प्रामाणिकपणे वाटतं की तसा फरक झाला असता. खरं म्हणजे माझा फायदाच झाला असता.

नरहर कुरुंदकर यांचा विद्यार्थी जरी मी नसलो तरी गुरुजींची नांदेड शहरात होणारी व्याख्यानं न चुकता मी ऐकत होतो. त्यामुळं त्यांचा दांडगा अभ्यास, त्यांची व्यासंगाची अखंडता, चिंतनाची खोली आणि आपला मुद्दा पटवून देण्याविषयी त्यांना अवगत असलेलं Logic याचा माझ्यावर तसा खूपच प्रभाव

पडला. त्यांचे मुद्दे मला विनतोड वाटत. त्या त्या प्रश्नांवर त्यांचा एक स्वतंत्र विचार व्यक्त होत असे. ' सुभाषचंद्र बोस ', ' पंडित जवाहरलाल नेहरू ', ' हिंदु-मुस्लिम प्रश्न ', ' राष्ट्रीय एकात्मतेचा प्रश्न ' ही त्यांची व्याख्यानं मी ऐकली. मला माझ्या विद्यार्थिदशेत ती खूपच आवडली होती. त्यांच्या व्याख्यानाचा एक श्रोता एवढाच त्यांचा माझा पहिला ऋणानुबंध म्हणायला हरकत नाही.

मी एस. एस. सी. जिल्हा परिषदेच्या शाळेत केली असली तरी कंधारला चालू असलेल्या ' शेकाप 'च्या मार्क्सवादी विचारांचा आणि चळवळीचा माझ्यावर खोल असा संस्कार झाला होता. नरहर कुरुंदकर हे जाहीरपणे स्वतःला मार्क्सवादी म्हणवून घेत आणि त्यामुळंच नरहर कुरुंदकर यांचं चिंतन मला कुठंतरी माझंच वाटू लागलं. त्यांच्याजवळ ओजस्वी असं शब्दसामर्थ्य होतं. माणसांच्या अंतःकरणाचा ठाव घेणारी वक्तृत्वशैली त्यांना लाभलेली होती. हजारो लोकांना मंत्रमुग्ध करण्याचं प्रचंड सामर्थ्य त्यांच्या अमोघ वाणीमध्ये होतं. ओजस्वी शब्द-सामर्थ्य आणि तेजस्वी विचार यांचा मेळ जेव्हा जमतो त्यावेळीच आत्म्याचं खरं-खुरं शुद्धीकरण होत असतं आणि जी हे कार्य करते ती श्रेष्ठ कला होय असं मी मानतो. नरहर कुरुंदकरांच्या सहवासात आणि संपर्कात मला सतत एक जाणवत आलेलं आहे की, गुरुजी म्हणजे श्रद्धा, आशा आणि औदार्य यांचं मूर्तिमंत प्रतीक होते. तसंच ज्ञान, विज्ञान आणि कला यांच्यातील आधुनिकता समजून घेणारे ते एक भाष्यकार होते. त्यांची स्मरणशक्ती तलवारीच्या धारदार पात्यासारखी चक-चकती होती. त्यांनी जाणीवपूर्वक आपल्या स्मरणशक्तीचा आणि कल्पनाशक्तीचा विकास केलेला होता. जीवनातील महत्त्वाचे प्रश्न त्यांनी लोकांमधील तर्कशुद्ध संबंधाच्या आकलनातून मांडले. जे पटलं ते मांडायला ते मुळीच घाबरत नव्हते. आणि म्हणूनच नरहर कुरुंदकरांच्या विचारप्रक्रियेचा मी सहप्रवासी होऊ पाहत होतो. गुरुजींचं वाचन जेवढं दांडगं होतं, तितकंच ते चौफेर आणि विविधांगी होतं. जे कसलंच वाचन करीत नाहीत पण सर्वत्र सर्वज्ञ म्हणून वावरतात अशा महापंडितांची वानवा आज राजकारणातही नाही आणि मराठी वाङ्मयात तर या प्रवृत्तीचं कॉंग्रेस गवत आता खूपच वाढलं आहे. ज्यांना साहित्याचं मोल नाही, वाचनाची गोडी नाही, नाटकाबद्दल ओढ नाही, कलेबद्दल प्रेम नाही, अशी माणसं म्हणजे पशूंच्या पातळीवर आपलं जीवन कसंबसं ओढत राहतात इतकंच. त्यांची कीवच केलेली बरी. अशी माणसं जीवनातील अभिजात सौंदर्याला आणि अद्‌भुततेला कायमची मुकतात. जीवनातील मौजेची हे लोक हत्याच करून टाकतात. यशवंत-राव चव्हाण, नरहर कुरुंदकर यांचं वाचन पाहता असं वाटतं की, असली सुसंस्कृत माणसे आज आपल्याजवळ किती आहेत ? माझ्या पिढीनं या मंडळींच्याकडून ज्याचं अनुसरण करायलाच हवं असा हा गुण आहे. जे केवळ अवगुणच पाहातात

ते कधीच पुढे जात नाहीत. नरहर कुरुंदकर असोत वा यशवंतराव चव्हाण असोत यांच्याशी असलेले माझे ऋणानुबंध या मोलाचे आहेत. कारण ही माणसंच लाख-मोलाची आहेत.

१९७८ च्या दरम्यान मी ' युगकर्ता ' हे नियतकालिक काढायचा निर्णय घेतला. भोवतीचं वास्तव पाहून माझ्यातला पत्रकार माझ्या आत घुमसत होता. पहिल्या अंकाचं प्रकाशन करण्यासाठी नरहर कुरुंदकर यांच्या नावाशिवाय माझ्या-समोर दुसरं नाव नव्हतं. ३१ डिसेंबर १९७७ ला बीडला मी चालवीत असलेल्या राजर्षी शाहू व्याख्यानमालेत गुरुजी येऊन गेले होते. ' बीडला येणे व तुम्ही ठरवाल तिथे व्याख्यान देणे मान्यच आहे. वाद तारखांचा चालू आहे.' या त्यांच्या पत्रा-नुसार मी त्यांचा पाठपुरावा केला आणि ते आले. ' शांतिदूत जवाहरलाल नेहरू ' या त्यांच्या लाडक्या विषयावर ते बोलले. व्याख्यान खूप गाजलं. रात्री माझ्या घरी ते आवर्जून जेवायला आले. गुरुजींना कोंबडीचं मटन फार आवडत असे.

१ मे १९७८ ला ' युगकर्ता 'चं प्रकाशन ठरलं. गुरुजी कोल्हापूर–सांगली इकडची व्याख्यानं आटोपून वार्शीमार्गे केवळ माझ्या प्रेमाखातर इतका अवघड प्रवास करून आले. ' युगकर्ता 'चं प्रकाशन तर होतंच. गुरुजी डोंबिवलीच्या साहित्य संमेलनाचे अध्यक्ष झाले होते. त्याप्रीत्यर्थ आम्ही त्यांचा शाल आणि श्रीफळ देऊन प्रकाशन समारंभातच सत्कार केला. ' युगकर्ता 'च्या प्रकाशन समा-रंभात बोलताना गुरुजी म्हणाले, " कल्याणकरांनी ' युगकर्ता ' हे नियतकालिक चालविण्याचा निर्णय घेतला आहे. त्यांनी फार मोठं धाडस केलं आहे. सत्य लोकां-समोर मांडण्यासाठी ते घाबरणार नाहीत याची मला खात्री आहे. हे सत्य मांडत असताना त्यांना आपल्या घरावर लोकांचे दगड पडताना दिसतील. त्यावेळी ते मुळीच कचरणार नाहीत. त्यांना मी विद्यार्थी चळवळीचा एक क्रियाशील नेता म्हणून पाहिलं आहे." गुरुजी जेव्हा जेव्हा बीडला आले तेव्हा तेव्हा ते माझ्या घरी जेवण घेऊनच परतले.

नरहर कुरुंदकर जसे ' युगकर्ता 'च्या प्रकाशन समारंभासाठी आले तसेच ते माझा पहिला कवितासंग्रह ' उठाव 'च्या प्रकाशन समारंभासाठी आले. ' उठाव 'चं प्रकाशन कविवर्य श्री. नारायण सुर्वे यांच्या हस्ते झालं. नरहर कुरुंदकर समारंभाचे अध्यक्ष होते. हे दोन्हीही साहित्यिक माझ्या व्यक्तिशः जिव्हाळ्यातले तर होतेच आणि त्यांच्या भूमिका माझ्या विचार आणि कृतीशी जुळत होत्या. श्री. नारायण सुर्वे यांनी आणि वक्त्यांनी ' उठाव 'मधील कवितांचा विद्रोह, समाजव्यवस्थेविरुद्धची कवितेनं पुकारलेली बंडखोरी आणि कवितेत उतरलेली क्रांतिकारकता यासंबंधी विचार मांडले होते. आपल्या अध्यक्षीय भाषणात गुरुजी म्हणाले, " ' उठाव ' मध्ये

क्रांतिदर्शी कविता आली आहे ही खरी गोष्ट आहे. वा. हृ. कल्याणकरांचा ' उठाव शोषण आणि दमनाविरुद्ध आहे हेही सत्यच आहे. त्यांच्या विद्रोही कवितेइतकीच त्यांची निसर्गकविताही तितकीच उत्कट आणि समर्थ अशी कविता आहे." आणि यांनी ' उठाव 'मधली निसर्गकविताच म्हणून दाखविली.

"गर्द जांभळीच्या बनात
उधाणले नक्षत्रांचे पूर
आकाशाचाही भरून येतो
निळासावळा ऊर
पापणीतले डोह तुडुंब
वीज लेवून मेघ उतरले
चांदण्याच्या घट्ट चोळीत
चंचल चंद्र मंतरले
मुक्या–मुक्यांनी झाड
झेलते उष्ण श्वास
चंद्र सकाळले ओठात
न्हाले चांदणीचे ध्यास
गीत वेचुन मेघवनातले
असे पांगले पक्षी
उष्ण श्वासांच्या मिठीत
कड्यांवर गोंदिली नक्षी."

मी कवी म्हणून नुकताच मराठी साहित्याच्या क्षेत्रात उतरत होतो. कविवर्य श्री. नारायण सुर्वे आणि नरहर कुरुंदकरांसारख्या जीवनवादी कलावंतांची शाबासकी मला लाख मोलाची वाटते. गुरुजी सत्य मांडायला कुणाची पर्वा करीत नसत. जी माणसं अस्सल असतात त्यांचे विचारही बावनकशी सोन्यासारखे असतात आणि सच्च्या कलेच्या अभिव्यक्तीमध्ये सत्य हे निखळपणे उठून दिसतं. कलेमधला सच्चेपणा टिपण्याची सूक्ष्म अशी संवेदना हे गुरूजींचं खास वैशिष्ट्य होतं. सृजनशील भावनेची निर्मिती म्हणून कलेचं कौतुक करण्याचा त्यांना कधी कंटाळा आला नाही. त्यांना काव्यामधला आनंद जाणवायचा. जीवनातील असभ्यतेचा बुरखा फाडत असताना ते निर्भय होत असत. त्यांना जीवनातील खूप गोष्टी ज्ञात होत्या. सततचा प्रवास आणि वाचन-चिंतनातून त्यांनी त्या कमावलेल्या होत्या. शिक्षकांना सर्व काही माहीत असलं पाहिजे. असं खूप काही माहीत असलेले गुरुजी हे लोकशिक्षक होते. त्यांच्याशी बोलताना हरएक क्षणाला हे जाणवायचं. ते अत्यंत सहानुभूतीनं, गंभीरपणे आणि कळकळीनं बोलत असायचे. स्वतःची टवाळी करून घ्यायची खोड

त्यांच्या बोलण्यातून जाणवायची. त्यांचं राहणं आणि बोलणं सहज आणि साधं असायचं. मोठी माणसं खूप साधी असतात, हे त्यांच्याकडे पाहताना पटायचं. त्यांनी आपल्या जीवनात खूप उच्च अपेक्षा जोपासल्या होत्या. त्यांना माणसांचं प्रचंड वेड होतं. प्रवासाची अखंड आवड होती. आपल्या वक्तृत्वानं समोरच्या माणसांना भारावून टाकण्याची कला त्यांना चांगलीच अवगत झाली होती. 'उठाव'चं कौतुक करणारे गुरुजी मला 'तांबडं फुटलं' या माझ्या चौथ्या कवितासंग्रहाला 'सोव्हियेत लँड नेहरू अवार्ड' मिळाला त्यावेळी आठवले. 'उठाव' हा माझा पायप्रवास होता. त्यावेळी मला प्रोत्साहन, कौतुक हवं होतं. ते गुरुजींनी तोंडभरून केलं. त्या प्रसंगाची आठवण माझ्यात आजही ताजी आणि तुडुंब आहे. हे मला जेव्हा जेव्हा आठवतं तेव्हा मॅक्सिम गोर्कीनं अन्तोन चेखोव-विषयी लिहिलेल्या ओळी आठवतात—

"अशा माणसाची आठवण केल्याने चांगले वाटते. जणू आनंदीपणा अचानक भेटीला आला असे वाटते. त्यामुळे आयुष्याला स्पष्ट अर्थ लाभतो. मानव हा विश्वाचा अक्ष आहे.

मग तुम्ही विचाराल, त्याचे दुर्गुण ? त्याच्या उणिवा ?

आपल्या बरोबरीच्या लोकांच्या प्रेमासाठी आपण सर्व भुकेले असतो, आणि माणूस जेव्हा भुकेला असतो तेव्हा अर्धाकच्चा घासही गोड लागतो."

'युगकर्ता'चा १९८० च्या दरम्यानचा अंक गुरुजींना आवडला. त्यांनी १६–१२–८० च्या पत्रात मला लिहिलं, "युगकर्ताचा ताजा अंक पोचला. शेतकरी आंदोलनावरील लेख आवडला. शेतकऱ्यांचे प्रश्न जितके आग्रहाने आणि तपशिलाने चर्चिले जातील तेवढे हवेच आहे. तुम्ही वारंवार या विषयावर लिहावे असे वाटते."

१९७७ ला नरहर कुरुंदकर पीपल्स कॉलेज नांदेडचे प्राचार्य झाले. मी त्यांना अभिनंदनाचं पत्र पाठवलं. १९–८–७७ च्या पत्रात त्यांनी लिहिलं, "आपण केलेल्या अभिनंदनाबद्दल आभार.

ता. क.–प्राचार्य म्हणजे काय ? मोठ्या घंटा वाजत राहाव्या, वर्ग वेळेवर चालू व्हावे व सुटावे यासाठी आपल्या टेबलावरील छोट्या घंटा वाजविणारा माणूस. कल्पकता, भाग्य, गौरव इ. बाकी उपचार. ग्रँट, पगार, मीटिंग, मेमो, इमारती इ. इ. तेवढे सत्य."

माझ्या काही हितशत्रूंनी १९७९ च्या दरम्यान माझी बदनामी करण्याचा जाणीवपूर्वक कट केला होता. मी मोठ्या दुष्टचक्रातून जात होतो. गुरुजींचं ८–११–७९ चं पत्र आलं.

"काल नांदेडला आलो. तुमचे मागचे पत्र व हे ताजे पत्र अशी दोन पत्रे मिळाली. आपले मन शांत, कृती निश्चित व स्पष्ट असावी. बाकी ज्यांना जे करायचे ते करोत. जगाला फार वेळ फसवता येत नसते. दुष्टाचा प्रतिकार करावाच पण चिंता फार करू नये. पुढे सरकणाऱ्या माणसाला शत्रू असतातच. त्याची खंत नको. संग्रह प्रकाशित झाले म्हणजे मला पाठवावे. आशा, स्नेह, आशीर्वाद कायम समजावा."

'उठाव' प्रकाशित झाल्यानंतर त्यांनी 'उठाव' सविस्तर वाचला. माझे मित्र श्री. कृष्णा हातोटे यांच्याजवळ बोलताना त्यांनी सांगितलं," वा. ह. कल्याणकर यांची 'उठाव'मधील कविता वाचताना जर्मन कवी Rainer Rilke (रेनर रिल्के) यांची आठवण होते. कवितेतील प्रतिमा आणि व्यवस्थेविरूद्ध लढणारा बाणा पाहता हा कवी रेनर रिल्केप्रमाणेंच आपल्या समाजाविरुद्ध उभा राहतो."

१९७७ ला झालेल्या मराठवाडा साहित्य परिषदेच्या निवडणुकीत आमचा तरुण गट पूर्ण तयारीनिशी उतरला होता. मराठवाडा साहित्य परिषद कशी चालवू नये याचा उत्तम असा निष्क्रिय प्रयोग सध्या मराठवाडयात चालू आहे. साहित्य परिषद मराठवाडयाची पण मिरवलं जातं ते मराठवाडयाबाहेरील साहित्यिकांना. जणू मराठवाडयातील साहित्यिक मोठे होऊच नयेत यासाठी. मराठवाडा साहित्य परिषदेची स्थापना झाल्याचं सारं वातावरण आजही जिवंत ठेवलं आहे. संस्थांना जेव्हा कॅन्सर होतो तो माणसाच्या कॅन्सरपेक्षा वाईट असतो. आम्ही साहित्य परिषदेच्या राजकारणात उतरण्याचं ठरविलं. आमचा गट बहुमतानं निवडून आला. आमच्यातले काही मित्र अवसानघातकी निघाले. आणि मी माझ्यापुरता निर्णय घेतला तो असा की, नरहर कुरुंदकरांना बिनविरोध अध्यक्ष करायचं आणि तसं पत्र त्यांना पाठविलं. नरहर कुरुंदकरांनी १६–१०–७७ मला पत्र पाठविलं, "तुमची सर्व पत्रे मिळाली. त्या पत्रांचे उत्तर काय द्यावे हे मला कळत नसल्यामुळे मी फक्त गप्प होतो. माझी पद्धत विश्वासाने आणि मोकळेपणाने वागण्याची आहे म्हणून तुम्हाला मी सगळेच सांगतो."

A– " पत्रव्यवहारात अनेकांनी मला कळविले की, कल्याणकर फक्त ६ मते द्या म्हणून सांगत आहेत. त्यात तुमचे नाव नाही. तुम्हाला पराभूत करण्याची धडपड अनेकजण करीत आहेत."

B– " ह्यापेक्षा अगदी निराळे तुमचे पत्र होते. मी काय म्हणणार ? मी मला मत द्या असेही सांगत नाही. मला मत देववा असेही म्हणत नाही. मी कधी असल्या वादात नसतो. ज्यांना जे योग्य वाटेल ते त्यांनी करावे. माझी गरज असेल तर मी जमेल ते काम करीन. गरज नसेल तर मी आपला घरी गप्प आहे. इतकीच माझी भूमिका."

" मी निवडून आलो हेसुद्धा मला औरंगाबादला गेल्यावर ८ ऑक्टोबरला कळले."

" आता नवा अध्यक्ष. मी मागेही सांगितले होते की, मी राहणार नांदेडी, काम औरंगाबादी. म्हणून मी नावाचा अध्यक्ष. काम करणाऱ्यांना साह्य-सल्ला. एरव्ही मी नांदेडला आहे. आजही माझी भूमिका तीच आहे. औरंगाबादला दोन मते कानावर आली."

A– " तुम्ही आता अध्यक्ष होऊ नये."

" मी म्हटलं मला मान्य आहे. मी तर निवडणुकीसही उभं राहणार नव्हतो. शेवटच्या क्षणी आग्रह फार झाला. उभा राहिलो, तेव्हा नवा अध्यक्ष मला मान्य आहे."

B– " ह्या वेळेपुरते तरी तुम्ही राहिले पाहिजे."

" मी म्हटले मागेही अनेक अध्यक्ष झाले, पुढेही अनेकजण अध्यक्ष होतील. व्यक्ती कधी अनिवार्य नसते. पण सर्वांचा आग्रह असेल, एकमताने अध्यक्षपद येत असेल तर नामधारी म्हणून बसण्यास मी तयार आहे."

" मी मुद्दाम आपला मित्र व सहकारी म्हणून तुम्हाला मोकळेपणाने सांगत आहे. मला सत्तेची हौस कधी नव्हती. कुलगुरुपदही नको म्हणणारा व प्राचार्यपद गेली कित्येक वर्षे टाळणारा मी माणूस. मला म. सा. प. चे अध्यक्षपद लढून जिंकण्याची जागा वाटत नाही."

" परिषदेचे काम सुरळित चालावे. त्यासाठी सांगाल ते व जमेल ते करू इतकी साधी माझी भूमिका."

" आता व्यक्तिशः तुमच्याविषयी. तुम्हाला मी वर्षानुवर्षे ओळखतो. इतर कुणाच्या सांगण्यावरून, इतरांच्या पत्रावरून अगर अफवांवरून तुमच्याविषयी मत कसे बनवीन ? मला कुठे चूक दिसली तर बाजूला नेऊन सांगीन. एखादी गोष्ट पटली नाही तरी आमच्यासाठी करा असे सांगीन. मी असे मानतो की, हा माझा हक्क आहे. तेव्हा कोणताही अवांतर विचार मनात नसावा. माझा तुमच्याविषयी कोणताही गैरसमज नाही."

मी गुरुजींचं पत्र अशासाठी इथं देतो की, मराठवाड्यात चालू असलेल्या साहित्यातील गलिच्छ राजकारणात गुरुजी आणखी वेगळे होते. त्यांना साहित्यात ज्यांची मक्तेदारी होती त्यांच्यासोबत राहावं लागलं हे खरं, पण त्यांनी मराठवाड्यातील गुणवंत कलावंतांचा दुस्वास वा द्वेष कधी केला नाही. प्रसंगी ते त्यांच्या



अनुक्रमणिका

पाठीमागेच उभे राहिले. त्यांच्या पाठीत खंजीर खुपसणाऱ्यांच्या सोबत ते दिसले तरी अशा कृत्यात ते कधीच नव्हते.

२३-१०-७७ ला झालेल्या म. सा. प. च्या बैठकीत अध्यक्षपदासाठी गुरुजींचं नाव मी सुचविलं आणि ते एकमतानं मंजूर झालं. "नरहर कुरुंदकरांसारखा विचारवंत आपल्या परिषदेवर आहे. आपण त्यांचं नेतृत्व स्वीकारून आपला गौरव करून घ्यावा." ही माझी भूमिका होती.

१९७७ ला आम्ही मराठवाड्यातली सारी मातब्बर मंडळी परिषदेवर घेतली. श्री. गजमल माळी, श्री. रा. रं. वोराडे, श्री. यु. म. पठाण, श्री. भालचंद्र नेमाडे या सर्वांना आम्ही जाणीवपूर्वक परिषदेवर घेतलं. या मंडळींना म. सा. प. नं कधीच विचारलं नव्हतं. याचवेळी आम्ही डॉ. एस. एस. भोसले यांची महात्मा जोतीराव फुले यांच्या वाङ्मयावरची तीन व्याख्यानं घेतली. नरहर कुरुंदकर या व्याख्यानमालेचे अध्यक्ष होते. मराठवाड्यातील एका जातीय अहंतांनी रोगग्रस्त अशा दैनिकानं अग्रलेख लिहिला, "म. सा. प. अतिरेक्यांच्या हाती गेली" म्हणून. नरहर कुरुंदकर "नरो वा कुंजरो वा" या भूमिकेनं गप्प बसले. याचं आम्हाला खूप वाईट वाटलं. माणूस त्याच्या मर्यादांनीच मोठा असतो याला नरहर कुरुंदकरसुद्धा अपवाद नव्हते.

१९७७ ते १९८० या काळात पुलाखालून खूप पाणी वाहून गेलं. नरहर कुरुंदकर आणि आम्ही आणखी जवळ आलो. मराठवाडा साहित्य परिषदेत काम करताना त्यांची भूमिका सहिष्णुतेची होती. सामुदायिक जाणतेपणाची होती. त्यांच्यातील प्रतिभाशाली विचारवंताला ती शोभणारी होती. त्यांचा लोकशाही पद्धतीनं काम करण्यावर विश्वास होता. मात्र गुरुजी परंपरावादी आणि सनातनी प्रवृत्तींच्या मंडळीत अडकले होते. त्यांच्याभोवती हेच लोक होते. कदाचित जात म्हणून असेल, कदाचित हितसंबंध म्हणून असेल गुरुजी या मंडळींत गुरफटले होते हे खरं. तरीही नरहर कुरुंदकर या सर्वांपेक्षा वेगळे होते. सरस तर होतेच. नरहर कुरुंदकर स्वतंत्र प्रतिभेचे विचारवंत होते. आणि त्यांच्यातील या स्वतंत्र प्रज्ञेची किंमत द्यायची त्यांची तयारी होती. लोकशाही ही केवळ विचारपद्धती नाही तर ती एक उच्च आणी आचरणपद्धती आहे, सुसंस्कृत मानवसमाजाची ती जीवनपद्धती आहे यावर त्यांचा विश्वास होता. भोवतीचं सनातनी वर्तुळ ओलांडून ते समाजात पसरत होते. लोकांवर प्रचंड प्रेम करणारा हा माणूस होता. माणसं गोळा करणं, त्यांना फुलवणं, प्रवास करणं आणि अखंड वाचन करणं याचं नाव होतं नरहर कुरुंदकर. महाराष्ट्रभर ते फिरत होते. त्यांच्या पायाला त्यांनी वैचारिक प्रवासाचं चक्रच बांधलेलं होतं आणि यासाठी सबंध जीवनाचं दान त्यांनी आपल्या समाजाला

दिलं. नरहर कुरुंदकर तरुण माणसांच्या निमंत्रणावरून महाराष्ट्राच्या सर्वदूर अशा इलाख्यात फिरत राहिले. विचार पेरत राहिले. माणसं बांधत राहिले. यातूनच त्यांचं लोकोत्तर व्यक्तिमत्त्व उत्तुंग झालं, उन्नत झालं. विचार, चिंतन, वाचन, अभिव्यक्ती, स्वतंत्रता यांना त्यांनी वाहून घेतलं होतं. हीच त्यांची उभारणी होती, रचनात्मकता होती. सारी वर्तुळं ओलांडून गुरुजींचा आमच्या पाठीवर स्नेहाचा, आशीर्वादाचा हात फिरत राहायचा. त्या हातात स्नेह होता, आपुलकी होती. खूप काही माहीत असलेल्या माणसाची ती माया होती आणि आजही त्यांचा आम्हाला अभिमान आहे.

मराठवाडा साहित्य परिषदेच्या व्यासपीठावर आम्ही पुनःपुन्हा भेटलो. मात्र मराठवाड्यातील प्रतिगाम्यांना नरहर कुरुंदकरांचं हे वैभव देखवेना. नरहर कुरुंदकरांचं मराठवाड्यापेक्षा उंच आणि मराठवाड्यात न मावणारं प्रचंड व्यक्तिमत्त्व पाहून त्यांना त्यांच्या मत्सराचा रोग न झाला तरच नवल. मराठवाड्याच्या नावाचा टिळा लावून मराठवाड्यातील कर्तृत्वाची हत्या करण्यातच आपलं कर्तृत्व जपणाऱ्या मंडळींपेक्षा नरहर कुरुंदकर लाखपट आम्हाला जवळ होते. नरहर कुरुंदकरांनी महाराष्ट्रात मराठवाडा मोठा केला. मायमराठीचं माहेर असलेल्या मराठवाड्याचा थोर वारसा त्यांनी एक बांधिलकी म्हणून सांभाळला. इकडे आमच्यातील खुजे पत्रकार आणि समीक्षक मराठवाड्याच्या मातीची भाषा बोलत बोलत मराठवाड्याची माती करण्याचे मनसुबे रचत राहिले. त्यांचं नाव त्यांच्या गल्लीच्या बाहेर कुणाला ऐकू जात नाही, हा भाग वेगळा !

१९८० साली मराठवाडा साहित्य परिषदेची त्रैवार्षिक निवडणूक जवळ आली. आणि मराठवाड्यातील तरुण रक्ताला मसापमधून कसं हुसकून लावावं यासाठी मराठवाड्यातील अनेकांनी भ्रष्ट युत्या करून आम्हाला मसापच्या निवडणुकीत साफ लोळवलं. उच्च नीतिमत्तेच्या गप्पा मारणाऱ्यांनी लोकशाहीचा खून करून निवडणूक जिंकली. त्यात सत्यशोधक गजमल माळी होते. आणि अगदी मूकपणे नरहर कुरुंदकरही होते. आम्ही एकाकी पडलो. कुणाचाच आधार नाही आणि विश्वासही नाही. त्या धामधुमीत गुरुजींचं २७–८–८० चं पत्र आलं.

"मुद्दाम पत्र पाठवीत आहे. २५–८ ला सगळे कार्यक्रम आटोपून इथे नांदेडला येऊन पोचलो तो ६–७ पत्रे वाट पाहत होती २२–८ नंतर आलेली. या पत्रांच्या मध्ये शिव्या आहेत, धमक्या आहेत. उपदेश आहे. समक्ष तपशील सांगीन पत्रे निनावी आहेत. काही शिव्या तुम्हालाही आहेत."

"ही पत्रे वाचल्यानंतर मी निवडणुकीस उभे न राहणे याचा अर्थ धमक्यांना भिणे असा होतो. म्हणून उभे राहण्याचा निर्णय घेत आहे. निवडणूक

लढवीत आहे. लढणार आहे. पराभूत होण्याची मनाची तयारी ठेवून निवडणूक लढवीत आहे."

"शिव्यांचा संबंध माझ्याशी व्यक्तिशः आहे. जातीला आहेत. नामांतर प्रश्नावर आहेत. फ. मु. शिंदे व कल्याणकर यांच्याशी मैत्री ठेवण्यावर आहेत. शिव्या भरपूर आहेत त्याविषयी तक्रार नाही."

"तुम्हाला माहीत असावे म्हणून हे पत्र नाहीतर तुम्ही म्हणाल मानाने सांगितले तेव्हा पानावर आला नाहीत आणि अंधारात मात्र तुकडे चोरीत बसलात.'

नरहर कुरुंदकरांचं पत्र तेव्हाच्या परिस्थितीच्या संदर्भात खूपच बोलकं आहे. मी त्यांना निवडणुकीस उभे राहा आणि पुरोगामी गटाचं नेतृत्व करा अशी विनंती पुनःपुन्हा करीत होतो. गुरुजी ते टाळू पाहत होते. नंतर ते का उभे राहिले? राजकारण कसं शिजलं? आणि गुरुजींनी घूमजाव का केलं? यासंबंधी इथं लिहिणं मला अस्थानी वाटते. राजकारणात हे चालायचंच.

नंतर निवडणुकीत आमचं पानिपत झालं. पराभूत उमेदवारांत मी पहिला उमेदवार होतो. आमचा पाडाव झाला. पोत्यांनी बॅलेट पेपर्स गोळा करण्याचं काम लोकशाहीवर अग्रलेख लिहून पवित्र होणारी मंडळी करीत होती. सारं घरच्या घर मराठवाडा साहित्य परिषदेचे सदस्य म्हणून रसिक बनत होतं. तसं सारं हे मनोरंजकच होतं. नरहर कुरुंदकर विजयी झाले हे विशेष. मी थोडा रागावलोच होतो. त्याच मनोवस्थेत मी गुरुजींना पत्र लिहिलं. तुमचा गट निवडून आला म्हणून त्यांचं अभिनंदन केलं. तुमच्या नेतृत्वाखाली पोती भरून बॅलेट गोळा करण्याचं जे उत्तमपणे काम झालं त्याबद्दल कौतुक केलं. आणि शेवटी पत्रात लिहिलं की, "आज तुमच्या नेतृत्वाखाली हे बॅलेट गोळा करण्याचं काम झालं. उद्या साखर कारखान्याचे अध्यक्षही असं काम करून मसापचे अध्यक्ष होतील."

आणि १०–१०–८० चं गुरुजींचं पत्र आलं. 'तुमचे पत्र पावले. निवडणूक निकाल मला इथे १–१० ला सकाळी कळला. मी फार रस घेत नसतोच. निवडणूक निकालानंतर वातावरण गरम असते ते थंड होऊ द्यावे म्हणून उत्तर न देता थांबलो. तुमची मते मला मिळणार याबाबत मला कधीही शंका नव्हती. तुमचे माझे संबंध निवडणुकीमुळे आलेले नाहीत. ते त्यापेक्षा खूप जुने आहेत. गाढ आहेत. चर्चा सर्व आहेत. निवडून आलेल्या पॅनलला माझा पाठिंबा आहे ही चर्चा आहे. माझे पॅनल व माळीचे पॅनल अशी लढत होऊन माझे पॅनल पडले अशी चर्चा आहे.

चर्चा अनेक आहेत. सर्व मराठवाड्यात तुम्ही उभे राहा असे एखादे माझे पत्र अगर अमक्याला मत द्या असे एखादे पत्र जर मला कुणी दाखवले तर मी किती तरी आभारी होईन. इथे नांदेडला लिफाफे गोळा करण्याचे काम झालेच. इथे तरी मी कुणाला सल्ला दिल्याचे दाखवावे, पण माणसे चर्चा करणार त्याला मी काय करणार?"

कल्याणकरला तुम्ही लाडावून ठेवले. मांडे कुरुंदकरांच्या आग्रहाने उभे राहिले. कुरुंदकरांना सत्तेचा मोह सुटत नाही. असे ज्याला जे वाटेल ते तो बोलतो. मी काय करणार ? मी काही इन्काराची पत्रके काढू शकत नाही.

आता तुमच्या पत्रात, माझे पॅनल निवडून आल्याचे अभिनंदन आहे. हेच तुमचे मत असेल तर तेही मला मान्य आहे.

ही गुरुजींची खास शैली होती. दोन्ही बाजूंना ते जवळचे वाटत होते. विचारांच्या बाबतीत ते आमच्या बाजूला होते. प्रत्यक्ष कृतीच्या बाबतीत ते आमच्या बाबतीत गप्प होते. अर्थ उघड होता, ते आमच्या विरोधात होते. तरी आमचं त्यांच्यावर प्रेम होतं. १९७४ ला प्रतिभा निकेतन कॉलेजमध्ये गुरुजींनी माझी तब्बल पाऊण तास मुलाखत घेतली होती. आणि तारेनं प्राध्यापक म्हणून जॉइन व्हा असं मला कळविलं होतं. पार्टटाइम जागा असल्यामुळं तियं मला घ्यायला विरोध झाला नसावा. आणि मी अशा जागेवर थांबणं शक्यही नव्हतं. मला सारेचजण घाबरत होते. गुरुजींनी त्यावेळी मोठा आधार दिला. हा आजही मला लाखमोलाचा वाटतो.

गुरुजी आज नाहीत. आज आहेत फक्त त्यांच्या आठवणी. ओल्या स्नेहानं भिजलेल्या. सहा फूट उंचीचा. साध्या राहणीचा, उच्च विचारानं उत्तुंग असलेला एक तगडा विचारवंत अकाली आम्हाला सोडून गेला. आज गुरुजी हवे होते असं पुनःपुन्हा वाटतं. १० फेब्रुवारी १९८३ ला गुरुजी गेले. विश्वास बसेना असली बातमी. डोळ्यांत न मावणारे अश्रू. मी नेहरू, अत्रे आणि गुरुजी यांच्या निधनानं रडलो. अश्रू लाख शब्दांपलीकडचा समुद्र असतात. मृतांच्या देहावर फुले उधळतो आपण. अश्रूएवढी लाख भावनांची फुलं, त्यांची आपण काय किंमत करणार ? दै. लोकमतमध्ये लिहिलेल्या लेखात मी शेवटी लिहिलं होतं–

" गुरुजी गेले. वटवृक्ष कोसळला आहे. आम्हाला गुरुजींशी खूप भांडायचं होतं. आता तेही गेले. आता कुणाशी भांडायचं ? आता इथं सारी झुडपंच राहिली आहेत." नरहर कुरुंदकरांना समजून घेणारा मध्यमवर्ग त्यांचं ऐकायला उत्सुक होता. त्यांचे विचार छापायला, त्यांना पूरक नियतकालिक आणि संस्था होत्या. बहुजन समाजातल्या लेखकासाठी आज हे वातावरण नाही हे खरं.

माझ्या ' तांवडं फुटलं ' कविता संग्रहाला १९८७ चा ' सोव्हियेत लँड नेहरू अवार्ड ' मिळाला. मला गुरुजींची आठवण झाली. ' देशमुख आणि कंपनी ' नरहर कुरुंदकरांचे मातब्बर प्रकाशक. माझी 'अराजक' ही कादंवरी याच संस्थेनं काढली. आणि परत गुरुजींचं स्मरण झालं. ज्याचं पुन:पुन्हा स्मरण होतं ते मरण नसतंच मुळी. गुरूजींचा मधुर-गोड तर कधी तिखट असा हा ऋणानुवंध आहे. त्यांना विसरावं कसं ? मॅक्सिम गोर्कीचे तेच शव्द मला पुन:पुन्हा आठवतात.

"अशा माणसाची आठवण केल्याने चांगले वाटते. जणू आनंदीपणा अचानक भेटीला आला असे वाटते. त्यामुळे आयुष्याला पुन्हा स्पष्ट अर्थ लाभतो."

" आपल्या वरोवरीच्या लोकांच्या प्रेमासाठी आपण सारे भुकेले असतो आणि माणूस जेव्हा भुकेला असतो तेव्हा अर्धाकच्चा घासही गोड लागतो."

१३, शिवनेरी, सेक्टर एफ. एन.–५
श्रीनगर, सिडको, औरंगावाद– ४३१ ००३.



अनुक्रमणिका

# प्रभाकर तेलंग आणि मी

—दादूमियाँ

साहित्यिक आणि मित्र ? त्यावर लेख ?

म. सा. प. च्या संपादकांचे पत्र पाहून मला हसूच आले.

" पत्र, नव्हे मित्र," असू शकेल—

परंतु साहित्यिक आणि मित्र ?

शंकर सारडा संपादक, तेही महाराष्ट्र साहित्य पत्रिकेसारख्या प्रतिष्ठित व वजनदार, आणि पुणेरी वाङ्मयीन त्रैमासिकाचे संपादक. त्यांना वचन तर देऊन टाकले; पण ते पाळणे फार अवघड जाऊ लागले.

तुमच्या आमच्या वाङ्मयीन मैत्रीच्या संबंधावर आपण लेख लिहू इच्छितो, असे एका मराठीच्या प्राध्यापकास सांगताच तो शांतपणे म्हणाला, " तुम्ही भारत-पाक संबंधावर लिहिता तेवढे पुरे नाही का ?"

दुसऱ्या मित्राने लगेच विचारले, " इराक-इराण युद्ध संपले म्हणून तुमचा मोर्चा आमच्याकडे वळला का ?"

तिसऱ्याने स्पष्ट शब्दात सुनावले, " उगाच जेलात जाल. राजीव गांधींशी स्पर्धा करू नका. ते रेकॉर्ड्स करीत सुटले आहेत तेवढे पुरे."

शेवटी निराश झालेल्या मनाला एक सोनेरी किरण दिसला. म्हणून मी 'माय-मराठी' च्या संपादकांकडे धाव घेतली व माझी अडचण सांगितली. तेही " नाही " म्हणतील असे मनात वाटत होते. पण त्यांनी नेहमीच्या बेफिकीर स्वभावानुसार चटकन होकार दिला. ते म्हणाले, " एवढे शत्रू बडोद्यात आहेत, त्यात एकाची जास्तीत जास्त भर पडेल. आणखी काय होणार ?"

माझी भीती दूर झाली.

तेलंगांचे नाव मी विद्यार्थीदशेपासून ऐकत होतो. त्यांचे लेखही वाचत होतो· ते एम. सी. हायस्कूलमध्ये लोकप्रिय शिक्षक होते.

त्यांची रेडिओवर पसंती झाली. त्यांनी विचारले, " कामाची वेळ ?"

" सायंकाळी सहा ते आठ."

" मग आपल्याला नाही जमणार."

" म्हणजे ?"

" सायंकाळी कमाठीवागेत हिंडायच्याऐवजी तुमच्या रेडिओ स्टेशनवर कोण येईल ?"

" तुमची मर्जी."

असे हे ना. सी. फडक्यांचे चेले प्रभाकर तेलंग. सदा हसतमुख, सदा लोकांची थट्टामस्करी करीत फिरणारे विनोदी लेखक व मराठी साहित्याचे प्रेमी व आश्रय-दाते आणि बृहन्महाराष्ट्रातील स्थानिक वडोद्याचे कार्यक्रम महाराष्ट्र टाइम्स व लोकसत्ता यातून 'फ्लॅश' करणारे पत्रकार.

एकदम फटकळ, कोणास केव्हा व काय सुनावतील याचा भरवसा नाही म्हणून वुजुर्ग साहित्यिक मंडळी त्यांनाच दूरच ठेवतात. जुन्या काळी शिक्षक असल्याने शाळेतील विद्यार्थीदशेतील भलत्यासलत्या आठवणी जगजाहीर केल्या तर काय करा ? त्यापेक्षा चार हात दूरच राहा ना असे लोकांचे धोरण.

वडोद्याला नभोवाणी गायकवाडांनी सुरू केली.

नलिनी मोरे व्यवस्थापक होत्या. मेडिकलच्या पहिल्या वर्षात मी शिकत होतो. मी लिहिलेली 'तुळशीचे लग्न' ही नाटिका नभोवाणीने प्रसारित केली. मी मनातल्या मनात मांडे खात होतो, आपण 'नाटककार' झालो.

हाय रे किस्मत,

लेकिन तूने पी ही नहीं -

एका राजकारणी नेत्याच्या मैत्रिणीने त्या नाटिकेत नायिकेची भूमिका केली होती. या 'तुळशी'चे लग्न एवढे गाजले की, नभोवाणीवरून दादूमियाँच्या नाटिका हद्दपार झाल्या. राजकारणाचा पहिलावहिला अनुभव !

नभोवाणीवर मराठी नाटकांची मोनोपोली तेव्हापासून प्रभाकर तेलंग यांच्याकडे गेली.

तेलंग व मी– आमची पहिली जानपहचान अशारीतीने 'नभोवाणी'मुळे झाली. तेलंग मोनोपोलीचे पुरस्कर्ते बनले व मी 'मोनोपोली हटाव'वाला झालो.



अनुक्रमणिका

मी त्यानंतर मेडिकल कॉलेजात संपूर्णपणे बुडून गेलो. सरकारी नोकरीत तेलंग सौराष्ट्रात पोटासाठी हिंडत होते. एक दोन नाही, तब्बल वीस वर्षे.

त्यांची आमची गाठ पडणे शक्य नव्हते. मी प्रिस्क्रिप्शन्स लिहिण्याची सुरुवात केली होती आणि ते हिशेब तपासून त्यावर शेरे लिहिण्यात मग्न होते.

अधूनमधून त्यांचे लेख वाचावयास मिळत. महाराष्ट्र–गुजराथ वेगळे झाले, त्यावेळी त्यांनी संपादन केलेला अनुवाद मासिकाचा 'गुजराथ–दर्शन'चा जाडजूड अंक मला अजून आठवतो. मी 'सह्याद्री' मासिकात लेख लिहावयास सुरुवात केली होती. माझ्या लेखाचे शीर्षक होते– स्ट्रेप्टोमायसिन.

त्यांची व माझी अचानक गाठ पडली ती बडोद्याच्या न्यायमंदिरात. न्याय-मंदिर हे बडोद्याच्या कोर्टाचे नाव. त्याच्या विशाल हॉलमध्ये बडोद्यातील त्यावेळचे सर्व महत्त्वाचे कार्यक्रम होत असत. डॅ. विठ्ठलराव गाडगीळ बृहन्महाराष्ट्राच्या गुजराथ प्रांताचे संमेलन भरले होते, त्यावेळी त्याचे अध्यक्ष म्हणून न्यायमंदिरात आले होते. रमेश मुळगुंद त्यांना घेऊन आले होते. त्यानिमित्ताने प्रसिद्ध झालेल्या व केसरी कार्यालयाने छापलेल्या 'माय-मराठी'च्या विशेषांकात 'बडोद्यातील मराठी साहित्यिक' हा लेख तेलंगांनी लिहिला होता. त्यात माझ्या नावाचा उल्लेख पाहून मी तेलंगांना गाठले व म्हणालो, "थँक यू!"–

त्या नंतर वीस वर्षांनी पुन्हा आमची गाठ बृहन्महाराष्ट्र मंडळाच्या बडोदे येथे भरलेल्या अडतिसाव्या संमेलनाच्या निमित्ताने पडली. तेलंग कार्याध्यक्ष होते. मुख्यमंत्री बाबूभाई जसभाई पटेल उद्घाटक होते. त्यांचे मराठी भाषण खूपच गाजले. अध्यक्ष होते न्यायमूर्ती चंद्रचूड. ते बडोद्याचे मूळ रहिवासी. त्यांचे बंधू सिव्हिल सर्जन होते. हे बृहन्महाराष्ट्राचे अधिवेशन भलतेच गाजले. मेयरने सर्वांना ॲट–होम दिला होता. तेलंगांचा भाव तेव्हापासून वाढला. त्यांच्या गळचात माय-मराठीचे संपादकत्व श्री. मुळगुंद यांनी अडकविले ते अजून चालूच आहे.

दुसऱ्या दिवशी मोठी मजा घडली.

गुजराथी लोकसत्ता दैनिकाच्या शेवटच्या पानावर मध्यभागी न्या. चंद्रचूड यांच्याबरोबरचा माझा डोळचात भरेल असा फोटो प्रसिद्ध झाला. त्याखाली न्या. चंद्रचूड बृहन्महाराष्ट्र अधिवेशनासाठी अध्यक्ष म्हणून मुद्दाम आले वगैरे मजकूर होता.

प्रभाकर तेलंग मला नंतर भेटल्यावर म्हणाले, "थँक यू." त्यांचा दुखावलेला अहंकार त्या शब्दातून जाणवत होता.

त्या 'थँक यू' द्वारा ते जणू म्हणत होते, "साले दादूमियाँजी, स्वागताध्यक्ष मी आणि अध्यक्षांबरोबर फोटो तुमचा!"

पाहुणे म्हणून सुप्रीम कोर्टाचे न्या. धीरूभाई देसाई आले होते. मास्तरांच्या प्रबो-धनासाठी मुकुंदराव किर्लोस्कर व शांताबाई यांना बोलावले होते. गव्हर्नर शारदा मुखर्जी, चंबळ खोऱ्यातील डाकूंना प्रेमाने जिंकणारे राव, मराठा मंदिराचे प्रमुख श्री. गावडे – किती नावे घ्यावीत ?

माझ्या डोळ्यांसमोर नारळीकरांची नू. म. वि. होती. नारळीकर व इतर दहा शिक्षक त्यावेळी आमच्या बडोद्यास आमच्याकडे उतरले होते, माझे वडील वि. पां. नेने त्यावेळी मराठी साहित्यिक क्षेत्रात चांगले परिचित होते. त्यांचा अर्वाचीन मराठी साहित्य हा ग्रंथ निर्मितीच्या प्रोसेसमध्ये होता.

तेलंग एम. सी. हायस्कूलमध्ये एकेकाळी शिक्षक होते. त्यामुळे एक भावना-त्मक लागणी त्यांना होती.

आमचे धोरण उघड होते. चांगले शिक्षक असतील तर चांगले विद्यार्थी तयार होतील.

पाट्या टाकणारे शिक्षक आम्हास नको होते. शिक्षकांचे प्रबोधन करून त्यांचा दर्जा उच्च करावा असे आम्हाला प्रामाणिकपणे वाटे.

त्यासाठी शिक्षकांना निरनिराळ्या क्षेत्रांतील तज्ज्ञ व अधिकारी मंडळींशी Exposure करून देण्याचा आमचा खटाटोप. विद्यार्थ्यांनी थोर लोकांना जवळून पाहिले, त्यांच्याशी बोलले तर त्यांना नवी स्फूर्ती येईल असे आमचे गणित होते.

पण दुर्दैवाने आमचे गणित चुकीचे होते असे नंतर आम्हास कळून चुकले.

मुलांना उत्साह होता. जास्त अभ्यास करण्याची त्यांची हौस होती, तयारी होती.

पण नारळीकर व त्यांची टीम आम्ही आणू शकत नव्हतो. नवऱ्याच्या पगारास जास्तीची भर यासाठी बहुसंख्य शिक्षिका शाळेत येत होत्या. विद्यार्थ्यांना शिक्षण देणे हा त्यांचा प्रधान हेतू नव्हता. त्यांना पगार सरकार देत असल्यामुळे त्यांना ' काढणे ' शक्यच नव्हते.

आमच्या या धूमधडाक्याने त्यावेळच्या गुजराथ राज्याच्या अर्थमंत्र्यांनी आम्हास आम्ही टेक्निकल हायस्कूल सुरू केल्यास अकरा लक्ष रुपये देण्याचे वचन दिले. आम्ही मराठी माध्यमाबरोबर इंग्रजी माध्यमाचे वर्ग सुरू केले. आमच्या काही शिक्षकांना शैक्षणिक आदानप्रदान कार्यक्रमाखाली परदेशी पाठविण्याच्या योजना पुढे आल्या.

पुन्हा मराठी बाणा आडवा आला.

पुन्हा निवडणुका.

पुन्हा प्रचार.

या खेपेस आम्हाला रणजितसिंग गायकवाडांना शाळेचे अध्यक्ष करायचे होते. महाराणी चिमणाबाई त्यांची पणजी. म्हणून त्यांनाही रस.

परंतु–

तीच पात्रे, तोच खेळ, आणि तोच परिणाम.

रणजितसिंग गायकवाड बिचारे वडोद्यातील लोकसभेची निवडणूक जिंकू शकले व खासदार होऊ शकले. मात्र, त्यांना एम. सी. हायस्कूलची निवडणूक जिंकता आली नाही.

एम. सी. हायस्कूल पुन्हा आपल्या मूळपदावर आली आहे. मात्र, आम्ही सुरू केलेले इंग्रजी माध्यमाचे रोपटे आता चांगले फोफावले आहे.

हारलेल्या तेलंग व मी यांनी द. दा. दीक्षित या साहित्यिक श्रेष्ठ मित्राकडे त्या रात्री श्रीखंडपुरीवर ताव मारून एम. सी. हायस्कूल नावाच्या प्रकरणावर पडदा टाकला. तेलंग जेवताना म्हणाले, "मला दिवाकरांची पतंगावरील नाट्यछटा आठवते. पतंग वर गेला, ओढा, पाडा. पतंग काटला गेल्यावर आनंदाच्या टाळ्या."

## काही पथ्ये

राजकारणात प्रत्यक्ष न शिरता राजकारण्यांच्या आतील गोटातील गोष्टी काढून घेऊन त्यावर मल्लीनाथी करण्याचा माझा छंद. त्यामुळे राजकीय वर्तुळात नेमके काय चालते, कसे चालते व का चालते याची चर्चा रंगमंचावरील प्रत्यक्ष नायक व नायिका यांच्या तोंडून ऐकण्याची मोठी मजा येते. दुसऱ्यांची छोटी-मोठी कामे करून देण्याची देखील मजा येते.

या खेळात एकच पथ्य पाळायचे असते. स्वतःसाठी काहीही न मागणे. कोणत्याही स्वरूपात.

तर तुमचा मान राहतो, आदब राहतो. नाहीतर समोरील राजकारणी नेता केव्हाच तुम्हाला खिशात टाकतो, तुमचा उपयोग करतो व नंतर फेकून देतो.

तुम्ही त्या व्यक्तीचे ओशाळे नसाल तर तुमचा तिच्यावर एक अदृश्य धाक राहतो.

साहित्यिक क्षेत्रात अनुभव वेगळा येतो.

राजकारण्यांप्रमाणें साहित्यिक प्रसिद्धीस, नावास, मुलाखतीस व आपल्यावरील लेखांसाठी हपापलेले असतात. त्यांना अॅवॉर्डस्, पारितोषिके, पदव्या भलत्याच आवडतात.

दोघांतील मोठा फरक त्यांच्या चामडीतील. राजकारणी गेंड्याच्या कातडीचे असतात. त्यांच्यावर एकदा टीका केली असली तरी ते ती विसरून पुन्हा तुमच्याशी खेळीमेळीने वागू शकतात. साहित्यिक भलतेच 'टची' असतात. चुकून त्यांच्यावर तुम्ही टीका केलीत, किंवा तसे त्यांना वाटले तर तुमची शंभरी भरली म्हणून समजा. एरवी समंजसपणाच्या किंवा Consideration for others च्या गप्पा मारणारे हे साहित्यिक एकदम लहान मुलासारखे वागू लागतात. ते अबोला धरतील, तोंड चुकवतील, संबंध तोडतील किंवा चिडून तुमच्या मित्रांना तुमच्याविरुद्ध चुगल्या करतील, पण सरळ तुमच्याकडे येऊन खरेखोटे करण्याचे धारिष्ट सहसा दाखविणार नाहीत. राजकीय व्यक्तींपेक्षा त्यामुळे तुलनेने साहित्यिक मंडळी बालिश व अपरिपक्व असतात.

इतरांचे हे अनुभव पाहून व ऐकून तेलंगांशी वागताना मी एक मोठे पथ्य आजवर पाळले आहे. त्यांच्या प्रसिद्धीच्या आपण आड यायचे नाही हे ते पथ्य. सुदैवाने माझे विश्व बरेच मोठे असल्यामुळे हे पथ्य पाळणे फारसे अवघड जात नाही.

तरीही कित्येक वेळा गैरसमज कळत–नकळत होतात व मोठी मौजच उडते.

वसंत साठ्यांनी जनता सत्तेवर होती तेव्हा मला वडोद्यात आकाशवाणीचे मराठी केन्द्र देण्याचे–निदान त्या प्रोसेसला मदत करण्याचे–वचन दिले होते. जनता त्या काळी एवढी लोकप्रिय होती की जनता सरकार निदान दहा वर्षे सहज चालेल अशीच प्रत्येकाची (व माझी) दृढ समजूत होती. त्यामुळे साठ्यांच्या त्या वचनात फारसा अर्थ मला त्यावेळी वाटला नाही.

राजकारणात चढउतार नित्याचे असतात.

जनता सरकार कोसळले व पुन्हा इंदिरा सरकार सत्तेवर आले. नशिबाने, वसंत साठे आकाशवाणी व टीव्हीचे मंत्री झाले. वचनाचे ते पक्के. त्यांचा माझा पत्रव्यवहार झाला. आणि वडोद्यास एकदाचा दर रविवारी मराठीचा अर्धा तास कार्यक्रम मिळू लागला.

प्रत्यक्ष कार्यक्रम सुरू व्हायच्या आधी एक मीटिंग भरली. हा कार्यक्रम बृहन्महाराष्ट्र मंडळामुळे मिळाला असा तेलंगांनी 'क्लेम' करताच मला बडोदेकर मराठी मंडळींना सारा जुना इतिहास सांगावा लागला व वसंत साठे आणि माझ्यातला पत्रव्यवहार दाखवावा लागला. श्रोत्यांची खात्री पटली. तेलंगांची नाही. त्याला नाइलाज होता.

या पथ्याच्या अनुषंगाने आणखी दोन उपपथ्ये–जी मी पाळतो– ती सांगण्यासारखी आहेत.

त्यांच्या 'मायमराठी' मासिकात शक्य तेवढे न लिहिणे. ते संपादक असल्यामुळे मजकुरात काटछाट करण्याचा हक्क अर्थातच त्यांचा आहे. ती काट-छाट का केली, मला का विचारले नाही किंवा एखादा शब्द वा वाक्यरचना सुधरवली—असल्या क्षुल्लक गोष्टींवरून इतर साहित्यिकांत वितुष्ट आल्याशी उदाहरणे मला माहीत आहेत. ही भानगड आपल्यात नकोच म्हणून मी वरील उपपथ्ये अगदी नियमाने पाळीत आलो आहे. त्यामुळे आमचे संबंध व्यवस्थित व मैत्रीचे राहिले आहेत.

## अध्यक्ष रिबेरो

दुसरे उपपथ्य—ते अध्यक्ष असताना आपण त्यांच्या कार्यक्षेत्रात, कार्यकारी मंडळात वा मंचावर उगाच लुडबूड करायची नाही. उगाच स्पर्धा नाही.

मला एका फार मोठ्या साहित्यिक श्रेष्ठीने या बाबतीत सल्ला दिला होता ते म्हणाले, "We are like a jealous woman who does not stand another."

द. दा. दीक्षित नावाच्या वयोवृद्ध साहित्यिकाचा कविता संग्रह प्रकाशित करावयाचा होता. हा प्रकाशन समारंभ आमच्यापंकी कोणीतरी करावा अशी त्यांची इच्छा दिसली. मी त्यांना म्हणालो, "मी तुम्हाला आणखी एक चांगली व्यक्ती (VIP) तुमच्या प्रकाशनासाठी देतो."

"कोण ?"

"रिबेरो ?"

"वा:, मग उत्तमच. पण ते येतील ?"

"ती माझी जबाबदारी."

ते आनंदून गेले. त्यांनी विचारले, "पण हे कसे जमणार ?"

"ते आमच्या रोटरीच्या कार्यक्रमासाठी अमक्या तारखेस शुक्रवारी माझ्या आमंत्रणावरून येत आहेत. आपण तुमचा कार्यक्रम जर साडेसहाला ठेवू शकलो तर आठपर्यंत आम्ही सहज रोटरीत पोचू."

दीक्षितांना कल्पना पसंत पडली.

रिबेरो त्यावेळी गुजराथ राज्याचे सर्वोच्च पोलिस अधिकारी होते. माधवसिंग सोलंकींनी जातीयवादी दंगली सुरू करून गुजराथचे फार मोठे नुकसान केले होते. त्याची परिणती त्यांच्या उच्चाटनात झाली होती. रिबेरोंनी हे जातीय दंगेताव्यात आणून गुजराथमध्ये शांतता प्रस्थापित केली होती. त्यामुळे साऱ्या देशभर त्यांचे नाव झाले होते.

इंग्लंडमध्ये त्यावेळी वर्णद्वेषावरून दंगे सुरू होते. त्यावेळी आर. के. लक्ष्मण यांचे टाइम्समध्ये व्यंगचित्र प्रसिद्ध झाले होते. पंतप्रधान सौ. थॅचर यांना त्यांचे एक सल्लागार सुचवीत आहेत, " रिबेरोंना का नाही लंडनला बोलावून घेत ?"

असे रिबेरो आपल्या कवितासंग्रहाच्या प्रकाशन समारंभास प्रमुख पाहुणे मिळणार म्हणून द. दा. दीक्षितांना अक्षरशः धन्य धन्य झाले.

गर्दी कशी जमवावी याचे शास्त्र तेलंगांना चांगले जमते. लोकांच्या मानसशास्त्राची त्यांची नाडीपरीक्षा उत्तम आहे. त्यांनी सुचविले, " कवितासंग्रहाच्या प्रकाशनासाठी कोणी येणार नाही. आपण माणिकराव आखाड्यातील पटांगणात रिबेरोंचे भाषण ठेवू. भाषणाच्या आधी सुरुवातीच्या पंधरा-वीस मिनिटांत कवितासंग्रहाचे प्रकाशन करून टाकू. नंतरचा कार्यक्रम माणिकराव आखाडावाले करतील. प्रकाशनाचा समारंभ आमचे बृहन्महाराष्ट्र मंडळ करेल, म्हणजे रिबेरोंचा सर्व खर्च माणिकराव आखाडावाले करतील."

मी त्यांना होकार दिला.

कार्यक्रम अफलातून झाला.

कविमहाशयांच्या आनंदास तर सीमाच नव्हती. केवढा श्रोतृवृंद त्यांना लाभला होता.

मात्र, तेलंग व माणिकराव आखाड्याचे चालक डॉ. दिघे मला मंचावर बोलावीत असूनदेखील मी तेथे जाण्याचे नम्रपणे नाकारले. मी या श्रोतृवृंदातच बरा असे मी त्यांना खुणेने सांगितले.

रोटरीच्या कार्यक्रमात मला महत्त्व मिळणारच होते. म्हणून मी येथील मंचावरचा तथाकथित मोठेपणा दूर ठेवू शकलो.

पण हे पथ्य पाळणे फार महत्त्वाचे ठरते.

मला आजवर त्याचा खूपच फायदा झाला आहे.

सुदैवाने, माझे कार्यक्षेत्र साहित्यिक मित्रांच्या कार्यक्षेत्रापेक्षा अगदी भिन्न आहे.

त्यामुळे मी त्यांच्यात लुडबूड करण्याचा प्रश्नच उभा राहात नाही.

You mind your own business हा माझा सर्वांशी जमवून घेण्याचा व यशस्वी ठरलेला मंत्र आहे.

प्रश्न सुरू होतो जेव्हा एक अज्ञात भीती या मित्रांच्या मनावर स्वार होते तेव्हा.

ही भीती, हा आपल्यापुढे जाईल का ? नाकामागून आला आणि तिखट झाला असे तर याच्या बाबतीत होणार नाही ना ?

## उत्स्फूर्त कविमंडळ

तेलंगांचे व माझे एक साहित्यिक साहस सांगण्यासारखे आहे. बडोद्यात कवी बरेच आहेत–हौसे, नवसे व गवसे–त्यांना एकत्र आणून कविसंमेलन भरवावे व पुण्याच्या रविकिरण मंडळासारखे एखादे कविमंडळ स्थापन करावे अशी दुर्बुद्धी आम्हास झाली.

अहमदाबादेस रचना कविमंडळ होतेच. त्याची बैठक बडोद्यात श्री. आनंद माळी या कवींच्या माडीवर आम्ही भरविली. बडोद्यातील ज्येष्ठ कवयित्री अपर्णाबाई देशपांडे यांनी या नव्या मंडळाचे नाव 'उत्स्फूर्त कविमंडळ' असे सुचविले. सर्वानुमते त्या मंडळाच्या अध्यक्षा झाल्या व दादूमिया उपाध्यक्ष, तेलंग खजिनदार व धनंजय मुजुमदार कार्यसचिव. कार्यालय मायमराठी या तेलंगांच्या संपादकीय कार्यालयात ठेवावे असेही ठरले. मंडळाचा गाजावाजा खूपच झाला. या बैठकीस आमंत्रित पाहुणे म्हणून संस्कृत अकादमीचे अध्यक्ष प्रभाकर कवठेकर हे इंदूरहून खास आले होते. त्यांनीही त्यांच्या कविता म्हणून दाखविल्या.

दुसऱ्या बैठकीत माझ्या घरी नागपूरचे कवी (महाराष्ट्र वीज बोर्डाचे मुख्य इंजिनिअर) या संमेलनाचे अध्यक्ष लाभले होते. उत्स्फूर्त मंडळ फुलू लागले.

पण त्यास नजर लागली.

तेलंग ऑडिटर, मी डॉक्टर, मुजुमदार मास्तर, माळी पॅलेसमधला कारकून.

हे कसले कवी ? हे तर उपरे.

विश्वविद्यालयातील मंडळी तीच खरी या साहित्यिक चळवळीचे जनक. हे उपरे त्यांना कसे सहन होणार ?

लगेच मंडळाचे सभासद वाढू लागले. कवितेशी सुतराम संबंध नसलेली नट, (भ्रष्ट) मंडळी यात शिरली. त्यांनी कवितेच्या पालुपदाऐवजी चोपडे, हिशेब, निवडणुका याचा धोषा लावला. कविता जाऊ द्या चुलीत, आधी हिशेब आणा, निवडणुका करा असा लकडा सुरू झाला.

कवितेऐवजी आम्हाला या नव्या मंडळींनी नोटिसा पाठविण्याचा धडाका लावला.

अपर्णाबाई देशपांडे अस्सल कविमनाच्या. त्यांनी तर या नोटिसांचा धसकाच घेतला व राजीनामा दिला. तसेच मंडळ बरखास्त करावे असा ठराव मांडला.

नेहमीप्रमाणे 'झोडा, फोडा, तोडा' अशी हाणामारी सुरू होऊन उत्स्फूर्त कविमंडळ विलयास गेले.

त्याचे अवशेष अजूनही अपर्णाबाईंकडे पाहावयास मिळतील.



अनुक्रमणिका

## 'आमचे गड आम्ही लढवू !'

वडोद्यात मराठी मंडळी भरपूर आहेत. ब्राह्मणसभा, अन्योन्य साहाय्यकारी बँक, एम. सी. हायस्कूल, माणिकराव आखाडा, सी. के. पी. बँक, मराठा मंडळ, कारेली बाग महाराष्ट्र मंडळ वगैरे अनेक मराठी संस्था अस्तित्वात आहेत. त्यांची एक मध्यस्थ संस्था असावी, त्यांची स्वतःची एक वास्तू असावी असा आदर्शवादी विचार एकदा आमच्या डोक्यात आला. या वास्तूत साहित्यिक चळवळी व्हाव्यात असे स्वप्न आमच्या डोळयांसमोर दिसू लागले. त्या दृष्टीने पुन्हा आम्ही सर्वांना गोळा करण्याच्या उत्साहात एका रविवारी सकाळी नऊ वाजता आमचे एक साहित्य विक्रेते मित्र श्री. नागेशराव काटे यांच्या घरी सर्वांना आमंत्रण दिले. जमीन आपल्याला गायकवाडांकडून सहज प्राप्त करून घेता येईल असे स्वप्न मला दिसू लागले. जमीन मिळाली तर तेथे स्टेट बँक ऑफ इंडिया आम्हास मदत करेल असे आमचे त्या बँकेचे मॅनेजर मित्र आश्वासन देऊ लागले. त्यामुळे सपत्नीक त्यांना आम्ही आमंत्रण दिले.

सकाळी साडेआठ वाजता उत्साहाने मॅनेजरसाहेब व त्यांची सुशील पत्नी आमच्या घरी दाखल झाली. त्यांच्याच गाडीतून आम्ही दिमाखाने नागेशराव काटयांकडे निघालो. रस्त्यात स्टेट बँकेचे खालचे दोन मजले वेगळे दिले तर मोठी रक्कम वर इमारत बांधण्यासाठी कशी कर्जाऊ मिळेल याची रीत मॅनेजरसाहेब आम्हास समजावून सांगत होते. उद्‌घाटनासाठी स्टेट बँकेचे दिल्लीतील जनरल मॅनेजरसाहेब येऊ शकतील, ते आमचे दोस्त आहेत, वगैरे माहिती त्यांनी पुरविली. तेलंग म्हणाले, " त्यांना अतिथीविशेष करावे. मुख्य पाहुणे बृहन्महाराष्ट्राचे दिल्लीतील अध्यक्ष श्री. वसंतराव साठे हेच असावेत." यावर चर्चा करता करता काटे यांचे घर आले.

काटयांनी आम्हास त्यांच्या हॉलमध्ये बसविले.

मॅनेजरसाहेबांना धक्का बसला.

आमंत्रित मंडळींपैकी मॅनेजर, तेलंग, दादूमिया व यजमान काटे यांच्याशिवाय पाचवी व्यक्ती कोणीच दिसेना. अर्ध्या तासाने काटयांनी त्यांच्या पत्नीस पात्र बशा बटाटेपोहे करण्याची आज्ञा दिली. त्याबरोबर चहाचाही हुकूम सुटला.

बटाटेपोहे व सभा दोन्ही एकदमच संपली.

काटयांचा कुत्रा सतत भुंकत असल्यामुळे सभेत बरीच गर्दी व कोलाहल माजला असावा असा भास होत होता.

काहीतरी आठवले असा चेहरा करून व घडयाळ दाखवून मॅनेजरांनी मला सांगितले, " आज आमची एक महत्त्वाची एक मीटिंग आहे. आता मला जायला पाहिजे."

तेलंग म्हणाले, " आज तर रविवार आहे."

मनेजर धाईस येऊन म्हणाले, " रविवारचीच मीटिंग ठेवली आहे.'

काटयांच्या चेहऱ्यावर समाधान दिसले.

आम्ही सभा जिंकल्याच्या आनंदात बँकेच्या गाडीतून सुखरूप घरी पोचलो.

दुसऱ्या दिवशी एका साहित्यिक मित्राने तो का आला नाही त्याचे स्पष्टीकरण दिले, " हे फेडरेशन वगैरे काही नको. आम्ही आमचे गड लढवू. फेडरेशनमध्ये आम्हास कोण विचारणार ?"

## रौप्यमहोत्सवानिमित्ताने सत्कार समारंभ

वडोदे वृहन्महाराष्ट्राचे केन्द्रस्थान. येथे जात, पात, धर्म वा पंथ यांना अजिबात वाव नसावा अशी तेलंग यांची व माझी अपेक्षा. आणि त्याप्रमाणे आमचे धोरण व वागणे.

मात्र वडोद्यातील सरंजामशाहीच्या व दरबारी वातावरणात आमचे धोरण मंजूर नव्हते. याचा चांगला अनुभव आम्हाला एम. सी. हायस्कूलच्या पटांगणात केलेल्या वृद्धांच्या सत्काराच्या प्रसंगी आला होता. त्याचे चटके आम्हास निवडणुकीच्या प्रचारात चांगले सहन करावे लागले होते.

या वृद्धांत मराठा मंदिराचे प्रमुख गावडे मराठा होते. ते बुजुर्ग बामणमंडळींना कसे पसंत पडणार ? त्यांनी सत्कार समारंभात हजेरी न लावून आपला निषेध व्यक्त केला.

बामणांना मराठा एक वेळ चालला असता. पण निझामी हा मुसलमान त्यांना कसा चालणार ? खूप समजावून सांगितले, ' नमाज—योगा ऑफ इस्लाम ' या पुस्तकाद्वारे त्यांनी हिंदुसंस्कृतीचा आखाती देशात व जगभर प्रसारच केला आहे. निदान, त्यांचा योगाचा अभ्यास, त्यांचे वय व अधिकार लक्षात घ्याल का नाही ?'

आणि भिकुभाई पारेख ? हजाम ! व्हाइस चॅन्सेलर असला म्हणून काय झाले ? आम्ही हजामांच्या लायनीत बसायचे ?

आम्ही आमच्या विरोधकांना सुनावले होते, " गेट लॉस्ट. आम्ही हा सत्कार करणारच. तुम्हाला यायचं असेल तर या. नाही आलात तर तुमच्यावाचून समारंभ अडून राहणार नाही."

१९८६ साली बृहन्महाराष्ट्र मंडळातर्फे साजरा करण्यात आलेल्या महाराष्ट्र राज्य रौप्यमहोत्सवाच्या सांगता समारंभात आम्ही वरील प्रसंगाची पुनरावृत्ती करून ती म्हण खरी ठरविली.



अनुक्रमणिका

समारंभाचे अध्यक्ष गुजराथ राज्याचे मुख्यमंत्री अमरसिंग चौधरी होते वडोद्यातील विविध क्षेत्रांतील नामवंत व्यक्तींचा मुख्यमंत्र्यांच्या हस्ते शाल व श्रीफल देऊन सत्कार करण्यात आला. पंचवीस वर्षांपूर्वी गुजराथ व महाराष्ट्र एक राज्य होते. महाराष्ट्रावरोबर गुजराथ राज्याचा तो रौप्य महोत्सव होता. दुष्काळा-मुळे गुजराथ राज्याने तो साजरा केला नाही.

नामवंत व्यक्ती केवळ मराठी नसाव्यात हे आमचे धोरण स्थानिक मंडळींना पसंत नव्हते. लोकांशी वाद घालण्यात अर्थ नव्हता. आम्ही सांगून पाहिले, पण आम्हाला आढळले, झोपी गेलेल्याला जागे करता येते, परंतु झोपेचे सोंग घेतलेल्याला जागे करणे अशक्य आहे. सन्मानित व्यक्तींत, भूतपूर्व स्वातंत्र्यसैनिक कमलाशंकर पंड्या, गुजराथ राज्याचे जुने अर्थमंत्री सनत मेहता व वडोद्यातील जनता पक्षाचे प्रमुख मनुभाई पटेल ही गुर्जर मंडळी होती. स्थानिक मराठी नामवंतांत सामाजिक कार्यकर्त्या सौ. अरुणा मेहता (नाडकर्णी) व वत्सलावाई आंवेगावकर, साहित्यिकांत कवयित्री अपर्णावाई देशपांडे व संतवाङ्मयाच्या अभ्यासू सौ. शालिनीताई जावडे-कर, प्रसिद्ध तत्त्वज्ञानी व विद्वान प्रा. अ. ग. जावडेकर, कायदेतज्ज्ञ व गुजराथ राज्याचे कायदा-सचिव भालचंद्र परांजपे, वालशिक्षणतज्ज्ञ द्वारकाताई तेलंग, म्युनिसिपल कॉर्पोरेटर व महिला बँकेच्या अध्यक्षा सौ. लीलाताई घांदोरकर, पत्रकार आणि लेखक दादूमियाँ (म्हणजे अस्मादिक), नाटचशास्त्रतज्ज्ञ प्रा. यशवंत केळकर वगैरे मंडळी होती.

कार्यक्रम फार चांगला झाला. मुख्यमंत्री अध्यक्ष असल्यामुळे टी. व्ही. व ऑल इंडिया रेडिओचे कव्हरेज होते. उपस्थिती चांगली होती.

परंतु रौप्य महोत्सव खऱ्या अर्थाने गाजला तो दुसऱ्या दिवशी सकाळी.

सत्कारित व्यक्ती मोठ्या अपेक्षेने सकाळचे वर्तमानपत्र उघडून पाहतात तो काय—

मुख्यमंत्री पत्रकार दादूमियाँना शाल पांघरत असलेले व दादूमियाँ मुख्य-मंत्र्यांना हसतमुखाने अभिवादन करत असलेले भले मोठे छायाचित्र त्यांना दिसले.

दादूमियाँचा फोटो पाहून साऱ्यांचा सेक्युलरवाद व शाली गळून पडल्या. सत्काराचा आनंद पार विरघळला आणि दादूमियाँचा फोटो हेच सर्वांचे मुख्य लक्ष्य बनले.

खरी मजा प्रभाकर तेलंगांची झाली.

साऱ्यांचा एकच समान प्रश्न, " दादूमियाँचा फोटो ?"

त्यातील गर्भित अर्थ होता, आम्ही नव्हतो काय ?

दोन दिवस तेलंगांना मी समजावून थकलो. 'तो मी नव्हेच.' पण त्यांना वाटत होते की, हा फोटो मीच मुद्दाम छापवून आणला.

त्यांना कसे समजावू की, ब्लड इज थिकर दॅन वॉटर ?

पत्रकार दुसऱ्या पत्रकारास वा संपादकास जास्त जवळचा वाटतो.

बृहन्महाराष्ट्र परिषदेची पुनरावृत्ती झाली.

विचारे तेलंग स्थानिक संपादकांना भेटले व त्यांची होणारी कुचंबणा त्यांना समजावून सांगितली. संपादकांनी आम्हास माहिती खात्याकडून जो फोटो आला तो आम्ही छापला असे सांगितल्यावर तेलंगांच्या मनातील किल्मिष दूर झाले.

दुसऱ्या दिवशी संपादकांनी सर्व सन्मानित व्यक्तींची छायाचित्रे छापली.

आनंदीआनंद झाला.

पुन्हा तेलंग व मी मनसुबे रचण्यास मोकळे झालो.

" म. सा. प. बडोदे शाखा रिव्हाईव्ह केली पाहिजे." मी तेलंगांना म्हणतो, " आपले प्रधानमास्तर अध्यक्ष झाले आहेत."

" छोडो भाई, शंभर वर्षांची सहविचारिणी बडोदे जिवंत ठेवू शकत नाही. या टी. व्ही. संस्कृतीत कोण येणार आपल्या बैठकांना ?" तेलंगांचे उत्तर.

—डॉ. दा. वि. नेने
बडोदे.

---

## साभार स्वीकार

### कादंबरी

बारामाशी : शरणकुमार लिंबाळे, श्रीविद्या प्रकाशन, पुणे ३०, १९८८, रु. ३०

प्रिया : विजया संगवई, परिचय प्रकाशन, औरंगाबाद, १९८६, रु. ३०

---



अनुक्रमणिका

# गुजराती साहित्यिकांशी ऋणानुबंध

–प्रा. रा. म्हा. वाघमारे

(वडोद्याचे प्रा. रा. म्हा. वाघमारे यांनी इंग्रजीचे अध्यापक म्हणून बडोदा कॉलेज, प्रतापसिंह कॉलेज ऑफ कॉमर्स, एम. एन. कॉलेज विसनगर, गुजरात कॉलेज अहमदाबाद, वल्लभ विद्यानगर, एस. एन. डी. टी. महिला कॉलेज, वडोदे येथे ३० वर्षे काम केले.

१९६७ ते १९७१ या काळात वल्लभ विद्यानगर, कॉमर्स कॉलेज आणंद, येथे ते प्राचार्य होते.

प्रा. वाघमारे यांच्या नावे एम. ए. इंग्लिश शिष्यवृत्ती गुजरात विद्यापीठात १९६७ पासून चालू आहे. १९६८ मध्ये ते मराठी वाङ्मय परिषदेचे अध्यक्ष होते. गुजरात सरकार टेक्स्टबुक समितीचेही ते सदस्य होते.

इंग्रजीत जॉन रस्किन, एच. जी. वेल्स वगैरे त्यांची पुस्तके विद्यार्थिजगात प्रिय झाली आहेत.

अभयारण्य हा त्यांचा कथासंग्रह १९८६ मध्ये प्रसिद्ध झाला. श्रीकरपंत हे त्यांचे विनोदी लेखांचे पुस्तकही गाजले.

प्रा. वाघमारे यांनी वयाची ८० नुकतीच ओलांडली आहे. त्यांचे आत्मवृत्त ' मुंगी उडाली आकाशी ' हे प्रकाशनाच्या मार्गावर आहे.

त्यातील गुजराती साहित्यिकांच्या संदर्भातील आठवणींचे प्रकरण येथे देत आहोत.)

वास्तविक पाहता गुजराती साहित्य किंवा साहित्यिक यांच्यावर लिहिण्याचा किंवा चर्चा करण्याचा मला अधिकार नाही. आमच्या सात-आठ पिढ्या तरी बडोद्यात झाल्या आहेत. त्यामुळे आम्हांला गुजराती भाषा चांगली येत असली, तरी सर्व आयुष्य इंग्रजी व मराठी भाषा शिकण्यात व शिकवण्यात (यामध्येही

इंग्रजी अधिक) गेले असल्यामुळे गुजराती साहित्याचा जितका अभ्यास व्हायला हवा, करायला हवा तितका मी करू शकलो नाही याची मनाला खंत वाटते. पण ही उणीव भरून काढण्यासाठी मी गुजराती साहित्यिकांशी संपर्क साधून त्यांच्याशी सतत चर्चा करीत असतो. माझ्या या हव्यासामुळे गुजरातमधल्या बऱ्याच साहित्यिकांशी माझा प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष परिचय झाला आहे. त्यामुळे समृद्ध गुजराती साहित्याची मला गोडी लागली आहे. माझा जन्म, शिक्षण, संगोपन, अध्ययन सर्व काही गुजरातेत झाल्यामुळे मी गुजरातीतही लेखन केले आहे.

गुजराती साहित्यिकांत मला बरेच गुणसाधर्म्य आढळले. गुजराती साहित्यिक गोड बोलणारा, निगर्वी, प्रेमळ आणि जिज्ञासू असतो. त्याच्यात स्वाभिमान असतो; परंतु शक्यतो स्वतःविषयी बोलणे तो टाळतो. दुसऱ्याला मोठेपणा देण्याचे, त्याच्याशी शक्यतोवर जुळते घेण्याचे व्यापारी धोरण त्याच्यात असते.

१९३७ साली बडोदा कॉलेजमध्ये इंग्रजीचा लेक्चरर म्हणून मी काम करत होतो. कॉलेज सुटल्यावर संध्याकाळी जेलरोडने राजमहाल ग्राऊंडवर खेळायला किंवा मित्रांशी गप्पा मारायला जाण्याचा माझा परिपाठ होता. त्याप्रमाणे एक दिवस जात असताना मला एका देखण्या पण वयोवृद्ध गृहस्थाने हटकले आणि म्हटले, "तमारा हातमानी चोपडीओ उपरथी तमे अंग्रेजीना अभ्यासक लागो छो." (तुमच्या हातातील पुस्तकांवरून तुम्ही इंग्रजी भाषेचे अभ्यासक दिसता.) मी 'हो' म्हटल्यावर त्यांनी माझे नाव विचारले. मी कॉलेजमध्ये शिकवतो हे सांगितल्यावर त्यांनी मला आपले नाव सांगितले. ते सुप्रसिद्ध गुजराती कादंबरीकार रमणलाल वसंतराय देसाई होते हे कळले, तेव्हा मी जरा भारावून गेलो. त्यांची 'दिव्यचक्षु' ही कादंबरी मी वाचली होती. ती मला फार आवडली होती. मी न बोलता त्यांच्याबरोबर चालू लागलो. थोडे पुढे गेल्यावर त्यांनी मला विचारले, "तमे मने अंग्रेजीमा जेने 'रोमॅन्टिसिझम' कहे छे ते शुं कल्पना छे ते समजावशो?' (इंग्रजी भाषेतील रोमॅन्टिसिझम तुम्ही मला सांगू शकाल का?) त्यावर मी त्यांना म्हणालो, "रोमॅन्टिसिझम एटले भूतकालीन अथवा अपार्थिव सौंदर्य अने अद्भुतरम्यता जे साहित्य की, विजी कृतिओमां जोवा मले छे ते.' (मी त्यांना म्हटले की, 'रोमॅन्टिसिझम' म्हणजे भूतकालीन किंवा अपार्थिव सौंदर्य जे कलाकृतीत बघायला मिळते ते). माझ्या या भद्रंभद्री वक्तव्यापासून त्यांना काही अर्थबोध झाला असावा. ते म्हणाले, "आ एक गंभीर विषय छे. एना उपर चर्चा करवा हूँ तमने बोलावीशे." (हा एक गंभीर आहे. यावर चर्चा करण्यासाठी मी तुम्हाला बोलावीन.) मला तात्पुरती धन्यता वाटली. पण तो योग मात्र आला नाही. थोड्या दिवसांनी त्यांचा त्या विषयावरील निबंध प्रसिद्ध झालेला बघायला मिळाला. असा जिज्ञासू साहित्यिक आढळणें कठीण.

'द्विरेफ़नी वार्ता' लिहिणारे प्रो. रामनारायण पाठक एकदा विसनगर कॉलेजमध्ये आले होते. त्यावेळी त्यांनी नुकतेच आपल्या एका तरुण शिष्येशी लग्न केले होते. वृत्तपत्रातून त्यांचा जरठतरुणी विवाह गाजला होता. त्यांच्याशी बोलण्याच्या संधीची मी वाट पाहत होतो. मी इंग्रजी विभाग प्रमुख होतो. गुजरातीच्या प्रो. हसित बुच यांनी त्यांच्याशी माझा परिचय करून दिला. इंग्रजी साहित्याबद्दल आमचे थोडेसे बोलणे झाल्यावर त्यांनी मला विचारले, " प्रोफेसर, व्हॉट इज युवर आयडिया ऑफ लव्ह ?" मी हसत उत्तर दिले, " मी बऱ्याच प्रेमकविता वाचल्या आहेत; परंतु प्रेमाचे तत्त्वज्ञान असे बनवलेले नाही." त्यावर तेही हसत म्हणाले, " लव्ह इज ॲन ॲडव्हेंचर, आय थिंक." (प्रेम हे एक साहस असे मला वाटते.) त्यांच्या बाबतीत ते सत्य होते ! पण मी तसे स्पष्ट बोलू शकलो नाही. उलट त्यांच्या विधानाच्या पुष्टयर्थं स्टीव्हन्सन व बर्नार्ड शॉ यांची अवतरणे दिली. (" A love is like a lion- A lion kills a goat because he loves it– lovers are like cats; they mew, they purr and mew each other is the name of love.") त्यावर ते नुसते हसले. प्रो. रामनारायण पाठकांचा विनोदप्रिय मनमोकळा स्वभाव मला फार आवडला.

सुप्रसिद्ध गुजराती साहित्यिक प्रो. यशवंत शुक्ल यांना मी विसनगर कॉलेजमध्ये टागोर जयंतीनिमित्त बोलावले होते. परंतु त्यांच्या भाषणासाठी मी कॉलेजमध्ये थांबू शकलो नाही. मला वडोद्याची गाडी गाठायची होती. परंतु योग असा की, डोद्याला जाताना आमची गाडीतच गाठ पडली. साहजिकच मी त्यांना टागोरांबद्दल तुम्ही काय सांगितले असे विचारले. अहमदावाद स्टेशन येईपर्यंत टागोरांची कविता व साहित्य यावर आमची बरीच चर्चा झाली. त्यात आमची साहित्यिक गट्टी इतकी जमली की, त्यांचे स्टेशन आल्यावर ते मला, " तुम्ही आजची रात्र माझ्या घरी राहून उद्या वडोद्याला जा." असा आग्रह करू लागले. मला ते शक्य नव्हते. अहमदावाद जनता एक्सप्रेसने लगेच वडोद्याला जायचे होते. तेव्हा माझ्याबरोबर ते मला गाडीत बसवून देण्यासाठी आले. गाडी निघण्याची तयारी होती. मी बॅग घेऊन एका डब्यात घुसलो. तो शुक्ल बाहेर खिडकीतून माझ्यासाठी जागा बघत असता त्यांचे लक्ष प्रो. रामनारायण पाठक व त्यांच्या तरुण पत्नीकडे गेले. त्यांनी लगेच त्यांच्याशी माझा परिचय करून दिला. आपले सामान नीट लावून त्या दोघांनी मला बसायला जागा करून दिली. गाडी चालू झाली. प्रो. शुक्लांना आम्ही निरोप दिला. पाठक दंपतीशी गप्पा मारताना कळले की, मिसेस पाठक एस. एन. डी. टी. युनिव्हर्सिटीत गुजरातीच्या अध्यापिका आहेत. दोघेही मुंबईला जात होते.

नडियादचे स्टेशन आले. स्टेशनवर चहा घ्यायचे मी ठरविले. पाठक दांपत्याला " चहा घ्याल का ?" म्हणून विचारले. प्रो. पाठक म्हणाले, " मी चहा–कॉफी

काही घेत नाही." त्यांच्या पत्नी म्हणाल्या, " मी चहा घेते, पण आता नको." मी त्यांना थोडा आग्रह केल्यावर त्या तयार झाल्या. आम्ही दोघांनी चहा घेतला. प्रो. रामनारायण हसत म्हणाले, " वाघमारेसाहेब, हूँ तमारू खास अभिनंदन करू छूं." मी विचारले, " शा माटे ?" (कशासाठी ?) यावर ते म्हणाले, " नॉर्मली हिराबेन कोइनु कह्यु मानता नथी, पण तमारू एमने मान्यु." (साधारणपणे हिराबेन कुणाचेच ऐकत नाहीत. पण तुमचं त्यांनी ऐकलं.) " आफ्टर ऑल, इट्स द ॲफिनिटी ऑफ यूथ." ते मिस्किलपणाने हसले आणि त्यांना हिराबेननीही साथ दिली. असला रंगेल निखालसपणा क्वचित बघायला मिळेल.

भारतीय ज्ञानपीठ पुरस्कार मिळवणारे आंतरराष्ट्रीय कीर्तीचे कवी, ' संस्कृती 'चे संपादक, गुजरात विद्यापीठाचे उपकुलगुरू, राज्यसभेचे सरकार-नियुक्त सदस्य अशी बिरुदावली लाभलेले डॉ. उमाशंकर जोशी माझ्या परिचयाचे होते. ईडरसारख्या डोंगराळ प्रदेशात जन्माला आलेला आणि तेथेच प्राथमिक शिक्षण घेतलेला ' निशिथ 'चा हा महाकवी अत्यंत संवेदनशील आहे. त्यांचे ज्ञान, वाचन, निरीक्षण अचाट आहे. बोलण्या-चालण्यात ते अत्यंत नम्र आहेत. त्यांची भाषा मुलायम आणि रसवंती आहे. या थोर गृहस्थाचा नि माझा परिचय प्रथम झाला तो वडोद्याच्या चित्तेखान मारुतीजवळ, श्री. किसनसिंह चावडा यांनी नवीनच काढलेल्या ' साधना ' प्रेसमध्ये. त्यावेळी ' संस्कृती 'चे अंक साधना प्रेसमध्ये छापले जात असत. मी विसनगरला असताना ते माझ्या घरी आले होते. गुजरात कॉलेजमध्ये डिबेटिंग क्लबतर्फे मी त्यांना आमंत्रण केले होते. त्यावेळी श्री. मोरारजीभाई देसाई व त्यांचे अनुयायी श्री. ठाकोरभाई देसाई यांच्या नेतृत्वा-खाली ' अंग्रेजी हटाव ' ही चळवळ जोरात होती. आमच्या कॉलेजमध्ये उमाशंकर-भाईंनी तोच विषय घेऊन इंग्रजी भाषेचे महत्त्व आणि ती शिकण्याची आवश्यकता या विषयावर उत्स्फूर्त आणि सुंदर भाषण इंग्रजीतून केले. भाषणानंतर आभार-प्रदर्शन करताना मला त्यांच्या नावावर कोटी करण्याची लहर आली. माझ्या इंग्रजी भाषणात मी म्हटले, " आज आपल्या जोरदार पण तर्कशुद्ध भाषणाने उमा-शंकर जोशी यांनी आपले नाव सार्थ केले आहे. उमा नावाने प्रतीत होणाऱ्या सौजन्यपूर्ण भाषेत वक्त्यांनी शंकराच्या ज्वलंत तृतीय नेत्राने इंग्रजीच्या द्वेष्ट्यांना आज जाळून टाकले आहे आणि काही झाले तरी भारतात इंग्रजी भाषा राहणार असे भविष्य वर्तवून जोशी आडनाव सार्थ केले आहे." उमाशंकरभाईंना ही कोटी फार आवडली.

उमाशंकरभाईंच्या ' निशिथ ' या काव्यसंग्रहाला ज्या वर्षी भारतीय ज्ञानपीठ पुरस्कार मिळाला, त्या वर्षी मी वल्लभविद्यानगरला नलिनी ॲण्ड अरविंद आर्टस् कॉलेजचा प्रिन्सिपल म्हणून काम करीत होतो. त्या वेळी सर्व संस्थांच्या विद्यमाने

उमाशंकरभाईंचा भव्य सत्कार झाला. त्याचे आयोजन आमच्या कॉलेजमध्ये झाले होते. १९६८ साली मी बडोदे मराठी वाङ्मयपरिषदेचा अध्यक्ष होतो त्या वेळी त्यांना परिषदेचे प्रमुख पाहुणे म्हणून बोलाविले होते.

गुजरात युनिव्हर्सिटीचे ते उपकुलपती असताना मी एकदा त्यांना भेटायला गेलो होतो. परस्पर अभिवादनानंतर मी त्यांना म्हणालो, " उमाशंकरभाई, मने लाग्यु के तमारा टेबलउपर ऑफिशियल फाइलो अने कागदोनो गठ्ठो हशे, पण अशे तो कशु देखातु नथी." (तुमच्या टेबलावर खरं तर ऑफिसच्या कागदपत्रांचा व फाइलींचा ढीग दिसायला हवा; पण तो तर कुठेच दिसत नाही.) त्यांनी हसत टेबलावर पेपरवेटच्याखाली दडवलेला लहान चतकोर कागदाचा तुकडा मला दाखवला आणि म्हणाले, " मारो मुख्य व्यवसाय आ छे. अने वखत मळे ते हुं करूं छुं." (माझे मुख्य काम हे आहे आणि जेव्हा वेळ मिळेल तेव्हा मी ते करतो.) त्या कागदावर कवितेच्या काही ओळी लिहिलेल्या होत्या. नंतर मी विसनगरला असताना स्थानिक कवी देवशंकरभाई मेहता यांच्या ' फोरम ' काव्यसंग्रहाला लिहिलेल्या गुजराती प्रस्तावनेचा उल्लेख करून ते म्हणाले, ' संस्कृती ' (ते संपादित करीत असलेले मासिक) मा तमारी प्रस्तावना मा जे विवाद्य मुद्दो तमे लाव्यो हतो तेना उपर श्री. के. के शास्त्री (गुजरातीचे सुप्रसिद्ध विवेचक) ये जे चर्चा करी हती तेनो जवाब तमे केम आप्यो नही ? ' संस्कृती ' मा तमाशे जवाब अमे छापत."

मी म्हटले, " आ वाद वहु जुनो छे अने एमा हुँ पडवा मागतो नथी. मारू मंतव्य मे रजू कर्यू छे."

" तमारू मंतव्य खरू छे."

देवशंकरभाई मेहेता यांची माझ्यावर फार भक्ती होती आणि कॉलेजात गुजरातीचे प्रा. हसित बुचसारखे प्राध्यापक असताही आपल्या काव्यसंग्रहाला मीच प्रस्तावना लिहावी असा त्यांनी आग्रह धरला होता. उमाशंकरभाईंनाही माझी गुजराती प्रस्तावना आवडली होती आणि तिची दखल त्यांनी आपल्या ' संस्कृती '-मध्ये घेतली होती.

रणजितचंद्रक विजेते, गुजरात राज्यभाषा नियामक व लोकसेवा आयुक्ताचे सदस्य प्रा. अनंतराय रावळ हेही माझ्या चांगल्या परिचयाचे आहेत. काही वर्षे आम्ही दोघे अहमदावादच्या गुजरात कॉलेजात प्राध्यापक म्हणून काम करीत होतो. त्यांची राहणी अत्यंत साधी, स्वभाव निगर्वी आणि मनमोकळा. वाचन विस्तृत आणि समीक्षापद्धती समतोल. साहित्यिकांत सामान्यपणे आढळून येणारा अहंभाव व दुसऱ्याविषयी मत्सरभाव यांच्यात नाही. ते अजातशत्रू असावेत. त्यांच्या आमच्या कैक बैठकी व साहित्यिक चर्चा झाल्या आहेत. दुःखान्त नाटकावर इंग्रजीत प्रसिद्ध झालेली पुस्तके ते विनासंकोच मजजवळून मागून घेत असत.

प्रा. रावळांप्रमाणे प्रा. हसित बुच (मूळ वडोद्याचे) यांच्याशी माझा गाढ परिचय आहे. प्रथम विसनगर व नंतर गुजरात कॉलेजमध्ये आम्ही दोघेही बरोबर होतो. ते कवी, नवलकथाकार, वार्ताकार व वाङ्मयसमीक्षक आहेत. गुजरात राज्य-भाषा नियामक म्हणून निवृत्त झाल्यावर ते वडोद्यात स्थायिक झाले. त्यांनी 'वुइंडो' या शीर्षकाचा एक इंग्रजी काव्यसंग्रह प्रकाशित केला. 'ग्रंथगोष्टी' ही साहित्यिक संस्था डॉ. सुमंत पटेल यांच्या सहकार्याने ते चालवीत आहेत. बडोद्याचे नरेश सयाजीराव गायकवाड यांच्यावर आणि बडोदे शहरावर त्यांची दोन पुस्तके नुकतीच प्रकाशित झाली आहेत.

नवकवी म्हणून ख्यातनाम असलेले इंग्रजीचे प्राध्यापक निरंजन भगत यांचा नि माझा दाट परिचय झाला. त्यांनी मला एकदा त्यांच्या एलिस ब्रिजजवळच्या आपल्या निवासस्थानी नेले. त्यांची लायब्ररी बघण्यासारखी होती. मर्ढेकरांचे ते शिष्य होते. उमाशंकरभाईंच्या मार्गदर्शनाखाली ते पीएच. डी. करीत होते.

सुप्रसिद्ध कवी व शिक्षणशास्त्री श्री. झीणाभाई देसाई 'स्नेहरश्मी' हे आमच्या शारदा सोसायटीतच राहत. 'इंग्रजी शाळांसाठी इंग्रजी पाठ्यपुस्तके आपण दोघे मिळून काढू' असे त्यांनी मला सुचविले होते. परंतु माझ्या आळशी स्वभावामुळे ते माझ्याकडून घडले नाही.

'धूमकेतू' गुजराती साहित्य सुवर्णचंद्रक मिळवणारे सुप्रसिद्ध कवी व माझे जुने विद्यार्थी 'श्री. कुशनस' (प्रा. पंड्या), 'सुंदरम्', प्राचार्य रामप्रसाद शुक्ल, जयंत पाठक, ईश्वर पेटलीकर, पिनाकिन दवे, प्रो. फकीर महंमद मन्सुरी, प्रो. एस. आर. भट अशा अनेक गुजराती साहित्यिकांच्या नि माझ्या अनेकदा भेटी झालेल्या आहेत. परंतु त्या सर्वांविषयी लिहायला बसलो तर हा लेख लांबेल म्हणून मी तो मोह आवरता घेतो.

---

## साभार स्वीकार

मर्डरलॅंड : कांता सोनावणे, महाराष्ट्र चेतना साहित्य प्रकाशन, नित्यानंद नगर, घाटकोपर (प.), मुंबई ४०० ०८६, १९८८, रु. १५

हिमगंध : दिलीप वि. चित्रे, श्रीविद्या प्रकाशन, पुणे ३०, १९८८ रु. ५०

घाटवाटा : सत्यान्वेषी, मेघमाला प्रकाशन, १० पिंपळे गुरव, पुणे २७. १९८८, रु. १५










(पान १४४ वरून)
होती. घरात बसायला खुर्ची नव्हती, लिहायला टेबल नव्हते, झोपायला कॉट नव्हती, जेवण शिजवायला गॅस नव्हता. तोपर्यंत एअरकंडिशंड बेडरूममध्ये, डनलॉपिलो बेडवर सुखात झोपणारे डॉक्टर वसंतराव अवसरे आता चटईवर झोपत होते. मांडीवर लाकडी फळी घेऊन तिचा मेजासारखा उपयोग करीत 'मेघदूता'चा खर्डा दुरुस्त करीत होते. नवे ललित लेख, कविता आणि मित्रांना पत्रे–

पण डॉक्टरांना 'धन्वंतरी' म्हणावे, असे वैद्यकीय व्यवसायात यश होते. नालासोपारा– भायंदर परिसरातील रुग्णांची डॉक्टरांकडे रीघ लागली. पुन्हा एकदा मिक्श्चरे, इंजेक्शने, गोळया, प्रिस्क्रिप्शने हे व्याप सुरू झाले. वेतावाताने हातात पैसा येऊ लागला. कुसुमला संसाराची, स्वैंपाकाची सवय नव्हती. डॉक्टरांनी तिला पाकसिद्धी कशी करावी, हेही शिकवले. ती मराठी पद्धतीचा आमटी–भात करू लागली. फार काय ती तव्यावर मासेसुद्धा तळायला शिकली ! हे सारे आपल्या प्रिय व्यक्तीसाठी. डॉक्टर ऊर्फ 'पपा' यांच्यासाठी.

हां हां म्हणता या फिनिक्स पक्ष्याने पुन्हा झेप घेतली आणि नालासोपाऱ्यात स्वतःच्या मालकीचा बंगला बांधला. तेथे पुस्तकांनी कपाटे भरली. भिंतीवर स्वतःची आणि इतरांची पेंटिंग्ज टांगली. मंगेश पाडगावकर, जयवंत दळवी, मधुसूदन कालेलकर, आनंद साधले यांसारखे मित्र तेथे येऊन जेवून-खाऊन गेले आपण काडी काडी जमवून बांधलेल्या घरट्याच्या काठावर सायंकाळी डॉक्टर कुसुमसोबत उभे राहून पश्चिमेचे सांध्यरंग न्याहाळीत...

एखादी नवीन कविता त्यांच्या ओठावर तेव्हा गुणगुणत येई .. दरम्यान आणखी एक-दोन 'अ‍ॅटॅक्स' येऊन गेले होते. पाहुणा येऊन जावा तसे ..

एकदा अंधेरी स्टेशनवर भेटले. एकटेच होते. भसाभस सिग्रेटी ओढत होते. मी दुरून पाहिले. स्वारी आपल्याच नादात होती. प्लॅटफॉर्मवरच्या टोकाच्या बाकड्यावर बसले होते. खंगलेले वाटले. डोळेही खोल गेले होते.

मी जवळ गेलो नि हाक मारली.

त्यांना मनापासून आनंद झाला. त्यांना आनंद लपवता येत नसे. राग दडवता येत नसे.

" कुठे आहेस रे ? एकदा ये नालासोपाऱ्याला ! कसा झोकात राहतो ते बघायला."

मी जवळच बसलो ..

" डॉक्टर, खरं खरं सांगा, सुखात आहात ?"

" तर, तुला काय वाटलं, मी दुःखी आहे ?" सिग्रेटची राख झटकावी, तसा माझा प्रश्न ते झटकून टाकू पाहत होते. पण मी आज त्यांना सोडणार नव्हतो.










" खरं सांगा, घरची आठवण येते ?"

" कुठल्या घरची ? माझं घर आहे नालासोपाऱ्याला... आणि मी तिथंच राहतो आहे."

ते मला दाद देत नव्हते. पण त्यांना मीही अनेक वर्षे ओळखत होतो.

" माईंची आठवण येत नाही ?"

डॉक्टर बोलले नाहीत. त्यांनी फक्त खाली मान घातली नि गप्प राहिले.

" नातवंडे आठवत नाहीत ? समीर ?"

आणि त्यांनी माझा हात पकडला. भावनावेगाने. मग विवश झाल्यासारखे बोलू लागले.

" पोरा, काळजाला हात घालतोयस. बघ, पहिल्या पहिल्यांदा खूप कासावीस व्हायचो. कधी कधी हॉस्पिटलच्या दारात टॅक्सी थांबवून आत बसून राहायचो .. शाळेत जाताना समीर नजरेला पडेल म्हणून... हळूहळू मन घट्ट केलं... आता विसरतोय सगळं... पण वेळ लागेल..."

बस्स .. एवढंच.

तोवर विरार ट्रेन आली. डॉक्टर धडपडत उठले- " जातो रे– एकदा ये... विसरू नकोस. पण शशीला आण बरोबर... कुसुम कोळंबीची आमटी कशी करते तें बघ म्हणावं–"

डॉक्टर गाडीत कसेबसे चढले नि गाडीने वेग घेतला ..

मी त्याच एकाकी बाकड्यावर बसून सुन्नपणे विचार करीत होतो. काय हे? कशाचा कशाला अर्थ ? नियती हे खेळ खेळते तरी कशासाठी ? या देवासारख्या माणसाला ही बुद्धी का सुचावी ? खरंच डॉक्टर सुखात आहेत ? कुसुम तरी सुखात आहे ?

श्याहत्तरच्या पावसाळ्यातल्या एका दुपारी वामन भिड्यांचा फोन आला– " डॉक्टर गेले !"

नालासोपाऱ्याच्या रस्त्यावरच त्यांना शेवटचा अॅटॅक आला होता. कुणालाही न हरलेले डॉक्टर नियतीसमोर, मृत्यूसमोर हरले होते...

रात्री त्यांचा देह सांताक्रूझला त्यांच्या पूर्वीच्या घरी आणला तेव्हा आम्ही सगळे खिन्न–सुन्नसे तेथे उभे होतो. इतकी माणसे असतानाही सर्वत्र स्तब्धता, नीरवता होती. महायात्रेची वेळ आली. माई तोपर्यंत आतच होत्या.

मग त्या शांतपणे, कुणाचाही आधार न घेता बाहेरच्या हॉलमध्ये आल्या. किती दिवसांनी मी माईंना पाहत होतो. शुभ्र वस्त्रातल्या, शुभ्र केसांच्या, कृश,

अशक्त माई क्षणभर डॉक्टरांच्या अचेतन देहाकडे पाहत राहिल्या... आवेगाचे सारे महासागर त्यांनी काळजात कोंडून ठेवले होते. त्यांची मुद्रा स्थिर होती. फक्त डोळे बोलत होते. चष्म्याच्या सोनेरी काड्यांमागील दोन टपोऱ्या अश्रूंनी ... त्या आल्या तशा शांतपणे आत गेल्या. डॉक्टरांची अखेरची यात्रा निघाली

मी तिथूनच परत फिरलो. आजपर्यंत कधी डॉक्टरांबरोबर मुक्याने चालणे घडले नव्हते. आताही मला ते शक्य होणार नव्हते.



अनुक्रमणिका



# विजय तेंडुलकर आणि मी

—रंगा मराठे

---

१९५३ साली दिवाळी अंकासाठी म्हणून मी एक कथा लिहिली. आपणच ती घेऊन जावी व खपवावी असं मी ठरविलं. लॅमिंग्टन रोडवर त्यावेळी 'वसुधा' मासिकाची कचेरी होती. इथंच बहुधा आचार्य अत्र्यांचा नवयुग प्रेस व कार्यालय असावं. कथा घेऊन मी कचेरीत शिरलो. चतकोर पार्टिशन असलेल्या खोलीतील एका प्रचंड टेबलापाशी रुबाबदार व्यक्तिमत्त्व असलेले एक गृहस्थ नुसतेच बसले होते. मी आत गेल्यावर त्यांनी विचारलं,

"काय काम आहे ?"

"मी वसुधा दिवाळी अंकासाठी कथा द्यायला आलो आहे."

"ठेवा टेबलावर."

"तुम्ही ती वाचावी अशी इच्छा आहे."

"वाचून ठेवतो."

"आत्ताच वाचा."

ते गृहस्थ माझ्याकडे पाहून हसले आणि शांतपणे म्हणाले,

"बसा. वाचतो."

कथा वाचून होईपर्यंत मी त्यांच्यासमोर बसलो होतो. त्यांच्या चेहऱ्यावरील आविर्भाव पाहत होतो. चेहरा निर्विकार वाटला. बहुधा त्यांना ती कथा आवडली नसावी असं वाटलं. कथा वाचून पुरी झाल्यावर ते म्हणाले,

"चांगली आहे. दिवाळी अंकासाठी घेतली."

या गृहस्थांचं नाव विजय तेंडुलकर. ते त्यावेळी वसुधाचे संपादक होते.

दिवाळी अंकासाठी माझी कथा घेतली या आनंदातच मी बरेच दिवस रेंगाळत होतो. एक दिवस वसुधाचे चित्रकार गोरे मला कॉफी हाऊसमध्ये भेटले, म्हणाले,

## साहित्य अकादेमीची निवडक प्रकाशने



- इंग्रजी द्वैमासिक
  **इंडियन लिटरेचर** : संपादक– डी. एस. राव.
  वार्षिक वर्गणी - वीस रुपये.
  तीन वर्षासाठी– पन्नास रुपये. स्वतंत्र अंक– चार रुपये.

- हिंदी त्रैमासिक
  **समकालीन भारतीय साहित्य** : संपायक– ज्ञानी.
  वार्षिक वर्गणी– सोळा रुपये.
  स्वतंत्र अंक– पाच रुपये.

- संस्कृत अर्धवार्षिक
  **संस्कृत प्रतिभा** : संपादक– विद्यानिवास मिश्र.
  वार्षिक वर्गणी–सहा रुपये. स्वतंत्र अंक–तीन रुपये.

- English
  A History of Marathi Literature by Kusumawati Deshpande and M. V. Rajadhyaksha 40/–
  Three Decades (A Short History of Sahitya Academi) by– D. S. Rao. 30/–
  Encyclopaedia of Indian Literature Vol.–1 and Vol.–2
  Chief Editor : Amesh Datta. 400/– each.

- मराठी
  **दि. वा. मोकाशी यांची कथा** : संपादक– अरविंद गोखले ६०/–
  **निवडक पु. भा. भावे** :
  संपादक– व. कृ. वऱ्हाडपांडे आणि राम शेवाळकर ४५/–
  **निवडक मराठी एकांकिका** :
  संपादक– रत्नाकर मतकरी आणि सुधा जोशी ३०/–
  **निवडक ना. सी. फडके** :
  संपादक– इंदिरा संत आणि प्रल्हाद वडेर ४५/–
  **विनोबा सारस्वत** : संपादक– राम शेवाळकर ४५/–
  **वा. म. जोशी साहित्य दर्शन** :
  संपादक– वा. ल. कुलकर्णी आणि गो. म. कुलकर्णी ३०/–
  **समर्थ रामदास विवेक दर्शन** : संपादक– वि. रा. करंदीकर २१/–
  **आगरकर लेख संग्रह** : संपादक– ग. प्र. प्रधान २५/–
  **केतकर लेख संग्रह** : संपादक– य. दि. फडके १८/–
  **अल्बेरुनीचा भारत (खंड पहिला)** अनुवादक– यू. म. पठाण २५/–

**साहित्य अकादेमी– प्रादेशिक कार्यालय**
१७२, मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालय मार्ग, दादर, मुंबई– ४०० ०१४.
फोन : ४१३ ५७ ४४.

" तुमची कथा दिवाळी अंकात येत नाही."

" का ?"

" माहीत नाही. पण ती मागे ठेवली आहे."

मला राग आला. मी तेंडुलकरांना पुन्हा भेटलो तेव्हा कळलं की कुणातरी प्रथितयश लेखकाची कथा आल्यामुळे माझी कथा वगळण्यात आली. तेंडुलकरांनी माझी समजूत घातली. आम्ही दोघे कॉफी प्यायलो. दिवाळी अंकात कथा येणार नाही हे शल्य मात्र बरेच दिवस मनात टोचत होतं.

वसुधाचे संपादक म्हणून माझा आणि तेंडुलकरांचा परिचय झाला आणि दिवसेंदिवस तो वाढतच गेला. त्याचं रूपांतर मैत्रीत झालं. मी त्यावेळी गिरगावात गोरेगावकरांच्या चाळीत राहत होतो. तेंडुलकर त्यावेळी सेंट्रल सिनेमाजवळ एका जुन्या मोडकळीस आलेल्या रस्त्यावरील घरात पहिल्या मजल्यावर राहत असत. एका लाकडी, झिजलेल्या अरुंद जिन्यावरून वर जावं लागे. बोळकंडीवजा. ८×२० फूट किंवा त्याहीपेक्षा छोटी जागा असावी. मीनाताईंनी मध्ये पडदा टाकून त्याचं स्वयंपाकघर व बाहेरची खोली असं रूपांतर केलं होतं. या जागेच्या खिडक्या रस्त्यावर होत्या. त्यामुळे ट्रॅफिक व समोरच्या इराण्याच्या हॉटेलातील पार्श्वसंगीत सतत चालू असायचं.

या जागेत मी तेंडुलकरांना भेटायला अनेकदा गेलो असेन. तेंडुलकर नसले तर त्यांची वाट पाहत मीनाताईंशी गप्पा मारत बसायचं. मग ते आले की पुन्हा गप्पा. किंवा रात्री-अपरात्री आम्ही हिंडायला जायचो. पुष्कळदा आमच्याबरोबर श्रीकृष्ण खाडिलकर, श्री. दा. पानवलकर किंवा वसंत सरवटे असायचे. त्यावेळी सरवटे गिरगावात मुगभाटात व पानवलकर माधवाश्रमात राहत होते. त्यावेळी अनेकदा तेंडुलकर माझ्याकडे यायचे किंवा मी त्यांच्याकडे. कधीकधी वसुधाच्या कचेरीत किंवा कॉफी हाऊसमध्ये आमची भेट व्हायची.

एकदा तेंडुलकर असेच माझ्याकडे आले. त्यावेळी त्यांच्या कडेवर सुषमा असावी. (कदाचित प्रियाही असेल. नक्की आठवत नाही.) आम्ही दोघे फिरायला बाहेर पडलो. तेंडुलकरांच्या डोक्यात 'श्रीमंत' नाटक होतं. ते नाटकाचं कथानक सांगत होते, मी ऐकत होतो. आळीपाळीनं (हात दुखायला लागल्यावर) आम्ही सुषमाला घेत होतो. सेन्ट्रल सिनेमापासून बोलत आम्ही मेट्रो सिनेमाच्या चौकात आलो आणि तिथून वळून पुन्हा चर्नीरोड रस्त्यानं परत सेन्ट्रल सिनेमाजवळ. इथे दोन अंक संपले होते. पुन्हा त्याच रस्त्याने चालू लागलो आणि पुढे कुठेतरी तिसरा अंक संपला असावा.

हा तेंडुलकरांच्या श्रीमंत नाटकाबरोबर केलेला प्रवास मला अजून आठवतो. मध्यंतरी म्हणजे तीन-चार महिन्यांपूर्वी 'माणूस'च्या टी. व्ही. विशेषांकासाठी

मी मुंबईत गिरगावात उतरलो होतो. तेंडुलकरांची आणि माझी पूर्वनियोजित भेट बांबे बुक डेपोमध्ये झाली. गप्पा झाल्या आणि गिरगाव, चर्नीरोड, रेक्लमेशन इथं फिरणंही झालं. त्यावेळी अनेक जुन्या आठवणी निघाल्या. तेव्हा ते म्हणाले, " सारं काही आठवतं."

१९४८ ते १९५८ हा माझ्या लेखनाचा प्रारंभीचा काळ. यात अनेक लेखक-मित्रांशी ऋणानुबंध जडला. यात विजय तेंडुलकर प्रामुख्याने आहेत. प्रथम संपादक-नंतर लेखक, माणूस आणि मित्र म्हणून त्यांचा सहवास १९५३ ते ५८ मध्ये लाभला. या काळातील त्यांच्या सहवासातील अनेक आठवणी अजून ताज्या आहेत.

तेंडुलकरांच्या बोलण्याचा, चालण्याचा, वागण्याचा, विचार करण्याच्या पद्धतीचा माझ्या मनावर खोल ठसा उमटला. त्या काळात ते लेखक म्हणून नगण्य होते. लेखक म्हणून त्यांच्या अंतर्मनाचा प्रवास चालूच असणार. पण बाहेरून ते स्थितप्रज्ञासारखे वाटत. खूप कमी बोलणारे. एखाद—दुसरा शब्द बोलणार. पण त्याचा अर्थसुद्धा धड लावता येणं कठीण जायचं. पण समोरच्या माणसाचं सारं ऐकून घ्यायचं शांतपणे. जणू काही आपलं ऐकण्यासाठीच ते समोर बसले आहेत. वसुधात कथालेखन मी याच काळात केलं.

हा काळ तेंडुलकरांच्या दृष्टीने अत्यंत खडतर असा असावा. पण तो त्यांनी कधी भासू दिला नाही. आज वागतात तसेच ते त्यावेळी वागत होते. ते कधी उमगले नाहीत, समजले नाहीत असंच नेहमी वाटत राहिलं. अजूनही वाटतं. पण ते कधी निराश झालेले मला दिसले नाहीत. एकामागून एक लेखनाचे प्रयोग त्यांनी सातत्याने केले. ' गृहस्थ ' हे बहुधा तेंडुलकरांचं पहिलं नाटक. या नाटकाची पात्रं, कथानक मला अगदी जवळून माहीत होतं. त्यावर मधून-मधून बोलणंही व्हायचं. या नाटकाच्या एका प्रयोगाला आम्ही दोघं गेल्याचं मला आठवतं. मागे पिटात फळकुटांवर बसून आम्ही हे नाटक पाहिलं. त्यावेळी खुर्च्यांची मोडतोड होऊन नाटक बंद पडल्याचं आठवतं. तेंडुलकर हे अगदी त्रयस्थपणे पाहत होते. जणू काही दुसऱ्या कुणाचं नाटक ते पाहत होते.

तेंडुलकर चिडलेले, रागावलेले, त्रासलेले मी कधी पाहिलेच नाहीत. या काळात अपयशाचे अनेक अनुभव त्यांना आले असतील. ते सहजपणे पचविण्याची ताकद या माणसात मला दिसली. स्थिर नोकरी नाही (या नोकरीत पगार धड वेळेवर मिळत होता की नाही कुणास ठाऊक ! ), राहायला धड जागा नाही. वाढता संसार. पैशाची सतत चणचण असावी. पण वागण्यात, बोलण्यात ती दिसली नाही. चालण्याचा डौल तर तोच. जणू काही सारं काही अगदी मजेत चाललं आहे. धड दोन वेळा ते व्यवस्थित जेवत होते की नाही कुणास ठाऊक ! एकदा ते आमचे घरी



# ज्ञानपीठ पुरस्कार प्राप्त कुसुमाग्रजांची कॉन्टिनेन्टल प्रकाशने

## काव्य

जीवनलहरी
विशाखा
किनारा
समिधा
हिमरेषा
वादळवेल
रसयात्रा
मराठी माती
स्वगत

## नाटक

कौन्तेय
दूरचे दिवे
दिवाणी दावा
नाटक बसते आहे
राजमुकुट
आमचे नाव बाबुराव
देवाचे घर
दुसरा पेशवा

## कादंबरी

कल्पनेच्या तीरावर
वैष्णव जान्हवी

## कथा

सतारीचे बोल
फुलवाली
बारा कथा

## इतर

वाटेवरच्या सावल्या (आठवणी
आहे आणि नाही (लघुनिबंध)

---

'पन्नास वर्षांची ग्रंथ सेवा'
१९३८ ते १९८८

---

**कॉन्टिनेन्टल प्रकाशन**
विजयानगर, पुणे ३०
दूरध्वनी : ४४१९८२

आले, मी जेवणार का असं विचारल्यावर 'हो' म्हणाले. जेवताना पातेल्यातला सारा भात पानावर वाढला तरी नाही म्हणाले नाहीत. व्यवस्थित जेवले. मनात आलं, हे रोज जेवतात की नाही कुणास ठाऊक? पण विचारणार कोण?

माझी ज्येष्ठ कन्या १६ मे १९५८ रोजी आजारी पडली. त्यावेळी ती आठ वर्षांची होती. १४ जून ५८ रोजी ऑपरेशन टेबलवरच तिला मृत्यूला सामोरं जावं लागलं. प्रथम आजाराचं निदान झालं नाही. अनेक डॉक्टर्स झाले. तेंडुलकर या आजारात नेहमी आमच्या घरी येत होते. पुढे तिला ब्रेनटच्यूमर झाला आहे असं निदान झालं. के. ई. एम. मध्ये ऑपरेशन टेबलवरच ती गेली. त्यावेळी तेंडुलकर ऑपरेशन थिएटरमध्ये तिचा शेवटचा श्वासोच्छ्वास होईपर्यंत असलेले एकमेव साक्षीदार होते. बाकी सर्व नातलग, मित्रमंडळी होतीच. पण बाहेर. माझ्या कन्येला लाभलेली ही त्यांची सोबत मी विसरू शकत नाही. दुसऱ्या दिवशी स्मशानातसुद्धा ते आले होते.

१९६० साली मी मुंबई सोडली व पुण्यात आलो. त्यानंतर माझी व तेंडुलकरांची भेट २७ वर्षांनी म्हणजे १९८७ साली झाली. कै. दि. वा. मोकाशी यांच्या स्मृतिदिनानिमित्त पारितोषिक वितरण समारंभाचे अध्यक्ष म्हणून त्यांनी यावे अशी विनंती करायला मी त्यांच्या घरी गेलो होतो. त्यावेळी प्रदीर्घ काळानंतर त्यांची भेट झाली. गप्पा झाल्या. त्यांनी निमंत्रण स्वीकारले व या कार्यक्रमासाठी ते पुण्यात आले त्यावेळीही भेट झालीच.

मध्यंतरीच्या काळात तेंडुलकर खूपच मोठे झाले होते. त्यांच्या नाटकाच्या रूपानं म्हणजे 'घाशीराम कोतवाल', 'सखाराम बाइंडर', 'माणूस नावाचे बेट', 'अशी पाखरे येती', 'कन्यादान', 'सामना' या त्यांच्या नाटकांच्या कलाकृतीतून ते मला भेटत होते. टी. व्ही. वर दिसायचे. म्हणजे त्यांच्या लेखनातून किंवा टी. व्ही. वर आमची भेट व्हायची (म्हणजे मला ते दिसायचे). रातराणीतील अद्वितीय लेखांच्या रूपाने (पॉल मुनी, प्रचंड, लॉरेंड हार्डी... .. या लेखांतून, चित्रपटपरीक्षणातून) ते भेटायचे. पण खऱ्या अर्थाने समोरासमोर मनमोकळी भेट, गप्पा झाल्या त्या २७ वर्षांनंतर.

पण तेंडुलकर मला अजूनही पूर्वीसारखेच वाटतात. स्वतःच्याच आयुष्याकडे ते अगदी तटस्थपणें पाहत आहेत असं वाटतं. अबोल तेंडुलकरांच्या अंतर्मनात सहृदय माणूस कुठेतरी दडलेला आहे, तो मला आजही दिसतो. अपयशाने किंवा परिस्थितीने हादरलेले पाहिले नाहीत, तसेच यशाने फुललेले पण दिसले नाहीत. खरं तर आयुष्याला ते निर्भयपणे सामोरे गेले. आयुष्य जसं आलं तसं त्यांनी ते अंगावर घेतलं. कुणाचीही पर्वा न करता, त्यांच्यातला लेखक सतत कसला तरी

शोध घेत गेला. हा त्यांचा शोध सातत्यानं चालू आहे. पण हा त्यांच्या अंतर्मनाचा प्रवास कुणालाही न समजणारा, न गवसणारा आहे असं मला वाटतं.

तेंडुलकरांच्या लेखनप्रवासात अनेक वादळं उठली. त्याला ते शांतपणे सामोरे गेले. ' सखाराम बाईंडर ', ' घाशीराम कोतवाल ' या नाटकांनी त्यांना सातत्यानं छळलं. गदारोळ उठले आणि शांत झाले. त्यांच्या लिखाणावर अनेक वादळं उठली. आरोप–प्रत्यारोप झाले. पण हे सारं त्यांनी निर्भयपणें फेस केलं.

निर्भयपणा आणि उर्मटपणा यात एक सूक्ष्म रेषा आहे. उर्मटपणा हा कधी मला तेंडुलकरांत दिसला नाही, वाटला नाही. त्यांच्या लिखाणाचं मोठेपण, त्यांना लाभलेली कीर्ती ही त्यांच्या निर्भयपणातून उत्तुंग शिखरासारखी त्यांच्यासमोर उभी राहिली. निर्भयता ही एक निसर्गाची देणगी आहे. ती तेंडुलकरांना लाभली म्हणूनच तटस्थपणे, सहजपणे अपयशाप्रमाणेच यशही ते पचवू शकले.

माणूस म्हणून, मित्र म्हणून लाभलेले तेंडुलकर मला जास्त जवळचे वाटतात. मुंबईत मी गेलो, त्यांना वेळ असला तर मी त्यांना जाऊन भेटतो. मग गप्पाही होतात. वल्लभभाई पटेलांच्या जीवनावर ते सध्या पटकथा लिहीत आहेत, त्याविषयी काही विचारलं तर त्यावरही ते बोलतात.

पुण्यात ते दोनदा आले होते. त्यावेळी त्यांनी आवर्जून फोन केला. भेटही झाली.

असे हे माझे आणि तेंडुलकरांचे ऋणानुबंध अजूनही आहेत.

लोकमान्यनगर, बिल्डिंग नं. ३,
ब्लॉक नं. ३४, लाल बहाद्दूर शास्त्री मार्ग, नवी पेठ, पुणे ३०.

---

**सामार स्वीकार**

GILT CLOUDS : L. M. Patwardhan, S. L. Patwardhan
Old Panvel, Thana Road, Panvel 47, 1986, Rs. 15

डॉ. बाबासाहेब आंबेडकरांचा सांगाती : बळवंतराव हणमंतराव वराळे,
श्रीविद्या प्रकाशन, पुणे ३०, १९८८, रु. ७०

शंकर रामचंद्र दाते यांच्या जीवनातील आठवणी : शंकर रामचंद्र दाते,
काळ प्रकाशन, १४०४ सदाशिव पेठ, पुणे ३०, १९८८, रु. ३०

महाराष्ट्र धर्म आणि समर्थ : सत्यबोध प्रकाशन, सोपाननगरी हाऊसिंग सोसायटी,
३२३ नवी पेठ, पुणे ३०, १९८८, रु. २५

---



अनुक्रमणिका

# व. ह. पिटके

**—माधव पिटके**

---

मी जे काही आतापर्यंत थोडेबहुत, बरेवाईट लिहिले त्यामागे प्रेरणा माझे थोरले बंधू कै. व. ह. पिटके यांची होती. थोडक्यात मी त्यांचा वाङ्‌मयीन ऋणानुबंधी आहे. आम्ही भावंडे त्यांना नाना म्हणत असू. ते मला पत्रातही अहोजाहो लिहीत. लेखनाच्या बाबतीत नानांचे मार्गदर्शन मी अगदी सुरुवातीपासून व वेळोवेळी घेतलेच असे मात्र नाही. तसे झाले असते तर कदाचित माझा फायदा झाला असता; पण ते माझ्या स्वभावात नव्हते. आपण जे लिहितो ते आपलेच असावे त्यासाठी इतरांचे साहृय, मार्गदर्शन, सूचना वा सल्लामसलत नको. त्या निर्मितिप्रक्रियेचे सबंध श्रेय आपलेच असले पाहिजे अशी माझी भूमिका होती. लेखनपूर्व चर्चा, मार्गदर्शन हे मला अजिबात मान्य नव्हते.

लेखनाच्या बाबतीत माझ्यात काहीसा अहंभाव पण होता. नाना सुरुवातील कविता करायचे. कवीला गोष्ट लिहिता येत नाही ! त्याला त्यातले काय कळते ? तेव्हा त्याच्या अभिप्रायाला जेवढयास तेवढे महत्त्व द्यायचे अशी माझी अगदी सुरुवातीला अहंकारी वृत्ती होती.

मात्र याचा अर्थ मी त्यांचे काहीच ऐकले नाही असा होत नाही. सुरुवातीचे वाङ्‌मयीन संस्कार नानांनीच माझ्यावर केले. कळत-नकळत त्यांच्या लेखनवाचनाने मी प्रभावित झालो. त्यांच्या वाङ्‌मयीन दृष्टिकोनाचा, अभिरुचीसंपन्न व्यक्तिमत्त्वाचा मला लाभ झाला.

ते वयाने माझ्याहून दहा वर्षांनी मोठे होते. अगदी पाठचे असते तर कदाचित आमच्यात बरोबरीचे नाते राहिले असते, पण त्यांच्या वडिलपणाचा दबदबा माझ्या मनावर राहिला होता. आम्ही दोघे लहान भावंडे त्यांच्याकडे मोठया आदराने पाहत होतो.



अनुक्रमणिका

त्यांनी लेखनवाचनाची आवड कशी जोपासली हे तर मी माझ्या लहानपणा पासून पाहिले होते. त्यांचे अक्षर सुंदर होते. आवाज चांगला होता. पाठांतर उत्तम होते. अगदी गोविंदाग्रज, दत्त, केशवसुतांपासून तांबे, यशवंत, गिरीश, माधव ज्युलियनपर्यंत कवींच्या कविता ते जोशपूर्ण, भावपूर्ण आवाजात म्हणत. या कवींच्या निवडक कविता त्यांनी वाडामध्ये सुंदर अक्षरात उतरून ठेवल्या होत्या.

स्लेटपाटीवर दोन्ही बाजू भरून रोज कसलातरी मजकूर ते लिहून काढीत. तो शालेय अभ्यासाचा भाग होता की आणखी काही ते मला आठवत नाही, पण माझी शाळेत न्यायची पाटी ते अशी रोज गुंतवून ठेवीत ते मला चांगले आठवते.

शाळेमध्ये ते एक हुषार विद्यार्थी होते. स्कॉलर होते.

पंढरपूरच्या लोकमान्य हायस्कूलमधून ते १९३८-३९ साली मॅट्रिक झाले.

माझ्या वडिलांनी नंतर पंढरपुरातले आपले बिऱ्हाड हलवून सातारा जिल्ह्यातील मायणी या गावी नेले.

मायणी गाव आम्हाला आवडले.

घराजवळ बारा महिने खळखळ पाणी वाहणारा ओढा होता. कुसुवावर उभे राहिले की समोर ओढ्याकाठचा निसर्गरम्य परिसर दिसत होता. ओढा ओलांडून दोन-एक फर्लांग पुढे गेले की आमचा मळा लागत होता. तिथली विहीर, कडेची गर्द झाडी, हिरवेगार शिवार, नजर दूरवर भिडवू तिथपर्यंत पसरलेले निळेभोर आकाश, मस्त मोकळा रानवारा, शेतात काम करणारी धडधाकट, मोकळ्या मनाची, आनंदी माणसे हे सगळे आम्हाला नवे व हवेहवेसे वाटणारे होते.

नानांच्या काव्यात्म प्रकृतीला तर मायणी छानच मानवण्यासारखी होती.

मायणीला मी मराठी चौथ्या इयत्तेत दाखल झालो.

नाना मोकळेच होते. घरात कॉलेजात जायचे की नाही त्यावर विचार चालू होता. पुण्यासारख्या शहरात मुलाला कॉलेजला ठेवण्यासारखी वडिलांची आर्थिक परिस्थिती नव्हती.

पंढरपुराहून येताना घरात होती ती सगळी पुस्तके, 'किर्लोस्कर' मासिकाचे जुने गठ्ठे बरोबर आणले होते, त्यांच्या वाचनात नाना रममाण होऊन जात.

संध्याकाळी तुळशीकट्ट्यावर बसून काही निवडक कविता ते खड्या आवाजात एकामागून एक म्हणत.

'गेला होता कोठे राधेसुता तुझा धर्म ?' ही त्यांच्या जोशपूर्ण आवाजातली कविता ऐकून त्या वयात 'कविता' या प्रकाराने मला भारून टाकले. काव्य म्हणजे

मोठीच गंमत असतें ते कळून आले. गेय कवितांचा तो जमाना होता. निसर्ग, प्रेम, सौंदर्य हे काव्याचे विषय होते.

'शांतानुज' या टोपणनावाने नाना कविता करीत. 'मनोहर' मासिकात आणखी काही त्यावेळच्या 'चित्रा' वगैरे साप्ताहिकात त्यांच्या कविता छापून आल्या.

'पाईक आम्ही –' या त्यांच्या कवितेला कऱ्हाडच्या कवि-संमेलनात बक्षीस मिळाले. दोन पुस्तके मिळाली होती. त्यांपैकी एक कै. श्री. म. माटयांचे 'उपेक्षितांचे अंतरंग' होते. दुसरे साने गुरुजंचे कोणतेतरी होते.

मायणीला रवींद्रनाथ टागोर वारल्याची बातमी कळल्यावर त्यांच्या संग्रही असलेले मासिकातून कापून ठेवलेले, टागोरांचे एक छायाचित्र होते, ते त्यांनी भिंतीवर टाचण्या खोवून लावले. त्याला फुलांची माळ घातली. मला व माझ्या मित्रांना टागोरांबद्दल माहिती सांगितली.

भा. रा. तांबे वारले त्यावेळी असेच ते अस्वस्थ झालेले दिसले. दिवसभर वहीतील त्यांच्या कविता ते गुणगुणत होते.

एके दिवशी मी 'आनंद' मासिकातील 'मुलांचे लेख' या सदरासाठी गोष्ट लिहीत होतो.

त्यांनी चौकशी केली. "गोष्ट लिहितोय" मी म्हटले.

"बघू !" त्यांनी माझ्या हातातला कागद ओढून घेतला.

"काय लिहिलं आहेस हे ? मुलांसाठी गोष्ट लिहायची म्हणजे सोपी सोपी, सुटसुटीत वाक्यरचना हवी. त्यांना वाचन राहावं असं वाटलं पाहिजे. हे 'आणि', 'व' 'परंतु' कितीदा ? त्याऐवजी सुटसुटीत लहान लहान वाक्य बनवता येणार नाहीत ?"

त्यांनी माझी सगळी गोष्ट दुरुस्त केली. मग म्हणाले, "हं. लिही बघू आता."

माझे अक्षर अगदीच गचाळ होते म्हणून मी म्हणालो, "तूच लिही ना, नाना ! तुझं अक्षर चांगलं आहे. म्हणजे छापून येईल."

नानानी त्यावेळी गोष्ट मला लिहून दिली.

नंतर ती छापून आली. माझ्याइतकाच नानांना आनंद झाला.

पण ते म्हणाले, "यापुढं तुझा तू प्रयत्न करायचा. अक्षर वाईट आहे तर ते सुधारलं पाहिजे. तुला लेखक व्हायचं आहे ना ? मग खूप वाचन केलं पाहिजे. चांगली चांगली पुस्तकं वाचून काढली पाहिजेत."

घरी 'किर्लोस्कर' येत होता. फडके, खांडेकर, दिघे, ठोकळ यांच्या गोष्टी मी वाचत होतो. त्याआधी लहानवयात पंढरपूरला असताना चित्रांच्या आकर्षणामुळे 'दाजी 'सुद्धा वाचला होता. नानांना ते माहीत होते.

नानांनी माझ्यासाठी पुण्याहून हरिभाऊंची 'गड आला पण सिंह गेला' ही संक्षिप्त कादंबरी विकत आणली. वर्गणी भरून माझ्या नावावर 'आनंद' मासिक सुरू केले. माझ्या लेखन वाचनाला योग्य वळण देण्याचा त्यांनी प्रयत्न केला.

नानांचे कॉलेजचे अखेर जमलेच नाही.

पुण्याला चार-सहा महिने राहून ते परत मायणीला आले.

त्यांनी आम्हा मुलांसाठी 'राष्ट्रसेवादल' सुरू केले.

पण ते वैयक्तिक सत्याग्रहाचे व चळवळीचे दिवस होते.

माझे वडील सरकारी पेन्शनर होते. गावातला फौजदार वरचेवर घरी येऊन दम देऊ लागला. आपल्यामुळे वडलांना त्रास होऊ नये म्हणून मायणी सोडून जायचे नानांनी ठरविले.

सोलापूर जिल्ह्यातील कोरगाव या गावी 'बृहन्महाराष्ट्र शुगर सिंडिकेट' हा कारखाना होता. माझा थोरला भाऊ तिथे नोकरीला होता. नाना पण तिकडे गेले, त्यांना तिथे नोकरी मिळाली.

('बृहन्महाराष्ट्र 'मधील एकूण वातावरणाचा व अनुभवाचा त्यांनी आपल्या 'शिदोरी' या कादंबरीत पुरेपूर व अतिशय छान रीतीने उपयोग करून घेतला.)

कोल्हापूरला येण्याआधी नाना माळीनगरच्या साखर कारखान्यात नोकरीला होते. माळीनगर सोडताना नानांच्या पुढे दोन पर्याय होते : पुणे की कोल्हापूर ?

नानांना कोल्हापूरचे आकर्षण होते. प्रा. ना. सी. फडके आणि वि. स. खांडेकर हे दोन ख्यातनाम साहित्यिक कोल्हापुरात वास्तव्य करून होते.

त्यानी कोल्हापूर शुगर मिल्समधील नोकरी स्वीकारली.

करवीर क्षेत्री नाना वर्षा-दोन वर्षात रुळले. त्यांना हवे तसे मित्र मिळत गेले. कोल्हापुरातील वातावरण त्यांना आवडले.

१९५० साली मी विट्याला हायस्कूलमध्ये शिक्षक होतो. एके दिवशी अगदी सहज मोटारस्टॅंडवर ग. दि. माडगूळकर उभे असलेले दिसले. ते माडगूळला निघाले होते. नमस्कार केला. नाव सांगितले. चटकन त्यांनी 'व. ह. पिटक्यांचे कोण?' असा प्रश्न केला. त्यांच्या तोंडून नानांचे नाव ऐकताच फार आनंद झाला. क्वचित लिहिणारे नाना ग. दि. मा. पर्यंत पोचले होते.

१९५०-५१ सालीच 'यशवंत' मासिकात ओळीने माझ्या पाच-सहा कथा छापून आल्या. त्यावेळी दिवाळी अंकाऐवजी त्यांचा 'दसरा विशेषांक' निघत असे. त्या अंकातदेखील माझी कथा होती. माझी ती सुरुवात होती.



अनुक्रमणिका

नोकरीनिमित्ताने मी बोर्डीला गलो होतो. माझ्या या कथालेखनाबद्दल नानाकडून काही कळले नाही. कदाचित त्यावेळी त्यांना 'यशवंत'चे हे अंक वाचायला मिळाले नसावेत. पण एक गोष्ट मात्र झाली नाना कथालेखनाकडे वळले.

'सत्याग्रहाचे यश' ही त्यांची कथा 'यशवंत'मध्ये आली. वाङ्मयशोभेत 'इंटरव्ह्यू' ही घरात घडलेल्या घटनेवरची कथा छापून आली. नंतर 'वसंत'मध्ये कथा छापून आली.

नानांनी कथालेखनाचा ध्यासच घेतला.

य. गो. जोशी, चिं. य. मराठे यांच्या गोष्टी त्यांना आवडू लागल्या. त्यांचे कथासंग्रह ते विकत घेऊन आले.

'आपण जे अनुभवतो, जगतो ते कथेत आले पाहिजे' असे ते मला आग्रहाने सांगू लागले

मलाही ते पटत होते पण म्हणून काही रडके, दरिद्री नि प्रवाहपतित जीवनाचे एकसारखे दर्शन घडवीत राहावे हे काही बरोबर वाटत नव्हते.

य. गो. जोशींच्या कथांनी नाना काही काळ भारावून गेले होते हे मात्र निश्चित.

दरम्यान 'क्रांतिकाल' या कादंबरीचं कथानक त्यांच्या मनात तयार झाले. त्यावर त्यांनी भरपूर परिश्रम घेतले टाचणे तयार केली. खूप विचार केला. अखेर कादंबरी लिहून झाली. प्रकाशक मिळेना. 'वाङ्मयशोभे'चे कथालेखक म्हणून 'मनोहर ग्रंथमाले'ने प्रकाशनासाठी स्वीकारली. तो सगळा व्यवहार मला माहीत आहे. त्याबद्दल लिहावयाची ही जागा नि वेळ पण नाही पण अजून 'क्रांतिकाल'च्या कोऱ्या करकरीत शंभर एक प्रती कोल्हापूरला नानांच्या लाकडी कपाटात पडून आहेत, त्याचे वाईट वाटते.

'क्रांतिकाल'वर 'लोकसत्ते'त मोठे परीक्षण आले. एका मध्यमवर्गीय तरुणाची ती एक साधी-सरळ प्रेमकथा होती. कथानकाला साखर कारखान्याची पार्श्वभूमी लाभल्याने ते एक त्यावेळी नावीन्य होते.

कोल्हापुरात प्रल्हाद वडेर, विजया आपटे (सौ. विजया राजाध्यक्ष), शांताराम रामचंद्र शिंदे हे अभ्यासू, वाङ्मयीन अभिरुची असलेले, तरुण स्नेही नानांना भेटले. नि मूळच्या त्यांच्या चिंतन-मननशील वृत्तीला चौफेर वाचनाची जोड मिळाली. मनात असून परिस्थितीमुळे महाविद्यालयीन शिक्षणास पारखे झालेल्या नानांनी एखाद्या विद्वान प्राध्यापकाला लाजवील, असा प्रचंड व्यासंग केला. ही त्याची सुरुवात होती.

एक रटाळ, जीवघेणी, कंटाळवाणी नोकरी सोडली तर नानांच्या आयुष्या-तला अत्यंत सुखद, उमेदीचा, आनंदाचा असा हा कोल्हापुरातील कालखंड होता.

त्यांचा वाचनाचा जो झपाटा होता तो लेखनाला काही लाभला नाही.

दोनचार महिन्यांनी त्यांची एखादी कथा लिहून होई. तीही ते 'सत्यकथेला' पाठवून देत.

त्याबद्दल एकदा ते म्हणाले, "आपण काय सठी सामासी तर लिहिणार, तेव्हा ते चांगल्या ठिकाणीच यायला हवं.

'सत्यकथा', 'अभिरुची 'तील कथा हा त्यांचा अगदी जिव्हाळ्याचा विषय होता. रणजित देसाई, शंकर पाटील, नंतर कोल्हापुरात आलेले द. भि. कुलकर्णी यांचा स्नेह त्यांना लाभला. आपल्या या मित्रमंडळींबद्दल ते अगदी भावुक व आत्मीयता बाळगून असत. त्यांचा त्यांना अभिमान होता.

कथालेखनाकडून अगदी नकळत परत ते कादंबरीलेखनाकडे वळले नि 'शिदोरी 'सारखी एक दर्जेदार निर्मिती त्यांच्या हातून झाली.

त्यांची कथा वाचली की मी पत्रातून कळवीत असे. त्याचा त्यांना मोठा आनंद होई.

माझा धाकटा भाऊदेखील त्यांच्या लेखनाबद्दल आवर्जून लिही. त्यात एखादे मार्मिक वाक्य असे.

त्यावर ते गंमतीने म्हणत, "बघ, आपल्या दोघांसारखं हा काही लिहीत-विहीत नाही. पण त्याला दृष्टी कशी छान आहे. नेमके बोट ठेवतो, मर्म जाणतो."

त्यांची 'सत्यकथे 'तील 'मनोरथ' ही कथा मला फार आवडली होती.

माझ्या वडिलांच्या मायणी ते पंढरपूर असे छकड्याच्या प्रवासाचे ते अतिशय रंगून केलेले, खुमासदार वर्णन होते.

खरे तर वडिलांबरोबर त्या प्रवासात मी नेहमी असे. नाना क्वचितच त्यांचे-बरोबर गेले असतील. पण त्यांनी तो अनुभव किती जिवंत, हुबेहूब मांडला आहे. प्रयत्न करून मला ते साधले नसते. ती कथा आमच्या वडिलांनी वाचायला हवी होती.

माझ्या 'स्वराज्य'मध्ये वरचेवर येणाऱ्या प्रासंगिक, घटनाप्रधान कथा त्याना एवढ्या आवडत नसत. त्याबद्दल सहसा ते काहीच लिहीत नसत. पण मासिकातून आलेली एखादी कथा त्यांना आवडली, विशेष वाटली तर ते मुद्दाम होऊन, लिहीत.

'वसुधा' मासिकेत माझी 'लाज' म्हणून एक कथा आली होती. ती शंकर पाटलांना फार आवडली असे त्यांनी मुद्दाम कळविले होते.

माझी 'वसंत' मधील 'मोरपीस' ही कथा त्यांना आवडली.

त्यांनी पत्रात लिहिले, "कथा (मोरपीस) चांगली लिहिली गेली आहे. संवाद, वर्णन, भाषा सर्व जिथल्या तिथे वाटते. तुमच्या कथालेखनातील ही प्रगती चांगली वाटते. शेवटपर्यंत कुठे काही न खटकता कथा वाचत गेल्यावर एक मात्र खटकते. बालमैत्रीण भेटण्याचा योगायोग. योगायोगाच्या गोष्टी कथेला कमकुवत करतात."

नंतर माझ्या कथेत किंवा कादंबरीत चुकूनही कधी योगायोग लिहिला गेला नाही.

माझ्या पहिल्या 'पराभूत' कादंबरीबद्दल त्यांचा अभिप्राय होता—"शामूला सुमन भेटल्यामुळे एक आगळी उभारी येते ही कल्पना चांगली आहे. पण तिचा पाठपुरावा अधिक नेटकेपणाने केला असता तर ही केवळ Boy meats a girl च्या पातळीपेक्षा वर चढली असती. शेवटचा प्रसंगही मला आकस्मिक वाटतो. तो अधिक व्यवस्थित यायला हवा होता. या कादंबरीमुळे आपण दीर्घ काही लिहू शकतो एवढा आत्मविश्वास आला हेही कमी नाही."

माझ्या 'ओघ' या दुसऱ्या कादंबरीबद्दल त्यांनी लिहिले, "कादंबरीत जीवनाचे दर्शन घडले पाहिजे. ते या कादंबरीत जाणवते.''

टीका करताना ते त्याच पत्रात लिहितात, "तुमच्या कादंबरीत पात्रे आकस्मात येतात व ती अंतर्धान पावतात. कादंबरीकाराने आपल्या सोयी-गैरसोयीसाठी पात्रे आणली गेली असे वाटता कामा नये."

माझ्या 'अर्ध्या वाटेवर' या त्यांना अधिक आवडलेल्या कादंबरीबद्दल तर त्यांनी खूपच मोठे पत्र लिहिले होते. त्यात ते म्हणतात, कादंबरी वाचायला सुरुवात केल्यावर तिच्या संथ, सुंदर निवेदनाने मी आकर्षित झालो. 'ओघ' पेक्षाही ही सफाई मनोवेधक वाटली. पात्रांचे स्वभावचित्रण स्वाभाविक, चांगले झाले आहे. विमलची आई, वडील, खुद्द विमल, तिची मैत्रीणसुद्धा किंवा तिचे मिस्टर गोळे, साऱ्या पात्रांचे वागणे, बोलणें, त्यांच्या कृती अगदी स्वाभाविक, वास्तव अशा आहेत.

"पण मला विशेष आवडले भावे हे पात्र. हे पात्र. तुम्ही फार चांगले रंगवले आहे. (क्वचित त्याला व्याख्यानवजा बोलायची लहर येते ते सोडले तर) माझी तक्रार एकच आहे. ह्या पात्राला तुम्ही अर्ध्यावरच काटले आहे. त्याचा विकास होऊ दिला नाही.

"आणि माझ्या दृष्टीने तुमची सुंदर चाललेली कादंबरी तिथेच वेडीवाकडी वळणे घेते. अस्वाभाविक वाटते.

" विमल पुण्याला जायला निघेपर्यंत मी कादंबरी मोठ्या खुपीने, उत्सुकतेने वाचत होतो. तुमची ही कादंबरी तुमच्या पूर्वीच्या कादंबऱ्यांहून चांगली तर आहेच पण आजच्या मराठी कादंबऱ्यांतही एकदम उठून दिसेल असे मनात येत होते. पण विमल पुण्याला जाते त्यामुळे तिला (कादंबरीला) निष्कारणच 'टर्न' मिळतो. आणि विशेषत: शिरगोपीकरांची भेट घेऊन ती जे प्रदर्शन करते त्यामुळे कादंबरीचा पूर्वीचा सगळाच साज विस्कटून जातो. सारेच अस्वाभाविक, कृत्रिम (तो संग एखाद्या श्रुतिकेत उत्तम. मला वाटते, तुमची अशी एक श्रुतिका आहे.) पण त्याने कादंबरीचे मात्र सौंदर्य बिघडवले आहे. इ."

नानांचा हा आक्षेप मला अगदीच न पटणारा होता. एरवी मी त्याचे निराकरण केलेही नसते. पण इथे खुलासा करणे मला आवश्यक वाटले.

कोल्हापूरला गेलो त्यावेळी त्यांच्याशी मी सविस्तर बोललो. माझा मुद्दा नानांना नंतर पटला.

इतकी चांगली लिहीत गेलेली कादंबरी थोडक्यात बिघडली कसे म्हणता ?

विमल शिरगोपीकरांच्याकडे जाते, ती एक वडिलांनी आपल्यासाठी आणलेले स्थळ म्हणून वडिलांनी या स्थळासंबंधी तिच्याकडूनच खर्चाला म्हणून शंभर रुपये घेऊन पुण्याला जाऊन केलेली खटपट ही त्यांच्या एकूण स्वभावानुसार शंकास्पद होती. विमलला तसे वाटले म्हणून शहानिशा करण्यासाठी ती स्वत: होऊन शिरगोपीकरांकडे धाडस करून, संकोच बाजूला ठेवून गेली तर प्रत्यक्षात काय कळले ? शिरगोपीकर ज्या कंपनीत मोठे अधिकारी होते त्या कंपनीत विमलला नोकरी मिळण्यासाठी तिच्या वडिलांनी अर्ज दिला. तिच्या लग्नाचा विचार जाणूनबुजून, स्वार्थीपणाने बाजूला ठेवला व तिला नोकरी मिळवण्याची खटपट त्यांनी विमलच्या परभारे केली. वडिलांकडूनच झालेली ही तिची घोर फसवणूक तिला अत्यंत चीड आणणारी, संताप आणणारी घटना होती. अशा परिस्थितीत तिचे बोलणे, वागणे संयम सुटून, तोल ढळून असणे स्वाभाविक होते.

नानांची टीकादेखील मला उत्साहवर्धक वाटलेली आहे. ते माझे लिखाण आवर्जून वाचतात त्यातच मला आनंद होता.

याच कादंबरीत एक चुकीची शब्दयोजना झाली होती. वाक्य असे होते — 'तुम्ही तुमचं पितृऋण जाणलं असतं. ते आपल्या कर्तव्याला जागले असते.'

'ऋण' शब्दाऐवजी कर्तव्य हा शब्द पाहिजे होता.

नानांनी हे निदर्शनाला आणून दिले.

लिहिण्याच्या भरातदेखील अशा चुका होऊ नयेत असे त्यांचे नेहमी सांगणे असे.

मी कुणी मोठा किंवा मान्यता पावलेला लेखक नाही. किंवा माझ्या लेखनाचे संदर्भ द्यावेत अशा तऱ्हेच्या माझ्या लेखनकृती पण नाहीत. परंतु केवळ या लेखनव्यवहारातील ऋणानुबंध स्पष्ट करण्यासाठीच हा लेखनप्रपंच.

घरातल्या माणसाबद्दल आभार मानता येत नाहीत. कृतज्ञता व्यक्त करता येत नाही. सदैव त्यांच्या मूक ऋणातच राहावे लागते. माझ्या लेखनाचे श्रेय नानांना जाते. एकदा बोलता बोलता विषय निघाला. माझी भावना लक्षात घेऊन नाना म्हणाले, "तुझ्यात लेखनवाचनाची आवड होती. धडपड करण्याचा तुझा स्वभाव होता. म्हणून तुला जमलं न पेक्षा मी काय केलं ?"

नानांचे मोठेपण त्यांच्या शब्दात व्यक्त झाले.

नानांच्या आकस्मिक निधनाने माझ्या जीवनातील एक महापर्व संपुष्टात आले.

६७ माची, सातारा

---

## साभार स्वीकार

श्री गुरू माहात्म्य : डॉ. भीमाशंकर देशपांडे, श्री. ए. आर. डिसोझा, गाणगापूर, जि. गुलबर्गा ( कर्नाटक ), १९८७, रु. ३०

व्यवस्थापन तंत्र आणि मंत्र : डॉ. प्र. चि. शेजवलकर, व्यापार साहाय्यक सी. डी. शर्मा, पुणे ३७, १९८८, रु. ३०

मुलाखतीचा मंत्र आणि नोकरीची हमी : प्रा. भाऊसाहेब निमगीरकर, श्रीविद्या प्रकाशन, पुणे ३०, १९८८, रु. २५

रुचिपालट : अंजनी नरवणे, श्रीविद्या प्रकाशन, पुणे ३०, १९८८, रु. ३०

गोर्बाचोव पर्व : नरेन्द्र सिंदकर, श्रीविद्या प्रकाशन, पुणे ३०, १९८८, रु. ४०

---

# आमचे सन्मित्र : पा. ना. मिसाळ

प्रा. शरद वराडकर

---

बेचाळीस–त्रेचाळीस सालचा जमाना. आम्ही तेव्हा शाळकरी मुले असताना नियतकालिकांचे फारसे प्रस्थ नव्हते. रत्नागिरी जिल्हा आधीच मागासलेला त्यातला एक मालवण तालुका. त्या तालुक्यातील कट्टा हे माझे जन्मगाव. माझे वडील पेशाने डॉक्टर. एका इंग्रजी शाळेचे सुपरिंटेंडेंट. त्यामुळे आमच्या घरी 'केसरी' यायचा. तसाच मालवणचा बालसन्मित्रही. केसरीत आम्हा मुलांना फारसा रस नसायचा. पण बालसन्मित्रावर मी अधाशासारखा तुटून पडत असे. त्याचे एक पहिले आकर्षण म्हणजे आजच्या स्वराज्य-सोबतच्या आकाराची भरगच्च मजकुराची आठ पाने. व्यवस्थित घडी घातलेली आणि वर माझ्या नावाचा छापलेला पत्ता. बालसन्मित्रामधील मनोरंजक कोडी बरोबर सोडविणाऱ्या वाचकांची नावे असायची. त्यात माझे हमखास नाव असायचे. अशा रीतीने छापील नावामुळे माझी आणि बालसन्मित्रची खरीखुरी दोस्ती झाली.

तसे म्हटले तर तो काळ इंग्रजी अमदानीतील. शिक्षणाचा प्रसार आजसारखा नव्हता. व्हर्नाक्युलर फायनल (मराठी सातवी) पास झालेला विद्यार्थी मास्तर तरी व्हायचा, नाहीतर तलाठी. व्ह. फा. पास म्हणजे दिव्यच! तिथपर्यंत अभ्यासाची गाडी आली म्हणजे डोक्यावरून पाणी गेले. आणि हे भाग्य फार थोडया लोकांच्या वाटयाला यायचे. त्यामुळे आता रंगीबेरंगी, भडक, सचित्र नियतकालिकांना जसा ऊत आलाय तसला प्रकार तेव्हा नव्हता. त्या काळातसुद्धा चित्रे क्वचितच. फक्त मोठया टाइपातल्या मजकुरातल्या छोटया छोटया मनोरंजक पण बोधपर गोष्टी, चुटके, विनोद, कविता, कोडी अशा बहुविध मजकुरात इंच इंच भरलेल्या 'बालसन्मित्रा'ने आम्हाला मनस्वी वेड लावले होते. केवळ वाचायचेच नव्हे तर अनुकरणही करायचे. मोडक्या तोडक्या कविता करायच्या- चुटके पाठवायचे, कोडयांची उत्तरे पाठवायची आणि आनंदावर वरताण म्हणजे

आम्ही चुकतमाकत कसातरी लिहिलेला मजकूर चक्क सुधारून आमच्या नावे छापलेला असायचा. लेखक-कवी म्हणून मित्रमंडळीत मिरवताना केवढा अभिमान आणि आनंद वाटत असे आम्हाला त्यावेळी !

'बालसन्मित्रा'चे संपादक म्हणून पारुजी नारायण मिसाळ हे नाव प्रत्येक अंकावर असायचे. त्या नावाचेही आम्हाला अप्रूप वाटायचे मी एकदा एक कविता पाठविली. ती होती 'शार्दूलविक्रीडित' वृत्तात. आमच्या मराठीच्या पुस्तकात अशी कविता एकतरी असायची. 'बागेत बागडणाऱ्या फुलपाखरास' असा काहीतरी विषय होता. मी मनात कवितेची चाल गुणगुणून फुलपाखराचे वर्णन शब्दबद्ध केले होते. वर लिहिले होते वृत्त शार्दूलविक्रीडित म्हणून ! आठच दिवसांनी संपादकांचे तिरप्या वळणदार अक्षरातील पत्र आले. त्यात त्यांनी लिहिले होते, "चि. शरद यास अनेक आशीर्वाद. तू बालसन्मित्रात छापण्यासाठी पाठविलेली कविता मिळाली. कवितेची कल्पना छान आहे. पण वर वृत्त शार्दूलविक्रीडित लिहिलेले आहेस. त्या वृत्ताची तुला मुळीच माहिती दिसत नाही. येत्या अंकात तुझी कविता सुधारून छापली आहे" त्या पत्रात त्यांनी गणवृत्तांची मला माहिती दिली होती व त्याखाली काही प्रसिद्ध कवींच्या शार्दूलविक्रीडित वृत्तातील कवितांचे मुखडे उदाहरणार्थ लिहिले होते. एक नवा विषय देऊन, त्यावर त्याच वृत्तात मला आणखी काही कविता लिहून पाठविण्यास सांगितले होते मजकुराच्या शेवटी खाली लिहिले होते 'आपला सन्मित्र–पा. ना. मिसाळ' पुढे बालसन्मित्रात माझी ती कविता छापून आली. गणवृत्तांची मला चांगली माहिती झाली. त्यानुसार मी गण पाडले आणि गणवृत्तांच्यामुळे बराच अभ्यास पक्का झाला. याचे श्रेय खरे आहे ते अर्थातच 'आपला सन्मित्र मिसाळ गुरुजी' यांनाच.

पा. ना. मिसाळ हे सेवानिवृत्त शिक्षक. माझे गाव कट्टा आणि मालवण यात अंतर फक्त दहा-बारा मैलांचे. पण बालसन्मित्रामुळे त्यांच्याशी वडिलकीचे आणि मैत्रीचे नाते जुळले खरे पण भेटीचा योग जुळला नाही. माझे एक चुलते दिनकरराव पुनाजी वराडकर त्यांचे जिवलग दोस्त. माझ्या वडिलांचाही त्यांच्याशी परिचय होता. मीच त्या आपल्या सन्मित्राला पाहिले नव्हते.

एकदा बालसन्मित्रामध्ये संपादकांनी बालवाचकांना प्रश्न केला होता, 'तुम्ही मोठेपणी कोण होणार ?' पोस्टकार्डावरून प्रत्येकाने नाव–पत्ता घालून आपण कोण होणार ते लिहावयाचे होते. माझ्यासारख्या विद्यार्थ्यांच्या सतत कानावरून जाणारी नावे म्हणजे बॅरिस्टर सावरकर, बॅ. आंबेडकर इ. मागचा पुढचा मी विचार न करता कार्डावर लिहून पाठविले, 'मी बॅरिस्टर होणार' आणि ते चक्क बालसन्मित्रात छापून आले. बहुतेकांनी व्यापारी, वकील, डॉक्टर, शिक्षक

असे ठराविक आवडीनिवडीनें लिहिले होते. त्यात मीच एक ' बॅरिस्टर ' होतो. पण बॅरिस्टर होण्याचे जमले नाही, ही गोष्ट सत्य आहे. काय असेल ते असो.

त्यानंतर माझ्या वडिलांबरोबर मला मालवणला जाण्याचा योग आला. मला जबरदस्त आकर्षण म्हणजे पारुजी नारायण मिसाळ यांना भेटण्याचे होते. तसे ' बालसन्मित्र ' कार्यालय बघावयाची तीव्र इच्छा होती. माझा हट्ट पाहून भरडावरील दत्ताच्या देवळाजवळ असलेल्या बालसन्मित्र कार्यालयात वडील मला घेऊन गेले. ' बालसन्मित्र 'चा तेथे मोठा टांगलेला बोर्ड पाहून मला मोठी अपूर्वाई वाटली होती. कार्यालयात प्रवेश केला तर धोतर नेसलेले, जाड भिंगांचा चष्मा लावलेले, डोक्यावर तुरळक केस असलेले मिसाळ गुरुजी बैठकीच्या पेटीवर कागदाची चवड ठेवून, मांडी घालून लिहीत बसलेले दिसले. " या बाबूराव, बसा " त्यांनी आमच्या वडिलांचे स्वागत केले. मी पारुजी नारायण ते हेच एवढे मनातून ओळखले. पण एक असा संपादक आणि साधा, इतका म्हातारा ? मी मनात थोडा हिरमुसला झालो. इकडे तिकडे नजर टाकीत निरखीत बसलो. तेवढयात माझ्याकडे पाहत खूप ओळख असल्यासारखी हाक मारीत म्हणाले, " बरं का आपल्याकडे वराडकरांचा बॅरिस्टर मुलगा आलाय." त्यांच्या पत्नी थोडयाच वेळात बाहेर आल्या. त्यांनी माझेकडे कौतुकाने पाहिले. मी लाजेने चूर होऊन गेलो. त्यांचेकडे पाहून बोलण्याचे धैर्य मला झाले नाही. वडील मात्र त्यांच्याशी बराच वेळ बोलत होते. चहा घेऊन आम्ही त्यांच्या घरून निघालो. या एवढया वेळात तेथील वातावरणाचा मला चांगला परिचय झाला आणि भीड मात्र खूपशी कमी झाली एवढे खरे !

त्यानंतर अनेक वेळा मालवणला गेलो की, मिसाळ गुरुजींकडे जायचेच असा परिपाठ ठरून गेला होता. हळूहळू त्यांचा मुलगा दामोदर माझा मित्र बनला. बालसन्मित्रामध्ये लेखनाची उमेदवारी चालू होती. त्या काळात वीरेन्द्र अढिया यांनी ' कुमार साहित्य मंडळ ' नावाची एक चळवळ चालविली होती. मालवणहून दिनेश देसाई, लुई फर्नांडिस, आ. ना. पेडणेकर, र. ग. (नामू) वायंगणकर, मधू बालावकर वगैरे त्यामध्ये मधूनमधून भाग घेत असत. मिसाळांचा ' बालसन्मित्र 'ही या चळवळीला प्रसिद्धी देऊन उत्तेजन देत होता.

एकदा मालवणच्या सरस्वती टॉकीजमध्ये कुमार साहित्य संमेलन भरले होते. त्याला खरी मदत जर कोणाची झाली असेल तर ती मिसाळ गुरुजींची ! त्यांच्याच घरी मुंबई–पुण्याहून आलेल्या सर्व लेखक मंडळींना भोजनाचा, चहापानाचा बेत होता. हे संमेलन ऑगस्ट–सप्टेंबरच्या दरम्यान पावसाळयाच्या काळात भरले होते. भर पावसात छोटया होडयातून आम्ही २५-३० मंडळी सिंधुदुर्ग पहावयास गेलो होतो. त्यावेळी मिसाळ गुरुजीच आमचे पाठीशी उभे होते. त्यांनी

आम्हाला धीर दिला व धीटपणा निर्माण केला. आम्हाला तर समुद्राच्या लाटांनी आणि छोटया हलत्या होडीने बुडतो की काय असे वाटत होते. पण तसे काहीच झाले नाही. सहल यशस्वी झाली. ती संपवून आम्ही सुखरूप घरी परतलो. यावेळी मिसाळांचे आम्हांस जवळकीचे, आपुलकीचे दर्शन घडले. मनात असलेले गांभीर्य आणि भीती यांचे दडपण खूप कमी झाले.

मिसाळ गुरुजी स्वभावाने फार प्रेमळ होते. ते लिंगायत गवळी समाजातील असल्याने त्यांच्या घरी दूधदुभते यांची रेलचेल असायची. त्यामुळे त्यांचेकडे गेल्यावर पेलाभर घट्ट दूध प्यायला पुढे येत असे. त्याचबरोबर नवीनवी पुस्तके स्वागत करीत. ती वाचायला मिळत. माझ्या आठवणीप्रमाणे त्या काळात बालसन्मित्रातून लिहिणारी जी लेखक मंडळी होती, त्यात कृ. भा. बाबर, ना. गं. लिमये, ना. धों. ताम्हनकर, राजकवी यशवंत, प. स. देसाई ही त्याचप्रमाणे शंकर सारडा, सरोजिनी, बाबर, मधु मंगेश कर्णिक, गंगाधर महांबरे, स. म. पेठे, काकतकर, लुई फर्नांडिस भय्यासाहेब ओंकार ही नावेही असत. त्यांना इतरांप्रमाणे पुढे आणण्यात बाल-सन्मित्रकर्त्यांचा फार मोठा वाटा आहे. 'बालसन्मित्र'च्या शाळेत अशी अनेक गुणी माणसे 'तयार' होऊन ती आज मराठी सारस्वताच्या क्षेत्रात आपले नाव आघाडीवर ठेवून कार्य करीत आहेत. त्यांना बालसन्मित्र आणि त्याचे कर्ते पा. ना. मिसाळ यांचे ऋण विसरू म्हटले तरी विसरता येणार नाही.

कधीकधी ही गुणी माणसे अचानक भेटतात. जुन्या आठवणींना पुन्हा उजाळा येतो. आणि एका वेगळया जुन्या युगाचे चित्र डोळयासमोर उभे राहते. भावना ओल्या होतात. डोळे पाणावतात आणि त्या थोर "सन्मित्रा' ला, धीरगंभीर पण प्रेमळ पुरुषाला आपोआप नमस्कारासाठी हात जुळले जातात. त्यांच्याच शब्दात म्हणावयाचे म्हणजे 'आपला सन्मित्र' पा. ना. मिसाळ यांचे थोरपण मनाला पटल्यावाचून राहत नाही. आपल्या छोटया छोटया गुणी लेखकांचे कौतुक करायला ते आता नाहीत. मन क्षणभर गलबलून जाते.

मला आठवते, माझ्या गावाला हायस्कूलशिक्षण पूर्ण करून कॉलेजशिक्षणासाठी कोल्हापूरला आलो. मला कोल्हापूरलाही मिसाळांचे पत्र यायचे. साहित्यिक घडामोडींची चौकशी, शैक्षणिक प्रगतीची विचारपूस असे. "तुला बॅरिस्टर व्हायचे आहे ना?" याचे स्मरण त्यात करून दिलेले असे. आणि वर "अभ्यास मनापासून करा" असा अधिकारवाणीचा, प्रेमळ आपुलकीचा मनाने केलेला सांगावा असे त्या पत्राने खूप समाधान वाटे. दादासाहेब मिसाळ अखेरपर्यंत 'बालसन्मित्र' प्रकाशित करीत होते. नंतरच्या काळात कागद-छपाई महागली. छापखान्यांचे सहकार्य कमी झाले. अंकात नियमितपणा राहिला नाही. आणि वर्गणीदारांवर



अनुक्रमणिका

## या वर्षात आतापर्यंत प्रकाशित झालेली मॅजेस्टिक प्रकाशने

### कादंबरी

खाई ० उत्तम बंडु तुपे । ४० परिमला ० केशव केळकर । ३५ पडझड ० ज्योत्स्ना देवधर (आ।२) । ३० बॉनसाय ० सुभाष भेण्डे । ५० भेटेन पुन्हा ० रघुवीर सामंत । ७५ मार्केट ० ह. मो. मराठे । ५० लक्ष्मीसेतु/गडदेचा वहिरी ० गो. नी. दांडेकर । ३० वृत्तांत ० श्री. ज. जोशी । ७० सोन्याचा किल्ला ० सत्यजित राय

### कथासंग्रह

गाजराची पुंगी ० पंढरीनाथ रेगे । ४० प्रस्थान ० ज्ञानेश्वर नाडकर्णी । ५० मावळतीची झाडे ० जयश्री यत्ते-भट । ४५ श्रीशिल्लक ० शरच्चंद्र चिरमुले । ४० हास्यत्रयोदशी ० वसंत मिरासदार । ४०

### विविध

अक्षरदिवाळी १९८६ (संपादित) । १०० अन्नपूर्णा ० मंगला बर्वे । ५० अनंगरंग रतिशास्त्र ० ग. र. मुळे । ४० असा हा महाराष्ट्र । भाग १ ० माधव गडकरी । २५ असा हा महाराष्ट्र । भाग २ ० माधव गडकरी । ३० असा हा गोमांतक ० माधव गडकरी । ५० अंकगणितात प्रावीण्य कसे मिळवाल ० मो. वा. औंधकर । १५ इंग्लिश स्पेलिंग आणि उच्चार ० न. ल. गाडगीळ । १० घरचे मत्स्यालय ० एस. व्ही. जोशी । २० तर्खडकर भाषांतरपाठमाला १/२ ० संपादक चंपानेरकर । ३३ तारुण्याच्या अंबरठ्यावर ० डॉ. विठ्ठल प्रभु । ३५ तुमची कुंडली तुम्हीच पहा ० द. शं. केळकर । २५ पन्नास निबंध ० चिटणीस, गोडे । १५ पाच संतचरित्रे ० गो. नी. दांडेकर । पुनर्जन्म : एक शोध ० बाळ सामंत । ४० मधुर हरिनाम ० गोदुताई सहस्त्रबुद्धे । ७० मनोविकारांचा मागोवा ० डॉ. श्रीकांत जोशी । ६० मॅजेस्टिक जनरल नॉलेज ० मो. वा. औंधकर । २० युद्धनेतृत्व ० दि. वि. गोखले । ६० लघुउद्योग : संपूर्ण मार्गदर्शक ० मधुमंगेश कर्णिक । ६० वाल्मीकी रामायण : एक स्वतंत्र विचार ० लालचंद हिराचंद । ३५ सांस्कृतिक संचित ० डॉ. वि. रा. करंदीकर । ७५ सोपे शिवणकाम ० पद्मावती भिसे । ६० सोपे वाईंडिंग ० अ. मु. शेकटकर । ३५ सौंदर्यसाधना ० माया परांजपे । ३० स्त्रियांचे विश्व ० डॉ. अच्युत केरकर । ३० निरामय कामजीवन ० डॉ. विठ्ठल प्रभु । ५०

त्यामुळे परिणाम झाला. संख्या घटू लागली. त्यांचा दामोदर काही काळ 'बाल सन्मित्र' संपादन करीत होता. त्याची दोन मोठी भावंडे-मिसाळ गुरुजींचे दोन कर्ते मुलगे त्यांच्या समोर काळाने झडप घालून नेले होते. दामूचा प्रयत्न फारस यशस्वी होऊ शकला नाही.

मराठी साहित्याची एक पिढी 'तयार' करणारा एक द्रष्टा संपादक, प्रेमळ व्यासंगी शिक्षक आणि खराखुरा 'आपला सन्मित्र पा. ना. मिसाळ' आईच्या मायेने पाठीवरून हात फिरवून वेड्यावाकड्या अक्षरांना सजवून, सुधारून त्यांना प्रसिद्धी देणारा हा थोर संपादक, उत्तम लेखक आणि कवी होता. प्रकाशक होता. व्यवहारी, कुटुंबवत्सल असा एक सज्जन पुरुष होता. मी स्वत: वकिलीचे शिक्षण पूर्ण केले. हायकोर्टाची बार कौन्सिलची सनद घेतली. बॅरिस्टरच्या परीक्षेस जाण्याची तीव्र उमेद होती. पण तो योग आला नाही. कधी कधी मिसाळांची आठवण येते आणि बॅरिस्टर होऊ शकलो नाही ही खंत मनाला लागून राहते.

रत्नदीप सोसायटी, नागाळा, कोल्हापूर

---



---

# आपण किती पुस्तके वाचलीत ?

**शंकर सारडा**

---

१९८८ मध्ये सप्टेंबर अखेर प्रसिद्ध झालेल्या पुस्तकांपैकी माझ्या नजरेस आलेल्या मला माहिती मिळालेल्या निवडक पुस्तकांची एक प्राथमिक यादी पुढे देत आहे. ही यादी अर्थातच अपूर्ण आहे. लेखक–प्रकाशकांनी ८८ मधील आपल्या प्रथम आवृत्तीच्या नव्या पुस्तकांची माहिती पाठवल्यास पुढील अंकी प्रसिद्ध होणाऱ्या अंतिम यादीत त्यांचाही समावेश होऊ शकेल.

वाचकहो, या यादीतील किती पुस्तके आपण वाचली आहेत ?

ज्या वाचकांनी शंभरावर पुस्तके वाचली असतील त्यांनी आपली नावे व वाचलेल्या पुस्तकांची यादी पत्रिकेकडे पाठवावी. त्यांना एक चाचणी प्रश्न पत्रिका पाठवण्यात येईल. आमची खात्री पटल्यास अशा वाचकांना पत्रिकेतर्फे ' ग्रंथवाचन विक्रम सन्मानपत्रक ' देण्यात येईल. १ फेब्रुवारी १९८९ पर्यंत वाचकांनी ही माहिती कळवावी. पत्ता संपादक, महाराष्ट्र साहित्य पत्रिका, म. सा. परिषद, टिळक रोड, पुणे ४११०३०.

**– कादंबऱ्या –**

एकलव्य –शरद दळवी
वृत्तांत –श्री. ज. जोशी
बॉनसॉय –सुभाष भेंडे
मार्केट –ह. मो. मराठे
अलकनंदा –सुरेश द्वादशीवार
वैभवी वास्तूला काटेरी खांब
–मंदाकिनी अष्टेकर
चक्रव्यूह –जनार्दन ओक
सलामी –प्रकाश कदम

अश्वमेध, मधुरा –अनिल आठल्ये
अभिसारिका, अपराजिता –शैला कामत
वारस –वैजयंती काळे
मानसहंस –वि. म. कुलकर्णी
ती बाई –द. रा. जवाहिरे
विसरशील खास मला, ऋेझ –जाईल
पाताळयंत्री, अधिकार –अशोक थोरे
नेमानेम –स्नेहलता दसनूरकर
शुभ्रखंडाचे सम्राट –मालती देशपांडे

आनंदाचे झाड –शं. ना. नवरे
परिक्रमा –देवदत्त पाटील
टोकियो टॉवरवरून– पांढरीपांडे
मेड इन इंडिया –पुरुषोत्तम बोरकर
चक्रव्यूह –व. सु. भगत
चूक माझीच आहे –राजा राजवाडे
पाण्याखाली अंधार –चिंतामणी लागू
रेशीम काटे, शलाका, कारण –सुरेश वैद्य
यमुना –आनंद हांडे
भेटेन पुन्हा –रघुवीर सामंत
आपलं घर –वैजयंती काळे
आशाळभूत –चांगदेव काळे
उजेडाची ओढ –स्नेहसुधा कुलकर्णी
फरारी, गजरी, चावरतिडा, सामना
–व. वा. बोधे
दैवाचे फासे, चिनार, निष्पाप वळी
–बाबा कदम
चैत्री, कमळा, वंचना –मामा साठे
वे दुणे पाच –नयनतारा देसाई
बंदिस्त– नवजीत देशमुख
मदनिका –यशवंत पाध्ये
मेघमल्हार –सुमती क्षेत्रमाडे
यज्ञ –राम शिर्के
शमा –किरण आचार्य
शीतयुद्ध –श्याम मनोहर
स्वामी महाराज –नयना आचार्य
काचघर –चारुशीला गुप्ते
डॅशिंग –सुभाष शहा
भंडारभोग –राजन गवस
शिल्पी –संजय सोनवणे
हॉटेल –अशोक पाध्ये
अपराजिता –कुंभार

आवर्त –गोपाळ बेळगावकर
आधार –गोविंद केळकर
एका कोळियाने –अरुण हेबळेकर
कागदी सिंह –रमेश मंत्री
सन्मान, ताळमेळ, कृतार्थ –शैलजा राजे
खाई –उत्तम बंडू तुपे
दळी –हेमंत सावंत
नक्षत्र –रेणू देशपांडे
शिकार –सुधा मराठे
विस्मृती, देवता, दूरदूर, श्रद्धा
–प्रतिभा रायकर
सूर तूच छेडता –मालती लोहार
संघर्ष –रघुवीरसिंह रजपूत
घुसमट –भीमसेन देठे
ज्वलन –शंकर इनामदार
परिमला –केशव केळकर
लावण्यवती –माधव कानिटकर
जयपराजय –जयश्री रुईकर
दिक्‌बंधन –अरुण ताम्हनकर
पराक्रम –व्यंकटेश महाजन
प्रतिबिंब –रजनी शिरोडकर
भातुकली आणि घरटे –जोशी–लिमये
युगावतार –प्र. ग. सहस्रबुद्धे
रत्नप्रभा –जयंत रानडे
शिकार –निवृत्ती मुळीक
अंतहीन –चंद्रकांत भोजाळ
सलामी, अश्वमेध –अशोक व्हटकर
कर्मगती –अरुण गडकरी
कालचक्र –विनायक डंके
वेताळ, टिटवी –व. वा. बोधे
देहदास –देवदत्त पाटील
प्रेम –पद्माकर गोवईकर
बारामाशी –शरणकुमार लिंबाळे



अनुक्रमणिका




अनुक्रमणिका

– कथा –



चरित्र–आत्मचरित्र

चिरायू प्रकाशनची काही अभिमानास्पद प्रकाशने
(यांतील अनेक पारितोषिकांचे मानकरी)

साहित्य—बांधिलकी आणि विद्रोह
—यशवंत मनोहर

## ललित/इतर

साहित्यातून सत्याकडे —तेंडुलकर—पै
गद्धेपंचविशी —डॉ. आनंद नाडकर्णी
विरंगुळा —प्रमोद नवलकर
हास्य कॉर्नर —विवेक मेहेत्रे
वाटा तुझ्या माझ्या —कुरुंदकर
आनंदयात्रा, निसर्गयात्रा, संसारयात्रा, अक्षरयात्रा —ग. वा. बेहेरे
सोवतचे पहिले पान (४ खंड)
—ग. वा. बेहेरे
बुवाबाजी—वळी स्त्रियांचा—श्याम मानव
पाऊले चालती —रमेश सहस्रबुद्धे
देशाचे वाटोळे करणारी मनोवृत्ती
—सूर्यवंशी
पहाट वारे —दादा धर्माधिकारी
बदलते जीवन —इंदुमती सुखात्मे
१४ पत्रे - ज. बा. कुलकर्णी
झुंडशाहीचे बंड —सुंठणकर
तुम्ही आणि कायदा —सुप्रिया सरवटे
विज्ञानप्रणीत समाजरचना —सहस्रबुद्धे
सावरकरांचा बुद्धिवाद —शेषराव मोरे
संस्कार आणि कुळाचार —खाडिलकर
लोलक —पु. रा. बेहेरे
शोध भानामतीचा —श्याम मानव
बॅम्वी —वसंत निगवेकर
रंगनायक —सं. राजीव नाईक
मुले आणि व्यंग —संभाजी घाटे
महा. जातिसंस्थाविषयक विचार
—सं. सुमंत, पुंडे
पुरुषराज अळूरपांडे —पु. ल. देशपांडे
भाषा विज्ञान परिचय—डॉ. स. गं. मालशे

रसिक मित्र हो —वसंत कानेटकर
गजल दर्पण - विनय वाईकर
गोखले नवदर्शन —मु. गो देशपांडे
मराठी नाटचसंगीत —वाळ सामंत
भारतीय संस्कृतीचा विश्वसंचार—
—हेवाळकर
भारतीय स्वातंत्र्य संग्राम —लीला आवटे
स्वातंत्र्य संग्रामाचे महाभारत
—ग. प्र. प्रधान
महाराष्ट्राची शोकांतिका —अरुण सारथी
माझा नाटचलेखन/दिग्दर्शनाचा प्रवास
—सं. वि. भा. देशपांडे
वास्तव आणि दृष्टिक्षेप —ठोके
हिंद तेजा, जाग रे —भिशीकर
हैद्राबादचा पहिला सत्याग्रह —परळीकर
सोमनाथ ते साबरमती —रमेश मंत्री
वैभवाचे दिवस —रमेश मंत्री
ओलांडताना —लीला पाटील
चंदेरी चित्रहार —रा. ग. जाधव
डायऱ्यातील टिपणे —वा. ल. कुलकर्णी
शिवाजीराव भोसले —प्र. ना. दीक्षित
रामकृष्णांचे कोडे —दुर्गा भागवत
वऱ्हाडी मंडळी —मधुकर केचे
संसदेची सप्तपदी —मो. ग. तपस्वी
श्रीकृष्णचरित्र —रा. चिं. ढेरे
तरंग —श्याम कुरळे
पाण्याचे पंख —श्रीनिवास कुलकर्णी
दीपमाळ —विद्याधर गोखले
अंगणातलं चांदणं —रवींद्र पिंगे
चेरी ब्लॉसम —अंजली कीर्तने
सफर —मंगला साठे
साहित्य संमेलनाचे महाभारत
—भीमराव कुलकर्णी





अनुक्रमणिका

मनोविकारांचा मागोवा –श्रीकांत जोशी
आरोग्याचा अर्थ डॉ. –नाडकर्णी
घनचक्करांची दुनिया –यशवंत पाध्ये
ऐलमा पैलमा –लीला पाटील
धर्म, शासन आणि समाज –नलिनी पंडित
मोहनचं स्टडी सर्कल -माडीवाले
पुनर्जन्म–एक शोध –बाळ सामंत
आंबेडकरांचे विरोधक –हेरलेकर
सांस्कृतिक संचित –वि. रा. करंदीकर
आरसपानी –सदा डुंबरे
आभाळवेडी –श्रीकांत तिडके
प्रस्तावनाकार चव्हाण –दिनकर पाटील
स्पेशल रिपोर्ट –अरुण ताम्हणकर
चौफेर –माधव गडकरी
परिक्रमा –लता राजे
भटक्याचे लग्न –उत्तम कांबळे
बाईमाणूस –सरोजा परुळकर
पोलिसातील माणूस –गजानन टाकळे
अमेरिकनांच्या अंतरंगात –कशाळीकर
आपली स्वप्ने –गुरसाळे
उमलत्या कळ्यांचे प्रश्न –विठ्ठल प्रभू

▱











अनुक्रमणिका

# शारदोपासक संमेलन

**– लखजी आंबराईकर**

---

जानेवारी १९४० मधली ही गोष्ट आहे. महाराष्ट्र शारदा मंदिर या पुण्यातील साहित्य संघाचे संमेलन पुरंदर गडावर साजरे होणार होते. त्या संमेलन प्रसंगी आचार्य अत्रे यांच्या 'नवयुग'च्या अंकाचे आणि प्रा. निरंतर यांच्या इब्सेन पुस्तकाचे प्रकाशन होणार होते. आचार्य अत्रे महाराष्ट्र शारदा मंदिराचे अध्यक्षच होते. आणि प्रा. गं. भा. निरंतर व श्री. गोपीनाथ तळवलकर हे दोघे चिटणीस होते.

या सहल संमेलनाला अनेक थोर साहित्यिक उपस्थित होते. प्रा. बापूसाहेब माटे, श्री. द. वा. पोतदार, प्रा. रा. श्री. जोग, के. नारायण काळे, प्रा. श्री. के. क्षीरसागर, कवी यशवंत, कवी गिरीश, पां. वा. गाडगीळ, य. गो. जोशी, प्रा. के. ना वाटवे, श्रीमती वनमालाबाई तसेच पुण्यातील बहुतेक सर्व वृत्तपत्रांतील संपादक, पत्रकार, प्रा. वा. दा. गोखले, प्रा. ज. व. कुमठेकर इत्यादी इत्यादी जाण्यायेण्या-साठी मोटारीची व्यवस्था, सकाळचा चहा, नास्ता, दुपारचे भोजन व सायंकाळचे चहापाणी इ. उत्तम व्यवस्था होती.

'इब्सेन' पुस्तक प्रकाशनाचे वेळी प्रा. गं. भा. निरंतरांनी आभार मानताना अवघ्या ४ दिवसांत पुस्तक छापून दिल्याबद्दल माझा जेव्हा खास उल्लेख केला त्यावेळी सर्वांच्याच माना मजकडे वळल्या होत्या. माझा तो एक अभिमानाचा क्षण होता.

पुढे महाराष्ट्र शारदा मंदिराचे जे-जे साहित्यिक उपक्रम होत, त्यावेळी प्रा. वा. दा. गोखले, प्रा. निरंतर यांच्याबरोबर मीही उपस्थित राहात असे. दरवर्षी १० एप्रिलला ज्ञानकोशकार केतकर यांचा स्मृतिदिन साजरा होई. त्यानिमित्त ठोसरबागेतील त्यांच्या समाधीवर पुष्पमाला वाहाण्यासाठी मी हमखास जात असे.

कै. माधव ज्युलियन यांचा स्मृतिदिन, संमेलनाध्यक्षांचे सत्कार, पुस्तक परीक्षणा-निमित्त होणारी व्याख्याने इत्यादी–इत्यादी कार्यांत मी उत्साहाने भाग घेत असे-विशेष लक्षात राहाण्याजोगा समारंभ झाला तो प्रा. वा. म. जोशी यांचा षष्टचब्दि. पूर्ती समारंभ. श्री. पु. म. लाड–आय. सी. एस. हे त्या समारंभाचे अध्यक्ष होते. लक्ष्मी रोडवरच्या गोखले स्मारक मंदिरात तो समारंभ साजरा झाला होता.

आमच्या जनार्दन सदाशिव लिमिटेड प्रेसच्या माडीवर महाराष्ट्र शारदा मंदिराच्या कार्यकारी मंडळाच्या सभा भरत. त्या निमित्ताने प्रा. द. वा. पोतदार, प्रा. बापूसाहेब माटे, राजकवी यशवंत, ज्ञानप्रकाशचे काकासाहेब लिमये, वि. घों. कुलकर्णी, प्रा. श्री. के. क्षीरसागर, श्री. गोपीनाथ तळवलकर, प्रा. रा. श्री. जोग, प्रा. पारसनीस इत्यादी साहित्यिक माझ्या घरी जमू लागले. या सर्वांचे आगत–स्वागत करण्यात मला विलक्षण आनंद वाटायचा.

अशाच एका बैठकीत प्रा. निरंतर आणि श्री. गोपीनाथ तळवलकर यांनी महाराष्ट्र शारदा मंदिराच्या चिटणीसपदावर चंद्रकुमार डांगे, दि. वि. देव आणि मी अशा तिघांची नेमणूक केली आणि म. म. पां. वा. काणे यांच्या अध्यक्षतेखाली शारदोपासक संमेलन घेण्याचे ठरवले. त्या संमेलनाचे स्वागताध्यक्ष होते प्रा. रा. श्री. जोग.

प्रा. निरंतरांच्या मार्गदर्शनाखाली, संमेलनाध्यक्षांची मान्यता घेण्यासाठी मी म. म. पां. वा. काणें यांना पहिले पत्र टाकले. नजिकच्याच आठवड्यात यांची प्रत्यक्ष भेट घेतली. त्यांनी संमेलनाध्यक्ष पदासाठी मान्यता दिली. पहिलेच काम फत्ते झाले ! मला आनंद झाला. नंतर मला समजले की, मी भेटण्यापूर्वीच प्रा. रा. श्री. जोग यांचे सविस्तर पत्र त्यांना मिळालेले होते.

संमेलनाची जागा होती साहित्य परिषदेतील माधवराव पटवर्धन सभागृह ही. स्वागतपर पद्य– प्रास्ताविक– स्वागताध्यक्षांचे भाषण - अध्यक्षांचा सत्कार– त्यांचे भाषण - आभार– हार–तुऱ्यांची योजना इ. सर्व सर्व कार्यक्रमाची आखणी झाली. आणि त्याप्रमाणे म. म. काणे यांना कळविण्यात आले. त्याचबरोबर आपण कोणत्या गाडीने पुण्यात येणार ? कुठे उतरणार ? पुण्यात किती दिवस राहाणार ? संमेलनाव्यतिरिक्त इतर काही महत्त्वाचे कार्यक्रम आहेत काय ? अशी विचारणा करणारे पत्रही जोडले.

उलट टपाली त्यांच्याकडून उत्तर आले, 'संमेलनाच्या आदल्या दिवशी डेक्कन क्वीनने मी पुण्यास येईन. स्टेशनवर येण्याची आवश्यकता नाही. खजिना विहिरीच्या गल्लीत अमक्या–अमक्याकडे माझा मुक्काम असेल– त्याच रात्री भेटायला आलात तरी चालेल. त्यावेळी प्रत्यक्ष बोलू.'

आदल्याच दिवशी संमेलनाची सर्व तयारी झाली होती. तयारी ती काय असायची ? टेबल-खुर्च्या मांडलेल्याच होत्या. टेबल क्लॉथ, त्यावरची फुलदाणी, ऐनवेळी करायचे ठरले होते व हार-गुच्छ व चहापाण्याची व्यवस्था सांगून ठेवली होती.

म. म. पां. वा. काणे यांच्या पत्राप्रमाणे खजिना विहिरीच्या गल्लीतील त्यांच्या स्नेह्यांच्या घरी गेलो. त्यांना भेटलो. प्राथमिक बोलणे झाले, 'उद्या सकाळी ८॥ वाजता टांगा घेऊन आपणास घेऊन जाण्यासाठी येतो ' असे मी म्हटल्यावर ते म्हणाले,

" तुम्ही या. पण टांगाबिगा काही आणू नका. अहो, इथल्या इथं तर जायचं आहे. जाऊ चालतच. १० मिनिटंसुद्धा लागायची नाहीत."

त्यांच्या सांगण्याप्रमाणे मी टांगा न घेताच त्यांच्या उतरण्याच्या ठिकाणी गेलो. चहा झाला. खजिना विहीर ते साहित्य परिषद आम्ही चक्क चालत गेलो. ते माझी आस्थेने चौकशी करत होते आणि त्यांना माहिती देताना मी भलताच खुपीत होतो.

साहित्य परिषदेच्या दारात त्यांचे थोर-थोर साहित्यिकांनी हर्षभरे स्वागत केले. जमलेले सर्वचजण परस्परांचे परिचित होते. त्यांची आपापसांतील विचार-पूसही खूप आल्हाददायक होती.

त्या सबंध दिवसाचा कार्यक्रम थाटामाटात पार पडला. दुसऱ्या दिवशीच्या वृत्तपत्रात कार्यक्रमाचे फोटो आणि रसभरीत वर्णन आले.

दुसरे दिवशी म. म. काणे यांना परिषदेमध्ये चहापानासाठी बोलावण्याचे ठरले. चहापानासाठी निमंत्रित करावं याचे ती बहुतेक सारी मंडळी तिथे हजरच होती त्यांना तिथल्या तिथे आमंत्रण दिले गेले. संमेलनाला हजर नसणारी पण चहापानासाठी आमंत्रण देणे आवश्यक होते अशी एकच व्यक्ती होती आणि ती म्हणजे प्रा. वामन मल्हार ऊर्फ तात्यासाहेब जोशी.

प्रा. गं. भा. निरंतर आणि मी अशा दोघांनी लगेच सायकली काढल्या आणि कर्वेरोडवरील माननीय तात्यासाहेबांचे घर गाठले. घरात गेलो. तात्या निजून होते. आम्ही आल्याचे समजताच उठून बसले. म्हणाले, ' सकाळपासून जरा कणकण होती. येण्याची फार इच्छा होती पण जाणूनबुजून टाळले, म्हटले पुढला धोका नको. कसा छान झाला ना कार्यक्रम ? महामहोपाध्यायांना भेटण्याची फार इच्छा होती. उद्या आहेत ना ते इथे ?"



अनुक्रमणिका



राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




अनुक्रमणिका

२) " बालभारती " सेनापती
बापट मार्ग, पुणे ४११ ००४.
(दूरध्वनी क्र. ५९४६५)

४) औद्योगिक वसाहत, पथ नं. २ व
३, रेल्वे स्टेशनजवळ,
औरंगाबाद – ४३१ ००१.
(दूरध्वनी क्र. ४११०).

भांडार अधीक्षक, महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक उपभांडार व वितरण केंद्र

५) प्लॉट नं. ६, श्री. पांडुरंग वि.
का. सह. (विकास) सेवा
सोसायटी लि. यांचे गोदाम,
शाहू मार्केट यार्ड,
कोल्हापूर–४१६ ००५.
जि. कोल्हापूर.

७) ए. एन. देशमुख यांचे गोदाम,
मोर्शी रोड, अमरावती,
जि. अमरावती.

६) लातूर औद्योगिक वसाहत,
जयशंकर दालमीलसमोर,
लातूर, जि. लातूर.

८) प्रगती मार्केट, भगीरथ खत
कारखान्याशेजारी, नवीन मुंबई-
आग्रा रोड, नाशिक–४२२ ००९.

आणि

९) सचिव,
महाराष्ट्र राज्य मराठी
विश्वकोश निर्मिती मंडळ,
एल्सा हटमेंट, ' डी ' ब्लॉक,
आझाद मैदान,
मुंबई–४०० ००१.
(दूरध्वनी क्र. ४१५०६९८)

१०) प्रमुख संपादक,
मराठी विश्वकोश कार्यालय,
वाई, जि. सातारा.
पिन ४१२ ८०३.
(दूरध्वनी क्र. ५३)

११) मुख्य माहिती अधिकारी,
महाराष्ट्र परिचय केंद्र,
श्री. ताकुले यांची इमारत,
दादा वैद्य रोड,
पणजी–गोवा ४०३ ००१.

(दूरध्वनी क्र. ४१४६)

" हो, आहेतच आणि उद्या सकाळी त्यांच्यासाठी चहापानाचा खास कार्यक्रम ठेवला आहे. त्याचे आमंत्रण देण्यासाठीच आम्ही आलो आहोत. उद्या सकाळी, परिषदेतच- सकाळी ९ वाजता. तोपर्यंत आपणास निश्चितच बरे वाटेल." प्रा. निरंतर म्हणाले.

" हो. निश्चितच बरं वाटेल आणि न वाटलं तरी एवढ्यावर मी निश्चित तिथंपर्यंत येऊ शकेन." क्षणभरच थांबून ते पुढे म्हणाले,

" माझं एक ऐकाल का ? माझी एकसष्टी नुकतीच झाली. त्यानिमित्ताने मला आपल्या सर्वांना चहापानाला बोलवायचंच होतं. अनायासे महामहोपाध्यायही आपणाला लाभले आहेत. उद्याचे चहा-पाणी माझ्या वतीनेच दिले गेले तर ?"

प्रा निरंतर व मी जरा अडखळलो. पण आम्हालाही असा कोणी दाता हवाच होता. कारण इतके सगळे होत होते पण पैसा कुणाजवळ होता ? पैसा जमा होईल या आशेवरच सगळं चाललं होतं.

" हो चालेल की; तुमची सोय होत असेल तर आम्हाला त्यात आनंदच आहे." मी म्हणालो

—आणि दुसरे दिवशी प्रा. वा. म. जोशी यांच्या वतीने महामहोपाध्यायांना मोठ्या थाटाची चहापार्टी देण्यात आली.

चहापानानंतर महामहोपाध्याय काणें, प्रा. वा. म. जोशी, प्रा. रा. श्री. जोग यांनी छोटी-छोटी भाषणें केली. प्रा. निरंतरांनी आभार मानले. महाराष्ट्र शारदोपासक संमेलनाची सांगता झाली. संमेलनाचा एकूण खर्च काढला. तो सोळा रुपये दहा आणे झाला होता. त्यासाठी आम्ही कुणासही साकडे घातले नाही.

आणखी दोन शारदोपासक संमेलने आम्ही घेतली. एकाचे अध्यक्ष होते- गोविंदराव टेंबे आणि स्वागताध्यक्ष होते- के. नारायण काळे. दुसऱ्या संमेलनाचे अध्यक्ष होते- कविवर्य गिरीश आणि स्वागताध्यक्ष होते- श्री. के. क्षीरसागर.

तीनही संमेलनांचा थाट अशा प्रकारचाच होता आणि खर्चही साधारणपणें एवढाच. एक-दोन रुपये कमीजास्त. गेले ते दिवस !

**ल. स. केळकर**
१५-ए-१४, एरंडवणा,
कर्वे रोड, पुणे- ४११ ००४.



अनुक्रमणिका






# परिषद वार्ता

(२८ ऑगस्ट ते २६ ऑक्टोबर १९८८)

---

वरील कालावधीत परिषदेतर्फे पुणे येथे झालेल्या कार्याची संक्षिप्त वार्ता.

**कविसंमेलन–** पिंपरी–चिंचवड येथे पूर्वी परिषदेची शाखासभा होती. काही कारणाने तिचे कार्य जवळजवळ बंद पडलेले होते. तथापि डॉ. श्री. श्री. घारे, श्री देखणे, सौ. स्नेहसुधा कुलकर्णी यांनी या भागात प्रचार करून २८ ऑगस्टला जुन्या-नव्या कवींची दोन कविसंमेलने भरविली आणि त्याच प्रसंगी शाखेच्या पुनरुज्जीवनाची अनौपचारिक घोषणा केली. दिवसभराच्या या कार्यक्रमाला परिषदेतर्फे अध्यक्ष प्रा. ग. प्र. प्रधान, डॉ. गं. ना. जोगळेकर, श्री. म. श्री. दीक्षित उपस्थित होते.

**कै. पोतदार स्मृतिदिन–** कै. प्रा. दत्तो वामन पोतदार यांच्या स्मृत्यर्थ दि. ६ ऑक्टोबरला डॉ. गो. त्र्यं. कुलकर्णी यांचे 'शिवाजी महाराजांची आग्ऱ्याहून सुटका–समज व गैरसमज' या विषयावर व्याख्यान झाले. या प्रसंगी कै. पोतदार ग्रंथ पारितोषिक श्री. अनंत भालेराव (औरंगाबाद) यांच्या 'हैद्राबादचा मुक्ति-संग्राम आणि मराठवाडा' या ग्रंथाला दिल्याचे घोषित करण्यात आले. पारितोषिक निवडीसाठी प्रा. सदाशिव आठवले आणि प्रा. राजा दीक्षित यांची समिती नेमलेली होती.

श्री. अनंतराव भालेराव पुण्याला आले असता परिषदेचे अध्यक्ष प्रा. ग. प्र. प्रधान यांनी कोषाध्यक्ष श्री. म. श्री. दीक्षित यांचे समवेत १८ ऑक्टोबरला त्यांची भेट घेतली आणि त्यांचा सत्कार करून पारितोषिकाची रक्कम (रु. २५१) त्यांना दिली. या रकमेत रु. ५० ची भर घालून श्री. भालेराव यांनी ३०१ रुपये परिषदेच्या साहित्यिक साहाय्य निधीला देणगीदाखल दिले. परिषद याबद्दल त्यांची ऋणी आहे.

**बालकवी स्मृतिदिन–** बालकवी कै. ठोमरे यांच्या स्मृत्यर्थ डॉ. सुधीर रसाळ यांची दि. १३ व १४ सप्टेंबरला बालकवींच्या कवितेसंबंधी दोन व्याख्याने झाली.

**कार्यालयीन सभा–** परिषदेच्या कार्यकारी मंडळाची आणि वार्षिक साधारण सभेची अशा दोन सभा २५ सप्टेंबरला भरल्या होत्या. प्रा. ग. प्र. प्रधान यांच्या अध्यक्षतेखाली भरलेल्या वार्षिक सभेस १९८७-८८ चा वार्षिक वृत्तांत, हिशेवपत्रके आणि १९८८-८९ चा अर्थसंकल्प यांना मान्यता देण्यात आली. परिषदेच्या दीर्घकालीन सेवेत असणारे कार्यालय प्रमुख श्री. जि. व्यं. देशपांडे सेवानिवृत्त होत असल्याने अध्यक्ष प्रा. प्रधान यांच्या हस्ते त्यांचा श्रीफल व शाल देऊन सत्कार करण्यात आला.

**महापौरांची भेट–** पुण्याचे महापौर मा. श्री. अंकुशराव काकडे यांनी १६ सप्टेंबरला सकाळी परिषदेस भेट दिली. आणि कार्यकर्त्यांसमवेत अनेक विषयांबाबत चर्चा केली. या प्रसंगी सर्वश्री ग. प्र. प्रधान, राजेंद्र बनहट्टी, म. श्री. दीक्षित, गं. ना. जोगळेकर, राजा फडणीस, प्र. ल. गावडे हे कार्यकर्ते उपस्थित होते. परिषदेच्या साहित्यिक साहाय्य निधीला महापौरांनी रु. ५००० देऊ केलेल्या देणगीपैकी रु. १००० दिले व निधी जमविण्याबाबत काही सूचना केल्या.

**महामंडळ आणि संमेलन–** मराठी साहित्य महामंडळाची सभा ८ आक्टोबरला पुणे येथे परिषदेच्या कार्यालयात श्री. श्री. पु. भागवत यांच्या अध्यक्षतेखाली भरली होती. या सभेत महामंडळ आणि संमेलनाध्यक्ष निवडणूक यांबाबत सविस्तर चर्चा होऊन घटनेचा नवा खर्डा संमत करण्यात आला. प्रस्तुत खर्डा आता मान्यतेसाठी घटक आणि समाविष्ट संस्थांच्या कार्यकारी मंडळापुढे ठेवण्यात येणार आहे. आगामी ६२ वे अ. भा. मराठी सा. संमेलन अमरावती येथे जानेवारीअखेर भरविण्याचाही या सभेत निर्णय करण्यात आला. आणि संमेलनाध्यक्ष निवडणुकीचे वेळापत्रक ठरविण्यात आले. परिषदेतर्फे या सभेला सर्वश्री राजेंद्र बनहट्टी, गं. ना. जोगळेकर आणि पुरुषोत्तम पाटील हे तिघे प्रतिनिधी उपस्थित होते.

**कै. व. ह. गोळे व्याख्यानमाला–** दि. २५ आणि २६ ऑक्टोबरला कै. व. ह. गोळे यांच्या स्मृत्यर्थ डॉ वि. भा. देशपांडे (रंगभूमी : नाटककाराच्या आणि प्रेक्षकाच्या शोधात) आणि सौ. वीणा देव (कथाकादंबऱ्यांची नाट्यरूपे) यांची व्याख्याने झाली.

**लक्षणीय देणग्या–** लोकहितवादी, अहिताग्नि कै. शं. रा. राजवाडे आणि कै. ग. ल. ठोकळ यांचे स्मरणार्थ त्यांचे वंशज डॉ. य. वि. देशमुख (रु. १०,०००), श्री. पु. रा. राजवाडे (रु. १०,०००) आणि कृष्णकुमार ठोकळ (रु. १२,०००) यांनी परिषदेला उदार देणग्या दिल्या आहेत. या देणग्यांवरील वार्षिक व्याजातून

अनुक्रमणिका

दरवर्षी ग्रंथ पारितोषिकांची व व्याख्यानांची योजना व्हावयाची आहे. (तपशील पुढील अंकी प्रकट होईल.)

**शाखासभा मेळावा–** परिषदेच्या विविध शाखासभांचे प्रतिनिधी आणि पदाधिकारी यांचा एक संयुक्त मेळावा पुणें येथे २३ आक्टोबरला आयोजित करण्यात आला होता. केन्द्रीय संस्था आणि शाखा यांचे परस्परसंबंध लक्षात घेऊन शाखाकार्याचा विस्तार अधिक कसा होईल याचा मुख्यतः या मेळाव्यात विचार झाला. सर्व शाखांसाठी समान घटनानियम करण्यासाठी एक समिती नेमण्यात आली. मेळाव्याला परिषदेतर्फे सर्वश्री राजेंद्र बनहट्टी, गं. ना. जोगळेकर, म. श्री. दीक्षित, शंकर सारडा, चिंतामणी जोशी, राजा फडणीस (निमंत्रक) हे पदाधिकारी आणि शाखांतर्फे सर्वश्री कुसुमाकर शिंपी (धुळे), श्रीपाद जोशी (जत), चिंतामणी जोशी (ठाणे), प्रभाकर चौधरी (जळगाव), शशिकला महाडेश्वर (कोल्हापूर), सुमती लांडे (श्रीरामपूर), श्रीकांत वागूल (कोपरगाव), विजय कसबेकर (श्रीरामपूर), अशोक गोवंडे (इचलकरंजी), वैशाली नायकवडे (इचलकरंजी), म. ग. पातकर (कोल्हापूर), म. द. हातकणंगलेकर (सांगली), अ. ना. सहस्रबुद्धे (अहमदनगर) असे तेरा प्रतिनिधी उपस्थित होते. शाखांकडून घटनेबाबत आधी सूचना मागवाव्यात व नंतर घटना समितीची सभा बोलवावी असे शेवटीं ठरले.

## परिषदेचे नवीन आजीव सभासद

### (१६ ऑगस्ट ते २२ ऑक्टोबर अखेर)

पुणे विभाग

श्री. प्रताप दत्तात्रय जोशी, सौ. मीनल सुहासचंद्र वाठे, वि. वि. आपटे ज. द. वाळिंबे, श्री. सु. द. वेदपाठक, सुनंदा ज. देशमुख, सुभाष कृष्णाजी सहस्रबुद्धे, डॉ. भा. र. साबडे, श्री. वि. म. पाटील, सौ. अ. गो. जोशी, डॉ. द. दि पुंडे, अ. ब. कुलकर्णी, श. कृ. ठकार, ह. वि. शित्रे, डॉ. सौ. स्ने. ला. तावरे प्रा. भ. ना. कुलकर्णी, वि. दि. भागवत, डॉ. अश्विनी धोंगडे, मा. गो. डोमाळे रा. अ. नातू, श. द. चिंचाळकर, म. व. पाटणकर, सौ. तनुजा साठे, सु. गो. चोथे वि. रा. करंदीकर, सौ. ज्योत्स्ना चांदगुडे.

पुण्याबाहेरील

बबन रामचंद्र लोंढे, (मुंबई), वि. रा. गावडे (परळ, मुंबई), श्री. कां. गं. सोनावणे (घाटकोपर), श्री. डी. आर. जोशी (मुलुंड), एम. आर. कारखानीस, श्री. घ. गे. पोखरकर, सौ. मंगला काजळे, श्री. विनायकराव बंगाळ, श्री. ब. ल. गाढे, सौ. अ. म. नेटकर, प्रा. ब ह. विलायते (सर्व श्रीरामपूर)" श्री. श्री. भा. जोशी (नागपूर), प्रा. पां. ना. कुलकर्णी (कोल्हापूर), श्री. सु. स. शिपुरकर (कोल्हापूर), श्री. तु. द. कुलकर्णी, (कोल्हापूर), सौ. उषा सहस्रबुद्धे (नगर), श्री. स. वा. शिंगे (सवडी–नगर), र. श्री. वराडकर, वायरी भूतनाथ, (ता. मालवण) ▱

अनुक्रमणिका

अनुक्रमणिका



